"श्रीगुरुदेव दत्त"

# तुम्हांला हिमालयांत जायचें आहे काय ?



( उत्तरखंड–हिमालयांतील चार धामांची यात्रा. )

( जून, जुलै, ऑगस्ट )

१९३९




लेखक

सीताराम गोविंद राजे.



१९४२ ]

[ किंमत १।। रु.

# प्रस्तावना



माझे मित्र रा. सीताराम गोविंद राजे हे मुंबईच्या सेक्रेटरिएटमध्यें पूर्वी नोकर असून त्यांस पगारही चांगलाच मिळत होता. आंग्लविद्याविभूषित माणसानें सेवानिवृत्त झाल्यावर वयाच्या ६७ व्या वर्षी भक्तिभावानें हिमालयांतील कठीण यात्रा कराव्या हें कौतुकास्पद आहे. ही यात्रा कांहीं ठिकाणीं किती अवघड आहे त्याचा एक मासला पृष्ठ ४५ वर आहेः—

" मधल्या वाशावर आम्ही आमच्या मागें आमच्या नोकरानें आमची कंबर धरलेली व बाजूच्या दोन वाशांवरील दोन दंडीवाल्यांनीं आमचे हात धरलेले, अशा वधस्तंभाकडे ओढून नेत असलेल्या मेंढ्याप्रमाणें केवळ परमेश्वराच्या कृपेनें आम्ही या पुलावरून सुरक्षितपणें पुढें गेलों ! "

रा. राजे हे थिऑसफिकल सोसायटीचे एक सभासद असल्यामुळें हिंदुधर्माचें रहस्य समजण्याच्या कामीं त्यांस सहाय्य झालें व हल्लींच्या अश्रद्धेच्या काळांतही त्यांना आपल्या हृदयांत डोळस भक्तिभाव जागृत ठेवतां आला. त्या डोळस भक्तिभावाचें हें फळ त्यांनीं महाराष्ट्रीय वाचकांस सादर केलेलें आहे.

आपल्या हिंदुधर्माचीं जीं पवित्र स्थानें फार प्राचीनकाळापासून आजवर विद्यमान आहेत त्यांचें कार्य दुहेरी आहे. हीं स्थानें रमणीय आहेत व तेथें जाणारास उत्कृष्ट सृष्टिसौंदर्याचा लाभ मिळतो. या ठिकाणीं ईश्वरभक्ति व सौंदर्याभिरुचि यांचा उत्कृष्ट मिलाफ होऊन माणसांच्या स्वभावांत सुसंस्कृतपणा येत असतो. पवित्र स्थानांचें हें बाहिरंग कार्य होय. त्यांचें दुसरें अंतरंग कार्यही असतें. सर्व जिज्ञासूंनीं तें अंतःस्थ कार्य समजून घेणें अवश्य आहे. तें समजल्याशिवाय धर्माच्या उभारणींत या स्थळांचें स्थान कोणतें तें मनांत भरणार नाहीं व हल्लींच्या अवनत कालांत जी या स्थळांची सुधारणा करणें अवश्य आहे तिचें धोरणही ठरवितां येणार नाहीं.

असल्या स्थळांस कधीं कधीं " ज्योतिर्लिंग " हें नांव दिलेलें आढळतें. अमुक अमुक स्थान " जागृत " आहे असेंही म्हणण्याचा प्रचार आहे.

" साधुदर्शनें पावन तीर्थ। पुरती त्याचे मनोरथ। साधु न येतां जिणें व्यर्थ। तया पुण्यक्षेत्राचे ॥ " ( दासबोध दशक ७, समास १०, ओंवी ११. )
" तो बदरिकाश्रम माझें स्थान। तेथें सर्वदा मी आपण। अद्यापि करतो अनुष्ठान। भक्तिज्ञानवैराग्यें ॥ " असें एकनाथ महाराज बदरिकाश्रमाविषयीं सांगतात. ( पुढें पृष्ठ १०४ पहा. ) या गोष्टींचा विचार केला तर पुण्यक्षेत्रांचें कांहीं तरी अंतरंग-कार्य असले पाहिजे असें विचारी माणसास वाटल्याविना रहाणार नाही.

या गोष्टीविषयीं थिऑसफिकल सोसायटींत कांहीं तज्ज्ञ मंडळींनीं योगसिद्धींचा उपयोग करून संशोधन केलेलें आहे. त्यावरून असें दिसतें कीं ज्याप्रमाणें एकादे नभोवाणीचें स्टेशन असावें व त्या केंद्रापासून सभोंवार ईथरच्या लाटा पसरत असाव्या तद्वत् हीं पुण्यक्षेत्रे असतात. या पुण्यक्षेत्रांतून अदृश्य शक्ति, सारखी सभोंवार वहात असते आणि भोंवतालच्या मोठ्या प्रदेशावर पसरून तेथें कार्य करीत असते. मानवी उत्क्रांतिला ज्या ज्या गोष्टी प्रतिकूल असतील त्याचा जोर कमी करणे व ज्या गोष्टी पोषक असतील त्यांना उत्तेजित करणें हें त्या शक्तीचें कार्य असते. या शक्तीच्या ऊर्मी सदा वहात असतात. नाटकाचा सूत्रधार जसा पडद्याआड राहून रंगभूमीवरचें दृश्य नाटक जनतेसमोर प्रकट करतो. तद्वत् मानवी उत्क्रांतीचे सूत्रधार जगाच्या पाठीशीं राहून या शक्तीचा उपयोग करून घेत असतात. हिंदुस्थानातिल पुण्यक्षेत्रें हजारों वर्षांपूर्वीं स्थापण्यांत आलेलीं आहेत. त्यांपैकीं पुष्कळ, आर्यलोक हिंदुस्थानांत येण्याच्या अगोदरचीं आहेत. कांहीं ज्ञानी पुरुषांनी तीं स्थापलेलीं आहेत. अदृश्य सृष्टींतल्या नियमांनुसार तेथून अदृश्य शक्तीच्या ऊर्मी सतत फांकत रहाव्या अशी योजना त्या ज्ञानी पुरुषांनीं केलेली आहे. (पहा Alcyone's Lives, Vol. I Life 22 )

या शक्तीचा राष्ट्रजीवनाला व व्यक्तिजीवनाला फायदा होत असतो. ज्याला कांहीच समजत नाहीं अशा माणसालाही तिचा फायदा होत असतो. अज्ञमाणसाला जसा चांगल्या हवेचा फायदा होऊन त्याची प्रकृति सुधारते, तद्वत् पुण्यक्षेत्रांत गेल्यानें त्याचीही थोडीफार प्रगति होते. सुज्ञ माणसाला त्याचा पुष्कळ जास्त फायदा होतो. चांगल्या हवेच्या ठिकाणीं शरीरप्रकृति सुधारण्यासाठीं जर एकादा सुज्ञ माणूस गेला तर प्रकृति सुधारण्यासाठीं तो योग्य

व्यायाम घेणें, योग्य अन्न खाणें, योग्य व्यवसाय करणें वगैरे गोष्टी करून पुष्कळच अधिक फायदा आपल्या पदरांत पाडतो, तद्वत् सुज्ञ माणसांना असल्या क्षेत्राचा जास्त उपयोग होतो. अध्यात्मप्रगतीचा जो अगोदरच प्रयत्न करीत आहे त्याला पुण्यक्षेत्रांतील शक्ति प्रगतिमार्गावर जास्त जलदीनें पुढें नेत असते.

हल्लीं हीं तीर्थें अवनत झालीं आहेत. या अदृश्य शक्तीला चांगला वाव मिळेल असे वातावरण तेथे राहिलेलें नाहीं. पुष्कळ क्षेत्रांत अनीति, अस्वच्छपणा, लोभ, लबाडी यांचेंच वातावरण पसरलेलें आहे. तसेंच भोळसटपणाचेंही वातावरण त्यांत असल्यामुळें संतति, संपत्ति वगैरे लौकिक आकांक्षा मनांत धरूनच पुष्कळ यात्रेकरू तेथे जात असतात. या सर्व बाबतींत सुज्ञ माणसांकडून योग्य त्या सुधारणा घडवून आणणें अत्यंत आवश्यक आहे. त्या घडवून आणतांना या क्षेत्रांतील दृश्य गोष्टींचा विचार होणें जसे जरूरीचें आहे, तसेंच अदृश्य गोष्टीचा विचार होणेंही जरूरीचें आहे. त्याबाबत या पुस्तकाचा थोडातरी उपयोग होईल अशी आशा आहे.

ठाणे<br>९ जुलै १९८२ } ( सही ) **राजाराम सखाराम भागवत.**

---

# खाजगी चार शब्द.



सेवानिवृत्त झाल्यानंतर अध्यात्मवाङ्मयाचा अभ्यास करण्यास मला अधिक सवड मिळाली. त्या वाचनांत वरचेवर अनेक पवित्र तीर्थांचा उल्लेख दृष्टीस पडला व त्याचा मनावर इतका परिणाम झाला कीं, तीं तीं क्षेत्रें पाहिल्याविना मनास चैन पडेना. बऱ्याच तीर्थयात्रा केल्या व अशा तीर्थयात्रा करीत असतां १९३६ च्या उन्हाळ्यांत हरद्वार व हृषीकेश येथें काहीं दिवस राहिलों. तेथें श्रीनगर ( गरहवाल ) येथील रहिवाशी, ब्रह्मचारी चक्रधरशर्मा यांची अचानक भेट झाली. ब्रह्मचारीबावांच्यासारखा सर्व हिमालयांतील प्रवास फारच थोड्या लोकांनीं केला आहे. अनेक वेळां हिमालयांतील अत्यंत अवघड अशा ठिकाणांचा प्रवास करून पुष्कळ जवळचे मार्ग त्यांनीं शोधून काढले आहेत. व " A guide to Bhadirnath Yatra " म्हणून इंग्रजीत व दुसरीं पुस्तकें हिंदींत त्यांनीं लिहिलीं आहेत व यात्रेकरूंच्या सहाय्याकरितां बऱ्याच सेवासामिती स्थापन केल्या आहेत. अशा अधिकारी पुरुषाच्या भेटीमुळें हिमालयातील चार धामांची यात्रा आपण केलीच पाहिजे, असें सारखें मनांत घोळूं लागले. परंतु १९३९ पर्यंत काहीं ते जुळलें नाहीं. अखेर १९३९ च्या जून, जुलई, आगस्ट महिन्यात ही यात्रा करण्याचा योग जुळून आला.

घरीं परत आल्यानंतर प्रवासांत केलेलीं टिपणे पहात असतां असा विचार मनांत आला कीं, काही पुस्तकात हिमालयातील चार धामांच्या यात्रेबद्दल अकारण भीति व संशय वर्णिली आहेत; तेंव्हा त्याबद्दल स्वतःचा अनुभव बहुजनसमूहास सागावा, त्यांची भीति नाहींशी करावी व हिमालयांतील चार धामांच्या यात्रेची गोडी त्याच्या मनात उत्पन्न करावी म्हणून टिपणांवरून सर्व यात्रेची हकीकत लिहून काढली. " चित्रमयजगत्"च्या व्यवस्थापकांनीं मोठ्या उत्साहानें ती चित्रमयजगतांत आधीं प्रसिद्ध करून नंतर पुस्तकरूपानें प्रसिद्ध करण्याचें आश्वासन दिलें. सुरवातीचा काही भाग दोन तीन अंकांत प्रसिद्धही केला. परंतु कागदावरील नियंत्रणामुळें त्या मासिकाचा आकारच व्यवस्थापकाना ३६ पृष्ठांपर्यंत कमी करावा लागला व बाकीचा मजकूर देऊन हें यात्रावर्णनही प्रसिद्ध करणे त्याना अशक्य झालें. त्यांची अडचण जाणून मीं

स्वतःच हें पुस्तक छापून प्रसिद्ध करण्याचें ठरविलें. चित्रमयजगत्च्या व्यवस्थापकांनीं फक्त चार महिन्यात पुस्तक छापून देऊन मला पुस्तक बाहेर काढण्यास सहाय्य केलें त्याबद्दल त्यांचे आभार मनःपूर्वक मानले पाहिजेत.

ब्रह्मचारी चक्रधरशर्मा यांच्या पुस्तकांतील माहितीचा प्रवासांत व पुस्तक लिहितांनाही फार उपयोग झाला याबद्दल मी त्यांचा फारच ऋणी आहें.

प्रो. राजाराम सखाराम भागवत, M. A. यांनीं आपला अमूल्य वेळ खर्चून प्रस्तावना लिहून दिली याबद्दल त्यांचे आभार मानावे तितके थोडेच आहेत.

पुस्तकाची किंमत ठेविली आहे त्यापेक्षांही कमी ठेवण्याचा विचार होता; परंतु कागदाच्या महागाईमुळें ती आतां ठेविली आहे त्यापेक्षां कमी ठेवता येणें अशक्य झालें. शंभरातून एकदोघांना जरी हे पुस्तक वाचून ही यात्रा करण्याची इच्छा उत्पन्न झाली तरी या पुस्तक-लेखनाचा हेतु सफळ होईल.

लाखेरी, ११ जुलै १९४२ सीताराम गोविंद राजे.

---

# शुद्धिपत्रक

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ३२ | ३० | हीं देवळें | हे शब्द |
| ३३ | १ | आहेत | नकोत |
| ३८ | १४–१५ | संध्याकाळीं | संध्याकाळ |
| ४३ | ८ | व | |
| ५४ | १७ | कोपऱ्यास | कोपऱ्यांत |
| ७३ | २२ | दुकानदा रच | दुकानदारच |
| ७४ | ४ | इन्स्पेक्शन,बंगला | इन्स्पेक्शन बंगला |
| ९१ | १२ | वाजत | वाजतां |
| १०० | २१ | झडू | झेंडू |
| १०२ | ५ | बदरीनाथपुरा | बदरीनाथपुरी |
| १०३ | ३ | शिरतान | शिरतांना |
| ११८ | ७ | भागावर केलेली | भागावर वर केलेली |
| ११९ | ८ | रावजी | रावळजी |
| ११९ | १७ | कुटुंबाला | कुटुंबाचा |
| १३१ | ९ | गोचर | गौचर |
| १३१ | १२ | हॉटेलसारखा | हॉटेलसारखी |
| १४३ | २८ | लोखंडा | लोखंडी |

---

# अनुक्रमणिका.



## चित्रांची नांवनिशीवार यादी.

# तुम्हांला हिमालयांत जायचें आहे काय?

## तीर्थयात्रा.

प्रत्येक धर्मांत तीर्थयात्रेस महत्त्व दिलें आहे. पहिल्या रिचर्डच्या कारकीर्दीनंतर बऱ्याच पुढच्या कालांत देखील ख्रिश्चन लोक येशू ख्रिस्ताची जन्मभूमि बेथलेहेम ( Bethlehem ) येथें जाऊन सेवा करीत असत. जपान व चायनासारख्या दूरदूरच्या प्रदेशांतील बौद्धधर्मी लोक ज्या ठिकाणीं महात्मा गौतमबुद्ध निर्वाणास पोहोचले, त्या गया येथील निरंजनीबोधी वृक्षाची सेवा तेथे जाऊन करतात. मुसलमान लोक सुद्धां तितक्याच उत्सुकतेनें अरेबियामधील महमद पैगंबराची जन्म व निधनभूमि मक्का व मदिना येथे जातात. त्याचप्रमाणें हिंदूंच्या देखील नानाविध तीर्थयात्रा आहेत. हिंदुधर्माखेरीज इतर धर्मांत तीर्थयात्रेच्या ठिकाणांचें महत्त्व व पवित्रता फक्त एकतर्फी आहे. म्हणजे इतर धर्मांत त्या त्या धर्माच्या संस्थापकांचीं जन्म अगर निधनस्थानें हीं तीर्थयात्रेचीं ठिकाणें मानलीं जातात. हिंदु लोकांत देखील कांहीं महात्म्यांचीं जन्म व निधन-स्थळें पवित्र मानतात. परंतु हिंदूंच्या इतर पवित्र तीर्थांच्या मानाने अशीं स्थानें फारच थोडीं आहेत.

उत्तरखंड–हिमालयांतील सृष्टिसौंदर्याचीं नानाविध देवालयें, विराट, शिवलिंग, कैलास पर्वत वगैरेंचा शोध गतकालीन ऋषींनीं लावला असें पद्मपुराणावरून स्पष्ट दिसतें.

हिमालयांतील ( उत्तरखंडांतील ) यम्नोत्री, गंगोत्री, केदार व बदरी हीं तीर्थें समुद्रसपाटीपासून सरासरी १०,००० फूट उंचीवर आहेत; व हीं वर्षांतून सहा सात महिने बर्फाच्छादित असतात. धर्मश्रद्धेच्या बाबतींत सर्व भारतवर्ष ह्या चार पवित्र तीर्थांशीं संलग्न झाला आहे.

## हिमालयांतील प्रवासापासून होणारे फायदे.

उत्तरखंड–हिमालयांतील तीर्थयात्रेचा, दोन सव्वादोन महिने सतत चालू रहाणारा मोठमोठ्या पर्वतांमधील लांबचा प्रवास केवळ मानसिक सुख देतो; इतकेंच नव्हे, परंतु ह्या प्रवासानें हृदयक्रियेचे अनेक लहानसहान रोग देखील बरे होतात असा पुष्कळांचा अनुभव आहे. हा प्रवास हृदयक्रियेस

जोर व बळकटी आणतो. रक्तशुद्धीच्या सर्व धमन्यांची रचना आणि फुफ्फुसें, ह्या प्रवासानें पूर्णपणें शुद्ध होऊन चांगलीं सुधारतात. आजारी मनुष्यास देतात त्या बाष्पस्नानाची ( Steambath ) ह्या प्रवासांत जरूर नसते. कारण रोज होणाऱ्या मजल दरमजल चालीनें यात्रेकरूला विपुल घाम येत असतो आणि रोजच्या चढणी-उतरणींचा फुप्फुसावर अद्‌भुत परिणाम होत असतो. सर्व शरीर प्राणवायुयुक्त ( Oxygenated ) ताज्या रक्तानें भरून जात असतें. देवदाराच्या सुगंधानें मिश्रित व नैसर्गिक हवा शुद्ध करणाऱ्या द्रव्यांनीं ( Disinfectants ) भरलेली देवदाराच्या वृक्षा-( Pine trees ) पासून वाहणारी वाऱ्याची सौम्य झुळूक, फुप्फुस स्वच्छ करीत असते व त्यामुळें फुप्फुसाचे रोग बरे होतात. अंगानें स्थूल असलेल्या मनुष्याची बाजवीपेक्षा जास्त असलेली चरबी कमी होते. म्हणून, उत्तरखंड-हिमालयातील तीर्थयात्रा, कोठ्याचे रोग ( Stomach troubles ) मूत्राशयाचे रोग, निरनिराळे त्वचा-रोग वगैरे बरे करण्यास फार उपयोगी आहे. प्रकृति सुधारण्याच्या हेतूनें ही यात्रा करणें असल्यास, यात्रेकरूनें सर्व प्रवासांत नियमितपणानें वागावें. ' सों सों ' आवाज करीत वाहणाऱ्या अनेक नद्या, त्याच्या पाण्याचे स्रोत व फेसानें भरलेले त्याचे संगम, ह्याच्या बाजूनें व किनाऱ्यानें चालवेल तितके, आस्ते आस्ते चालावें. असें केल्यानें आरोग्यात भर पडेल व प्रकृति निकोप होईल. यात्रेचा खराखुरा फायदा म्हणजे, मानसिक व शारीरिक सुख भोगणें असल्यास निरोगी मनुष्यानें देखील रोज आठ दहा मैलापेक्षां जास्त चाल करूं नये.

यम्नोत्री, गंगोत्री, केदारनाथ व बदरीनाथ ह्या यात्रा करीत असतां यात्रेकरूनें डोडीताल, वसुकीताल, लोकपाल व सतोपंथ ( सत्यपंथ ) हीं थोड्या आडमार्गावर असलेलीं ठिकाणें पहाण्याचा शक्य असल्यास यत्न करावा. ह्या ठिकाणांच्या अत्युत्कृष्ट सृष्टिसौंदर्याचा, यात्रेकरूंच्या आत्मिक व मानसिक वृत्तीवर, स्वाभाविकपणें सुखकारक परिणाम झाल्यावांचून रहाणार नाहीं, असा आमचा स्वतःचा अनुभव आहे.

## बदरीनाथ यात्रा.

बदरीनाथ, केदारनाथ व उत्तरखंड-हिमालयांतील फार प्राचीन काळचीं इतर तीर्थें व सृष्टिसौंदर्याचीं भव्य दृश्यें, आयुष्यांत निदान एकवेळ पाहिलीं पाहिजेत असा मनापासून दृढनिश्चय केल्यास, हिमालयांतील अवर्णनीय

खिडी, सर्पासारख्या वक्रगतीनें वाहात जाणाऱ्या नद्या, मखमालीसारख्या दिसणाऱ्या हिरव्यागार उंचसखल पर्वतांच्या टेकड्या व सपाट्या, उंच उंच बर्फाच्छादित पर्वतांचीं रुपेरी हिमशृंगें, त्यांच्या दरडीवरून खालीं घसरत येणाऱ्या हिमनद्या ( Glaciers ) बर्फाच्छादित खडकांमधून कडाडत वाहाणारे शुभ्र जलौघ व पाण्याचे स्रोत, व अत्युत्कृष्ट सृष्टिसौंदर्याचीं इतर दृश्यें अवलोकन करून, मनास आल्हाद होण्याची संधि ईश्वराच्या कृपेनें खात्रीनें येईलच येईल.

## उत्तरखंड–हिमालयांतील तीर्थें.

**पंचबद्री**—विशालबदरी, ध्यानबदरी, योगबदरी, वृद्धबदरी व भविष्यबदरी.

**पंचकेदार**—केदारनाथ, मध्यमहेश्वर, तुंगनाथ, रुद्रनाथ व कल्पेश्वर. यम्नोत्री, गंगोत्री, केदारनाथ, तुंगनाथ त्रिजुगीनारायण व बदरीनाथ ह्या तीर्थांनाहि ' पंचकेदारी ' असें म्हणण्याचा प्रघात पहाडी लोकात आहे.

**पंचप्रयाग**—देवप्रयाग, रुद्रप्रयाग, कर्णप्रयाग, नंदप्रयाग व विष्णुप्रयाग.

**पंचताल**—डोडीताल, सप्तरुद्रताल, वसुकीताल, लोकपालताल व सतोपंथताल.

**पंचतीर्थ**—वन्हितीर्थ, प्रल्हादकुंड, नारदकुंड, कूर्मधारा व लक्ष्मीधारा, हीं सर्व तीर्थे बदरीनाथ येथें आहेत.

**पंचशिला**—नारदशिला, नृसिंहशिला, वराहशिला, गणेशशिला व कुबेरशिला, हीं देखील बदरीनाथ येथें आहेत.

## बदरीनाथ व बदरिकाश्रम

**बदरीनाथ**-बदरिकाश्रम, पृथ्वीवरील सृष्टिदेवीच्या सौंदर्याचें सर्वोत्कृष्ट देवालय, प्रत्यक्ष नंदनवन आहे. ह्या पुरातनकालीन तीर्थाच्या सृष्टिसौंदर्याचें अद्भुतकथामय वर्णन आपल्या धर्मग्रंथात दिलेलेंच आहे. प्रचंड हिमाचलाच्या ह्या भागांत हिमनद्यांचें ( cataracts ) शुभ्र स्रोत, बर्फाच्छादित अनेक खडकांमधून वाहताना ध्वनि–प्रतिध्वनि करीत असतात. मेघ गडगडत असतात. विजेचें चमकणें व कडाडणें चालूं असतें. शुभ्र हिमजलाचे लहानसहान नाले मधुर ध्वनि काढीत असतात. मखमाली गालिच्यासारख्या हिरव्यागार गवतानें आच्छादित लहानमोठ्या टेकड्यांवरील नानाविध रंगीबेरंगी पुष्पांनीं

फुललेल्या वनस्पतींचा सुगंध सुटलेला असतो. मेघांमधून झिरीमिरी पडणाऱ्या पावसांत व उंचीवरून खालीं पडणाऱ्या जलौघांच्या नजीक बाष्पमय वातावरणांत इंद्रधनुष्य चकाकताना दृष्टीस पडतें. हुबेहूब चित्राप्रमाणें दिसणारीं हीं भव्य दृश्यें अवलोकन करताना यात्रेकरूंच्या अंतःकरणांत परमपूज्य भावना जागृत होते.

श्रीविष्णूच्या पुष्कळ अवतारांपैकीं, सहस्रकवच नांवाच्या राक्षसाचा वध करण्याकरितां विष्णूनें घेतलेल्या नरनारायण अवताराचा, बदरीनाथ–आश्रम आहे. येथें ऋषि नर–नारायण जगाच्या कल्याणासाठीं तपश्चर्या करीत आहेत अशी समजूत आहे. हें स्थान समुद्रसपाटीपासून १०,५०० फूट उंचीवर आहे. येथें १२२° फयारनहीट उष्णतेचें मोठें गरम कुंड आहे. ह्या स्थानाच्या सभोंवतीं हिमाच्छादित उंच उंच पर्वत आहेत. भारतवर्षातील, बदरीनाथ, जगन्नाथपुरी, रामेश्वर व द्वारका ह्या चार धामापैकीं बदरीनाथ अत्यंत पवित्र धाम मानलें आहे. बदरीनाथ, केदारनाथ, गंगोत्री, यम्नोत्री, पंचकेदार, पंचबदरी व पंचप्रयाग येथें दरवर्षी जवळ जवळ एक लाख यात्रेकरू जात असतात।

उत्तरखंड–हिमालयास पुराणात 'केदारखंड' म्हटलें आहे. ह्याचें क्षेत्र पूर्वेस पिंडारी हिमनदी–( Pindari glaciers ) पासून पश्चिमेस यमुना हिमनदी ( Yamuna glaciers ) पर्यंत, व उत्तरेस गंधमादन अथवा अलकापुरपासून दक्षिणेस मायापुरी–( हरद्वार ) पर्यंत आहे.

स्थूल बदरिकाश्रमाचा विस्तार श्रीनगर–( गरहवाल ) पर्यंत व सूक्ष्म बदरिकाश्रमाचा विस्तार नंदप्रयागपर्यंत आहे.

ह्या ठिकाणीं तपश्चर्या करीत असतां अगर या ठिकाणांची यात्रा करीत असतां ज्यांना मृत्यु येतो ते पापापासून मुक्त होऊन थेट स्वर्गलोकांस जातात, अशी दृढ समजूत आहे. ह्या चढणीच्या कठीण प्रवासांत कित्येकांना घेरी येते, कित्येक अतिसायासाने चालत असतात. तथापि, सर्पासारख्या वक्रगतीनें वाहात असलेल्या नद्या, अवर्णनीय खिंडी, हिमशृंगें, फेसभरित लाटांचें, पवित्र नद्यांचें, संगम ह्यांचें दृश्य व भागीरथी, मंदाकिनी व अलकनंदा ह्यांचा 'सोहं सोहं' असा सतत कानावर पडणारा ध्वनि, सर्व दिवसभर झालेल्या श्रमाचें दुःख कमी करतो.

## केदारनाथ.

अलकनंदेला मिळणाऱ्या मंदाकिनीच्या किनाऱ्यावर वसलेलें श्रीशंकराचें

वसतिस्थान केदारनाथ, समुद्रसपाटीपासून ११,५०० फूट उंचीवर, दलदलीत सपाटीवर आहे. हें स्थान केदारखंडांतील इतर धामांच्या मानानें अत्यंत थंड आहे. हिमाचलाच्या हिमश्रेणींपैकीं सतत बर्फाच्छादित असणाऱ्या हिमश्रेणींच्या अगदीं जवळ हें स्थान आहे. केदारनाथाच्या सभोंवतीं बर्फाच्छादित पर्वत आहेत. येथून १० मैलांवर समोर पूर्वेकडील पर्वतावर वसुकीताल नावाचें सुंदर सरोवर आहे. ह्या सरोवरासभोंवतालचें सृष्टि-सौंदर्य अवर्णनीय आहे. केदारनाथ रुद्रप्रयागापासून ५४ मैल आहे. वैष्णव बदरीनाथास जितकें पूज्य मानतात तितकेंच शैव केदारनाथास पूज्य मानतात. केदारनाथ द्वादश ज्योतिर्लिंगांपैकीं एक ज्योतिर्लिंग आहे.

## सध्यांची उत्तरखंड–यात्रा.

उत्तरखंड–हिमालयांतील गतकालच्या व सध्यांच्या यात्रेच्या परिस्थि-तींत पुष्कळच फरक आहे. अलीकडे टेहरी दरबार व विशेषतः ब्रिटिश सरकारचे अधिकारी, यात्रा–मार्गाच्या सुधारणेबद्दल बरीच कळकळ दाखवीत असतात व त्यामुळें दरवर्षी यात्रेकरूंची संख्या वाढत्या प्रमाणावर आहे.

उत्तरखंड–यात्रेच्या ६०० मैल प्रवासाच्या मार्गापैकीं अर्धा मार्ग टेहरी दरबारच्या अमलाखालील मुलुखांतून गेला आहे व दुसरा अर्धा भाग ब्रिटिश गरहवाल म्हणजे संयुक्तप्रांत सरकारच्या अमलाखालील मुलुखांतून गेला आहे.

टेहरी संस्थानचे राजे उत्तरखंडांतील तीर्थांचे धार्मिक संरक्षक आहेत अशी आख्यायिका आहे. तथापि हल्लींचे, टेहरीचे महाराज हिज हायनेस राजा नरेंद्रशहा ह्यांचें त्यांच्या अमलाखालीं असलेल्या मुलुखांतून गेलेल्या यम्नोत्री व गंगोत्री ह्या तीर्थांच्या मार्गाकडे विशेष लक्ष नसावें असें स्वानुभवावरून येथें नमूद करण्यास मोठी दिलगिरी वाटते. टेहरी दरबारनें हृषीकेशपासून देवप्रयागापर्यंत ४४ मैलांचा मोटारमार्ग बांधला आहे व हा मार्ग पुढें रुद्रप्रयागपर्यंत तयार करण्याची दरबारनें योजना केली आहे.

ब्रिटिश गरहवाल प्रांतांतून जाणारा यात्रामार्ग उत्तम स्थितींत ठेवण्या-करितां, त्याच्या दुरुस्तीकरितां व त्या मार्गावरील मुक्कामाच्या ठिकाणांच्या आरोग्यरक्षणार्थ डॉक्टर्स, सॅनिटरी इन्स्पेक्टर्स, झाडू, भंगी वगैरे ठेवण्याकरितां संयुक्तप्रांत सरकार, सालिना एक लक्ष रुपये खर्च करीत असते. परोपकार-बुद्धीच्या बऱ्याच श्रीमंत लोकांनीं, बाबा काळीकमलीवाला ह्या हृषीकेश

येथील सुप्रसिद्ध धार्मिक संस्थेमार्फत, यात्रामार्गावर धर्मशाळा बांधल्या आहेत, औषधालयें उघडलीं आहेत व सदावर्तें व पाणपोयी ठेवल्या आहेत. " हिमालय एअर ट्रॅन्सपोर्ट अँड सर्व्हे " कंपनीनें हरद्वारपासून गौचर व अगस्तिमुनि ह्या ठिकाणापर्यंत आकाशयानामधून ( Aeroplane ) आकाश-मार्गानें जाण्याची व्यवस्था केली होती; परंतु कंपनीनें आपला व्यवहार आटोपता घेतल्यामुळें, आकाशमार्गानें जाणें हल्लीं बंद आहे. एकंदरींत, ह्या सर्व गोष्टींचा विचार केला असतां उत्तरखंडांतील तीर्थांचा मार्ग पूर्वीपेक्षा हल्लीं बराच सोईचा झाला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

## पूर्वतयारीसंबंधीं सूचना.

उत्तरखंड—हिमालयांतील तीर्थांस जाणाऱ्या यात्रेकरूंनीं आपल्या खाण्या-पिण्याची फार काळजी घ्यावी. खाण्यापिण्याची विशेष काळजी न घेतल्यास दररोज होणाऱ्या हवापाण्याच्या फेरबदलाचा प्रकृतीवर अनिष्ट परिणाम होतो; एवढ्याकरितां यात्रेकरूंनीं पुढे दिलेल्या सूचना लक्षात ठेवाव्या:—

**पाणी**—होतां होईलतों पिण्यास झऱ्याचें पाणी स्वच्छ, निर्मळ व हलकें असतें. जेव्हां गंगेचें पाणी मिळण्याजोगें असेल तेव्हां तें भांड्यांत निदान पंधरा मिनिटें स्थिर राहूं द्यावें व त्यातील रेतीचे कण भांड्याच्या बुडाशीं साठल्यानंतर तें पिण्यास घ्यावें. फार पाणी पिऊं नये, कारण त्यामुळें पचनाक्रिया मंदावते.

**आहार**—पुऱ्या, मालपोआ वगैरे जडान्न मुळींच घेऊं नये. भात, डाळ, चपाती वगैरे हलका आहार नेहमीं ठेवावा.

**फळें**—कच्चीं व जास्त परिपक्व झालेलीं फळें खाण्याचे नेहमीं टाळावें.

**जोडे**—चढाऊ, साधारण सैल असे जोडे अगर रबराचे अथवा कापडी ( canvas ) शूज प्रवासांत वापरावे. जाड कातड्याचें अथवा जाड तळव्याचें पादत्राण वापरलें असतां तळव्यास फोड येतात.

**आजार**—वर दिलेल्या सूचनांप्रमाणें न वागल्यास यात्रेकरू आमांश, अतिसार, कॉलरा, संग्रहणी, पोटदुखी वगैरे रोगाने पछाडले जातात.

**औषधें**—वर सांगितलेल्या रोगांवरील पेटंट औषधें ( patent medi-cines ) यात्रेकरूनें बरोबर ठेवावीं हें फार चांगलें. कारण त्यांचा योग्य प्रसंगीं स्वतःसाठीं उपयोग होतो; इतकेंच नव्हे, परंतु प्रसंग पडल्यास तीं दुसऱ्यांना देऊन परोपकार करण्याची बहुमूल्य संधि मिळते.

# सर्वसाधारण माहिती

**हवामान**—उत्तरखंड–हिमालय अथवा टेहरी व ब्रिटिश गरहवाल हा मूळचा पहाडी मुलूख आहे; परंतु अलकनंदा व भागीरथी ह्या नद्यांच्या दऱ्या रुंद असून त्यांची जमीन रेताड व चिकणमातीची आहे व कांहीं ठिकाणीं रेताड चिरोट्या आहेत. बहुतेक यात्रामार्ग ह्या नद्यांच्या काठानें गेला आहे. ह्या दऱ्यांच्या भोंवतीं सर्व बाजूंस पर्वतांच्या श्रेणी असल्यामुळें मोकळी हवा खेळण्यास अडचण पडते. बऱ्याच लांबपर्यंत ह्या यात्रा–मार्गांची उंची समुद्रसपाटीपासून सरासरी २००० फुटापेक्षां जरा जास्त आहे. जुलै व ऑगस्ट महिन्यांत दुपारीं ११ पासून ३ पर्यंत ह्या दऱ्या सूर्याच्या प्रखर किरणांनीं उकळत पाण्याच्या कढईप्रमाणें तापलेल्या असतात; व म्हणून बदरीनाथच्या मार्गास चमोली अथवा लालसंगापर्यंत, व गंगोत्रीच्या मार्गास उत्तरकाशीपर्यंत अत्यंत उष्णता भासते. परंतु एकादे वेळीं दोन तीन तासांत देखील ढग येऊन हवेंत एकदम फरक पडतो.

यम्नोत्री, गंगोत्री, पंवाली, त्रिजुगीनारायण, केदारनाथ व बदरीनाथ, आणि साधारणपणें तितक्याच उंचीवर असलेलीं इतर महत्त्वाचीं ठिकाणें खेरीजकरून पुढचा प्रवास साधारण उष्ण प्रदेशांतून करावा लागतो.

वर नमूद केलेल्या ठिकाणांची हवा उन्हाळ्यातहि बहुतकरून बरीच थंड असते; परंतु जुलै, ऑगस्ट आणि सप्टेंबर महिन्यात दिवसा आल्हादकारक गारवा असतो.

थंड प्रदेशात क्षणोक्षणीं हवेंत फेरबदल होत असतो. घटकेंत आकाश स्वच्छ असून चकचकीत सूर्यप्रकाश पडलेला असतो. नंतर थोड्या वेळानें ढग येतात, कांहीं अवकाशानें पावसाची झिरीमिरी सुरू होते. पावसाचे थेंब येतात. एका घटकेनें पावसाची वृष्टि सुरू होते व दुसऱ्या घटकेंत मुसळधार पाऊस लागतो. एके ठिकाणीं गारांचा वर्षाव होतो तर दुसऱ्या ठिकाणीं बर्फ पडूं लागतें. एका क्षणांत ही सर्व स्थिति बदलते व दिव्य कंठमालेप्रमाणें शोभणाऱ्या इंद्रधनुष्यानें वेढलेलीं हिमशृंगें तेजस्वी सूर्यप्रकाशात चकाकतात. आतां आपण ९००० फूट उंचीवर असलों तर एका घटकेंत उतरून ३००० फूट उंचीवर येतों. एके वेळीं हिरव्यागार दाट जंगलामधून जात असलों तर दुसऱ्या वेळीं खोऱ्यांत येतों. जरा पुढें हिरव्यागार शेतांनीं भरलेली विस्तृत दरी लागते तर लागलीच दुसऱ्या घटकेला ओसाड रानांत

येतों. आता आपण पर्वताच्या उत्तरेस असलों तर एकदोन तासाच्या प्रवासानंतर आपण त्याच पर्वताच्या दक्षिणेकडील दरडीवर येतों. एका बाजूला सावली पडलेली असते तर दुसऱ्या बाजूला चकचकीत सूर्यप्रकाश पडलेला असतो. ह्या व हवामानाच्या इतर स्वाभाविक लक्षणाच्या योगानें हवेमध्ये सतत फेरबदल होत असतो व त्यामुळें प्रवासाचे श्रम हलके होऊन उत्साह वाटतो.

**आहाराच्या वस्तू**—बहुतेक मुक्कामाच्या ठिकाणीं आहाराच्या सर्व वस्तु मिळतात. देवप्रयाग, श्रीनगर, कर्णप्रयाग, चमोली ( लालसंगा ), बदरीनाथ व टेहरी येथें हरिद्वार अथवा डेहराडूनप्रमाणे दिनचर्येच्या हरतऱ्हेच्या वस्तु मिळतात, म्हणून जरूरीपेक्षा जास्त आहाराच्या वस्तु बरोबर घेऊं नयेत.

**वसतिस्थान**—बदरीनाथ व इतर सर्व तीर्थांच्या मार्गावर पब्लिक वर्क्स खात्याचे इन्स्पेक्शन बंगले आहेत; परंतु त्यात मुक्काम करणें असल्यास पौरी येथील पब्लिक वर्क्स खात्याचे इंजिनीयर अथवा टेहरी दरबारचे इंजिनीयर याची परवानगी आगाऊ घ्यावी लागते. काळीकमलीवाला क्षेत्राच्या धर्मशाळाहि महत्त्वाच्या ठिकाणीं आहेत. ह्यांखेरीज, दर एक दोन ते सहा मैलावर त्या त्या ठिकाणच्या पहाडी व्यापारी लोकांनीं—ह्यांना इकडे बनिया म्हणतात—हवाशीर, स्वच्छ झोपड्या—ह्याना चट्टया म्हणतात—तयार केलेल्या आहेत. ह्या चट्टयांचे मालक आपल्या दुकानांत धान्य, मीठ, मिरची, मसाला, किराणा व स्वयंपाकास लागणारीं भांडींकुंडीं ठेवतात,व ज्या चट्टीत आपण उतरतों त्या चट्टीच्या दुकानदाराकडून आहाराचे जिन्नस विकत घेतल्यास त्याबरोबर तो आपणास लागतील तेवढीं भांडीं-कुंडीं देतो. बदरीनाथ व केदारनाथ येथें पंड्ये आपल्या घरांत व त्यांच्या यजमानाकडून बांधून घेतलेल्या धर्मशाळांत यात्रेकरूंची सोय करतात.

**कपडालत्ता**—मुख्य तीर्थांच्या ठिकाणीं पंड्ये ब्लॅकेटें, रजई वगैरे यात्रेकरूंना पुरवितात व ह्या व इतर थंड हवेच्या ठिकाणीं असलेल्या काळीकमलीवाल्याच्या धर्मशाळेंतहि यात्रेकरूंच्या उपयोगाकरिता ब्लॅकेटें, रग्स, कामळीं वगैरेचा भरपूर सांठा ठेवलेला असतो. तथापि, खालीं नमूद केलेल्या वस्तु बरोबर ठेवाव्याः—

२ ब्लॅकेटें, १ पातळ रजई, १ अगदीं पातळ लेपडी ( लहान गादी ), १ पातळदरी, १ लोकरीचा मफ्लर, २ चादरी ( पलंगपोस ), १ बरसाती ( रेनकोट ), १ ओव्हरकोट ( जुना ), २ बनियन्स अगर गंजिफ्रॉक

( साधे कापडी ), २ गरम शर्ट्स, १ गरम स्वेटर, २ टॉवेल्स, ४ वार मेणकापड ( वॉटरप्रुफ ), १ हिमालयन स्टिक ( लाठी ), १ छत्री, १ हरिकेन लॅन्टर्न ( दिवा ), १ जोडी रबरी शूज, १ जोडी मजबूत जोडे अगर शूज, सहा वार जाड दोरी, शक्य असल्यास लहान कॅमेरा व दुर्बीण. मुख्य तीर्थांच्या ठिकाणीं देवालयात देणें असल्यास थोडें रेशमी कापड, खडीसाखर, खिसमिस, बदाम, खारीक, धूप, अगरबत्ती, चंदन, केशर वगैरे. स्वतःकरितां थोडा सुका मेवा, दिनचर्येस लागणारीं पेटंट औषधें, काड्यांच्या पेट्यांच्या डझनचें बंडल, चार ( कपड्यांचे ) साबू व आपल्या आवडीच्या किरकोळ वस्तु.

**वाहनें**—हृषीकेश येथील मुनिकीरिटी ह्या भागांत टेहरी दरबारच्या कूली एजन्सी ऑफिसमध्यें दंड्या, कंड्या, घोडीं व कूली मिळतात. ह्या ऑफिसांतील तांडेलमार्फत कूली ठरवावे व त्यांचीं नावें दरबारच्या रजिस्ट्रार कारकुनाकडून रजिस्टर करवावीं व त्याच्या पावत्या घ्याव्या. पुढें देवप्रयाग, रुद्रप्रयाग व भटवारी येथेंहि कूली एजन्सी ऑफिसें आहेत व तेथेंहि दंड्या, कंड्या, घोडीं व कूली मिळतात.

## अगत्याच्या सूचना.

प्रवासांत जेथें एखादें सृष्टिसौंदर्याचें दृश्य दृष्टीस पडेल तेथें चांगली सुरक्षित जागा पाहून तेथे जरा थाबावें व मग तें अवलोकन करावें. चालणें व पहाणें ह्या दोन्ही क्रिया एकदम करूं नयेत. हिमालयांतील सर्व प्रवासांत अमूल्य रत्नासारखीं सृष्टिसौंदर्याचीं भव्य दृश्ये ठिकठिकाणीं आढळतात. एवढ्यासाठीं अशा ठिकाणीं थांबावें, दृश्याची शोभा मनसोक्त अवलोकन करावी व पुढचा मार्ग धरावा.

सगळ्या दिवसाच्या प्रवासानें थकवा येऊन पाय दुखत असल्यास गरम पाण्यांत मीठ टाकून त्या पाण्यानें पाय शेकून धुवावे व त्यांना तेल चोळावें.

मुक्कामापासून पुढचा प्रवास सुरूं करण्यापूर्वीं हवामान कसें आहे तें लक्षपूर्वक पहावें. कारण एप्रिल व मे महिन्यांत बहुतकरून संध्याकाळीं वादळ सुटत असतें व फारच वारा वाहात असतो. पावसाळ्यांत देखील पाऊस पडत असल्यास पावसांत चालूं नये व विशेषतः बेलक व पंवाली ह्या ठिकाणीं फार सावधगिरीनें प्रवास करावा.

यम्नोत्री, गंगोत्री, केदारनाथ व बदरीनाथ ह्या चार धामांची यात्रा करणें असल्यास हृषीकेश येथून ता. १५ एप्रिल ते ३१ जुलैच्या दरम्यान निघावें.

बदरीनाथाची व केदारनाथाची ( बदरी–केदारची ) यात्रा करणें असल्यास हृषीकेश येथून ता. १५ एप्रिल ते ३० सप्टेंबरच्या दरम्यान निघालें तरी हरकत नाहीं.

फक्त बदरीनाथची यात्रा करण्यास हृषीकेश येथून ता. २५ एप्रिल ते १५ आक्टोबरच्या दरम्यान निघालें तरी चालतें.

बदरीनाथाच्या देवालयाचा पट ( दरवाजा ) उघडतात त्या विशिष्ट दिवसास ज्याना बदरीनाथ येथें हजर रहावयाचे असेल त्यांनीं त्या ठरलेल्या दिवसांपूर्वी १५ दिवस हृषीकेश येथून निघावें.

परंतु पट खुलण्याच्या दिवशीं तेथें हजर रहावयाचें नसेल व ज्यांना अत्यंत थंडी व बर्फ हीं टाळावयाचीं असतील त्यांनीं ता. १५ मे ते १५ आक्टोबरच्या दरम्यान हृषीकेश येथून निघण्यास हरकत नाहीं.

हृषीकेश तें देवप्रयाग हा ४४ मैलांचा प्रवास मोटारनें करतां येतो. ता. १ एप्रिल १९३५ पासून टेहरी दरबारनें हृषीकेशपासून देवप्रयाग-पर्यंत यात्रेकरूंच्या सुखसोयींकरितां मोटारचा रस्ता तयार केला आहे. हा रस्ता पुढे रुद्रप्रयागपर्यंत नेण्याची दरबारने योजना केली आहे. हा रस्ता ब्रह्मपुरी, शिवपुरी, वशिष्ठगुंफा, गालव–आश्रम, अत्रि–आश्रम, शृंगी–आश्रम, कौंडिण्य–आश्रम, दशरथाचल व आणखी बऱ्याच प्राचीन महत्त्वाच्या ठिकाणांवरून गेला आहे. ह्या मार्गाला देखील पायानें चाल-णाऱ्या यात्रेकरूंच्या सोईसाठी चार चार पाच पांच मैलांच्या अंतरावर चट्ट्या आहेत. ह्या ठिकाणांपासून मुनिकीरिटी व देवप्रयागपर्यंत यात्रेकरूंच्या सुखसोयींसाठीं टेलिफोन लाइनहि उघडली आहे. मार्गांत होणारे अपघात टाळण्याकरितां देवप्रयाग येथून मोटारी फक्त सकाळीं निघतात. ह्या मोटारी व बसेस्चे ड्रायव्हर्स अनुभविक व कुशल असे निवडलेले आहेत. त्यांच्यावर दरबारची कडक देखरेख असते.

## बाबा काळीकमलीवाला क्षेत्र, हृषीकेश.

स्वामी विशुद्धानंद ऊर्फ बाबा काळीकमलीवाले ह्यानीं इ. स. १८८४ सालीं प्रथम बदरीनाथ, केदारनाथ, यमनोत्री व गंगोत्री ह्या तीर्थांची यात्रा केली त्या वेळीं ह्या तीर्थांचे मार्ग चागले नव्हते. मार्गावर धर्मशाळा नव्हत्या. यात्रेकरूंकरितां कोणत्याहि प्रकारची खाण्यापिण्याची सोय नव्हती. यात्रेंत येणाऱ्या ह्या सर्व अडचणींचा पूर्ण अनुभव घेऊन, यात्रा करून परत आल्यानंतर स्वामींनीं ह्या अडचणी कायमच्या दूर करण्याचें

ठरविलें, व त्याच वर्षी त्यांनीं गंगेच्या कांठीं वसलेलें बदरीकेदारच्या यात्रेच्या सुरुवातीचें ठिकाण हृषीकेश येथें क्षेत्राची स्थापना करण्याची योजना केली. साधुसंन्याशांत व यात्रेकरूंत स्वामींना बाबा काळीकमलीवाले म्हणत. कारण हे एक काळ्या कांबळीशिवाय दुसरी कोणतीहि चीजवस्त बाळगीत नसत: म्हणून ह्या क्षेत्राची स्थापना झाल्यानंतर त्या क्षेत्राचें नांव



**स्वामी विशुद्धानंदजी काळीकमलीवाले.**

" बाबा काळीकमलीवाला क्षेत्र " असें पडलें. ह्या क्षेत्राकडून उत्तरखंड-हिमालयांतील तीर्थांच्या यात्रेकरूंची फारच चांगली सेवा होत असते. सुरुवातीस स्वामींनीं हृषीकेश येथें यात्रेस येणाऱ्या उदार, धनिक व्यापाऱ्यांकडून पैसे जमा केले व यात्रेच्या मार्गावर यात्रेकरूंकरितां अनेक प्रकारच्या सोयी केल्या व हृषीकेश येथें मोठमोठ्या धर्मशाळा बांधविल्या व अन्नछत्र स्थापन केलें. नंतर आस्ते आस्ते बदरीनाथ, केदारनाथ, यम्नोत्री, गंगोत्री व इतर तीर्थांच्या ठिकाणीं धर्मशाळा, सदावर्ते, औषधालयें, पाठशाळा, गोशाळा वगैरे स्थापन केल्या. पुढें पुढें ह्या क्षेत्रांची व्यापकता इतकी वाढत गेली कीं, आज बाबा काळीकमलीवाला नांवाचीं ७० सदावर्तें, ८० धर्मशाळा, १५ पासून २० पर्यंत औषधशाळा, ५ रुग्णालयें, ५० पाणपोया, ९ गोशाळा व ५ पाठशाळा निरनिराळ्या ठिकाणीं आहेत. हृषीकेश येथे ह्या संस्थेचें आयुर्वेदिक विद्यालय व प्रयोगशाळा ( Laboratory

व निर्माणशाळाहि आहेत. आज ह्या सर्व संस्थेचा खर्च दोन अडीच लाख रुपये असावा! संस्थेची मुख्य कचेरी (Head-office) हृषीकेश येथें असून त्याच्या शाखा ( Sub-offices ) गुप्तकाशी, जोशीमठ, यम्नोत्री, गंगोत्री, केदारनाथ, रुद्रप्रयाग व देवप्रयाग येथें आहेत. ह्या संस्थेच्या धर्मशाळांतील नोकर फारच विनयशील असून ते श्रीमान् व दरिद्री यात्रेकरूंची त्यांच्याकडून शक्य असेल तितकी सोय करतात. पुढें यात्रेंत कसें वागावें, खाण्याची, पिण्याची कशी काळजी घ्यावी, ह्यांबद्दल सूचना दिलेली छापील हस्तपत्रकें व मल-बद्ध, अतिसार, आमांश, पटकी ह्या रोगांवर व पाणी बाधूं नये म्हणून नित्यनेमानें घेण्याकरितां औषधांच्या लहान पुड्या यात्रेकरूंस



**बाबा रामनाथजी काळीकमलीवाले.**

हृषीकेश येथें देतात. गरीब परंतु लायक यात्रेकरूंना यात्रेच्या मार्गावर १०-१२ मैलावर असलेल्या मुक्कामास साधारण पोटास पुरेल इतकें सदावर्त शिधा मिळण्याकरितां चिठ्या हृषीकेश येथील मुख्य कचेरींत मिळतात. मिळालेला

शिधा कमी पडल्यास यात्रेकरूंची गैरसोय होऊं नये म्हणून यात्रेकरूंजवळ स्वतःचे निदान रु. १५ असल्याशिवाय चिठ्ठी देत नाहींत. एखादे समयीं लायक यात्रेकरूंस रक्कमहि संस्थेमधून देतात. श्रीमंत यात्रेकरूंनीं हृषीकेश येथील मुख्य कचेरींत रक्कम अनामत ठेवल्यास त्यांना ठिकठिकाणच्या शाखेवर ( Sub-offices ) हुंड्या संस्थेकडून दिल्या जातात. सारांश, श्रीमंत व गरीब यात्रेकरूंची यात्रा-मार्गावर गैरसोय जितकी कमी होईल तितकी कमी करण्याची शक्य ती तजवीज ह्या संस्थेकडून होत असते. ह्या संस्थेचा सर्व खर्च धनवान्, उदार, धार्मिक बुद्धि असलेल्या, मुंबई, कलकत्ता, नागपूर, लाहोर, कराची, दिल्ली, अलाहाबाद, लखनौ वगैरे ठिकाणच्या मोठमोठ्या व्यापारीवर्गांनीं धर्मार्थ दिलेल्या रकमांतून चालत असतो.



**बाबा मणीरामजी काळीकमलीवाले.**

स्वामी विशुद्धानंद विक्रम-शके १९५३ सालीं ब्रह्मीभूत झाल्यानंतर त्यांचे

पट्टशिष्य व उजवा हात असलेले बाबा रामनाथजी हे ह्या संस्थेची व्यवस्था पाहूं लागले. त्यांच्या कारकीर्दीत त्यांनीं ह्या संस्थेचा विस्तार बराच वाढविला.

इ. स. १९२६ सालीं बाबा रामनाथजी ह्याचा अंत झाल्यानंतर बाबा मणीरामजी हे व्यवस्था पाहूं लागले व पुढें इ. स. १९२८ सालीं बाबा मणीरामजी ह्यांनीं "व्यवस्थेकरितां ताब्यांत घेतलेली धार्मिक मालमत्ता ( Religious Trust )" म्हणून ही संस्था रजिस्टर करून घेऊन मॅनेजिंग ट्रस्टी म्हणून ह्या संस्थेची व्यवस्था आज ते पहात आहेत.

## यात्रेसंबंधीं सुचलेले विचार.

प्रवासांत आढळणाऱ्या अनेक प्रकारच्या वनस्पती, गंधकासारख्या खानिज पदार्थांच्या पर्वतटेकड्या, अभ्रकाचे, शिलाजिताचे व इतर निरनिराळ्या रंगाचे खडक, दगडी पाटीचे ( Slate Stones ), चुन्याचे व सीमेंटचे डोंगर, निरनिराळ्या झऱ्याचें खनिज पदार्थांनीं मिश्रित जल ( Mineral waters ), वगैरे अवलोकन केल्यानंतर असे विचार सुचतात कीं, आमच्या इकडील हायस्कूल्स व कॉलेजांतील विद्यार्थी, शिक्षक, स्काउटस् व स्काउट मास्टर्स ह्यांच्यापैकीं कांहीं उन्हाळ्याच्या सुट्टींत पाळीपाळीनें जर हिमालयातील ह्या यात्रा करण्याचा नेम ठेवतील तर त्यांच्यापैकीं एकदोन तरी पहिल्या प्रतीचे वनस्पतिशास्त्री व भूगर्भशास्त्री होऊन मागासलेल्या, परंतु कच्च्या द्रव्यांनीं ( Raw materials ) भरलेल्या आपल्या देशांतील उद्योगधंद्यास उन्नतदशेस आणतील. पदवीधर, डॉक्टर्स व वैद्य, फावल्या वेळात हा प्रवास करतील तर त्यांना त्यांच्या धंद्यांत हिमालयांतील अनेक औषधीवनस्पतीचा उपयोग करण्याची संधि मिळेल. हा प्रवास संशोधनाच्या दृष्टीनें करण्यास द्रव्यबळ पाहिजे, ही गोष्ट खरी आहे. तथापि, त्या बाबतींत अलीकडे अस्तित्वांत आलेलीं लोकसत्तात्मक प्रांतिक मंत्रिमंडळें व विशेषतः आमचे संस्थानिक पाळीपाळीनें, दरवर्षीं पाश्चात्य देशांतून इकडे येणाऱ्या हिमालयन एक्सपिडिशन्स ( Himalayan Expeditions ) सारख्या आमच्या देशांतील विद्यार्थ्यांच्या, स्काउट्सच्या, स्काउट-मास्टर्सच्या डॉक्टरांच्या व वैद्यांच्या संशोधक मोहिमेस (Research Expeditions) सढळ हातानें मदत करतील तर, हिमालयांत अमुक औषधि मिळते असें एकाद्या पाश्चात्यांनीं तिकडे जाऊन प्रसिद्ध करण्याऐवजीं, आमच्या देशांतील वनस्पतिशास्त्री अगर भूगर्भशास्त्री प्रसिद्ध करूं शकतील.

---

# तुम्हांला हिमालयांत जायचें आहे काय?

## प्रवासास सुरुवात.

स. १९३९ ह्या वर्षाचा कार्यक्रम ठरवितांना, ह्या वर्षी हिमालयांतील चार-धामांची यात्रा करावयाची असें आम्ही ठरविले होतें. परमेश्वरकृपेनें वर्षाच्या सुरुवातीचा एप्रिलपर्यंतचा कार्यक्रम पुरा झाल्यानंतर मे महिन्यांत कालीकमलीवाला संस्थेचे प्रमुख बाबा मणीराम यांजकडून व इतर ठिकाणांहून यात्रेचें अलीकडचे वाङ्मय मागविलें; गढवाल गॅझेटिअर मागविला. ह्यांच्या अभ्यासानंतर गुरुवार ता. ८ जून १९३९ रोजीं घरून निघालों तों ता. ९ रोजीं दिल्लीस पोहोंचलों. हिमालयांतील प्रवासांत लागणारें जरूरीचें सामान दिल्ली येथें खरेदी केलें; व रात्रीं डेहेराडून मेलनें दिल्ली येथून निघालों व ता. १० रोजीं सकाळीं हारिद्वार येथें आलों. येथील पंडा कुंभकर्ण व बदरीनाथचा पंडा दौलतराम ह्यांच्या मदतीनें पुढच्या प्रवासांत बरोबर नेण्याकरितां अनुभविक व माहीतगार नोकर ठरविला व त्याच दिवशीं तिसऱ्या प्रहरीं मोटारनें हृषीकेश येथें आलों. आम्ही कालीकमलीवाल्याच्या विस्तृत धर्मशाळेंत मुक्काम केला.

### शनिवार ता. १० जून १९३९.

संध्याकाळीं, उत्तरखंडांतील चार धाम, म्हणजे यम्नोत्री, गंगोत्री, केदारनाथ व बदरीनाथ येथें जाऊन, परत हृषीकेश येथें पोहोंचविण्याचा करार करून दंडीकरितां चार कुली रु. १९० ला ठरविले. त्यांना सदरहू रु. १९० खेरीज टेहरी दरबारने मंजूर केलेल्या नियमाप्रमाणें प्रत्येक धामास पोहोंचल्यावर रु. ४ बक्षीस, चार शेर खिचडीकरितां रु. १ व प्रत्येकास रोज अर्धा आणा छबिन्याकरितां· म्हणजे चण्याकरितां देण्याचें ठरलें व त्याप्रमाणें मुनिकीरिटी

येथील टेहरी दरबारच्या ऑफिसांत सदरहू ठराव रजिस्टर करून घेतला. नंतर रु. १८ ला नवी दंडी मेणकापडी छताची, नव्या कातडी पट्टयांची विकत घेतली. त्याचप्रमाणें सामानाकरितां रु. ८६ ला एक व रु. ३० ला एक असे दोन नेपाळी कुली ( बोजेवाले ) ठरविले व त्यांचा ठरावहि रजिस्टर करून घेतला. स्वयंपाक व इतर काम करण्यास व सर्व तऱ्हेची मदत करण्यास



‘ दंडी ’ वाहन.

एक क्षत्रिय म्हणजे ठाकूर जातीचा मनुष्य ज्यानें बऱ्याच वेळां चारी-धामांच्या सफरी पायानें इतर गृहस्थांबरोबर केल्या होत्या व जो देवप्रयागचे नजीकच्या गांवांतील रहिवाशी असल्यामुळें ज्याला इकडील पहाडांची पूर्ण माहिती होती असा रु. ३० ला हरिद्वार येथील पंडा कुंभकर्ण यांच्यामार्फत ठरविला होता. ह्या मनुष्यानें सर्व यात्रा संपवून आम्ही हरिद्वार येथें परत येईपर्यंत आमची नोकरी करावयाची असें ठरलें होतें, व नोकरी इमानेइतबारें केल्यास यात्रा संपूर्ण झाल्यानंतर त्यानें काम आमच्या मनाप्रमाणें केलें असें वाटल्यास त्याला बक्षीस म्हणून रु. १० द्यावयाचें ठरलें होतें.

## यम्नोत्तरी–गंगोत्रीची यात्रा.

### ( यम्नोत्तरीची यात्रा )

### रविवार ता. ११ जून १९३९. दिवस १ ला.

हृषीकेश येथून आम्ही दुपारीं ३॥ वाजतां निघालों व कांहीं वेळ मोटर-मार्गानें, कांहीं वेळ रानांतील पायवाटेनें ( इकडे पायवाटेस पगदंडी म्हणतात. )

प्रवास करून **नरेंद्रनगर** येथें संध्याकाळीं ७ वाजतां पोहोंचलों. हृषीकेश ( मुनिकीरिटी ) येथून नरेंद्रनगर मोटारच्या रस्त्यानें १० मैल व पगदंडीनें ५ मैल आहे. पगदंडीनें बहुतेक ५ मैल चढाव आहे व कांहीं ठिकाणीं रस्ता ४ फूट तर कांहीं ठिकाणीं २ फुटांपासून १॥ फूटपर्यंत अरुंद आहे. सुमारें १॥ मैल चढल्यावर हिरवींगार झाडांचीं रानें व नागमोडीनें वाहाणारे गंगा नदीचे रम्य पात्र दिसूं लागले. मध्यें एक दोन ठिकाणी 'पीयलस' म्हणजे पाणपोई लागल्या. गावांत शिरताना एक उत्तम बांधलेली धर्मशाळा लागली; परंतु तेथें दिल्लीकडील १०।१२ गाणारणी व त्याच्याबरोबरील साजिंदे उतरले होते, तेव्हा तसेच जरा पुढें बाजारापर्यंत येऊन बाजारांतील एका चहा-वाल्याच्या दुकानाच्या व्हराड्यावर रात्र काढली.

## नरेंद्रनगर.

नरेंद्रनगर हें सध्याचे टेहरीचे राजे नरेंद्रशाहा यांनीं वसाविले आहे. हें समुद्र-सपाटीपासून सुमारें ३००० फूट उंचीवर आहे! हल्लींचे राजे टेहरीस न राहतां येथेच राहतात. सरकारी कामगारांकरितां व ऑफिसाकरितां ठिक-ठिकाणच्या सपाटीवर इमारती बाधलेल्या आहेत व गांवात पाण्याची चांगली सोय केली आहे.

## सोमवार ता. १२ जून १९३९. दिवस २ रा.

सकाळीं ४ वाजतां नरेंद्रनगर सोडले, व तेथून सुमारें ११ मैलांवर असलेल्या **फकोट** *चट्टीवर नऊ वाजून वीस मिनिटांनीं पोहोंचलों. येथपर्यंत साधारण खडबडीत असा मोटारचा रस्ता आहे. सुरुवातीला ह्या रस्त्याच्या दोन्ही बाजूस उतरत्या सपाटीवर वसलेलीं खेडीं व शेतें आहेत व कांहीं ठिकाणीं सुरूच्या झाडाचीं जंगलें पर्वताच्या शिखरापर्यंत वाढलेलीं आहेत. पुढें पुढें पाहाडी रस्त्यास सुरुवात झाल्यावर एका बाजूस पर्वताचा उंच कडा व दुसऱ्या बाजूस खोल दऱ्या दिसूं लागल्या. अशा रस्त्यानें आम्ही फकोटचट्टीस ९-२० ला पोहोंचल्यावर तेथें जेवणाकरिता मुक्काम करण्याचें ठरविलें. फकोट येथे टेहरी संस्थानचा डाक-बंगलाहि आहे. चट्टीपासून पाणी बरेंच दूर आहे. येथे स्नान, पूजा वगैरे नित्यक्रम व भोजन आटोपून थोडीशी विश्रांति घेतली व सुमारें २-३० ला फकोट येथून निघालों, व सुमारें ५

---

* चट्टी म्हणजे भोजन करण्याकरिता व राहण्याकरिता लहानशी जागा; व भांडीं, शिधा, लाकडें वगैरें पुरविणारें दुकान.

मैलावर असलेल्या **जाजल** नांवाच्या गांवीं सुमारें ४ वाजतां पोहोंचलों. हा गांव हिंवन नदीच्या बाजूस असलेल्या दरींत आहे. ही हिंवन नदी पुढें शिवपुरीजवळ भागीरथीस मिळते. फकोटपासून पुढें आम्ही पगदंडीनें जाजल येथें आलों. कारण मोटारच्या रस्त्यावर सुरुंगाचें काम चालूं होतें. दरम्यान हिंवन नदीवरील दोन लाकडी फळ्यांचे पूल ओलांडावे लागले. नंतर पुढच्या दोन पुलाची दुरुस्ती चालली होती; त्यामुळें आम्हास ह्या दोन ठिकाणीं अत्यंत अवघड अशा पगदंडीनें जावें लागलें. नंतर संध्याकाळीं सातच्या सुमारास आम्ही नागनी–चट्टीस पोहोंचलों. **नागनी** जाजलपासून पांच मैल आहे. रस्त्याच्या एका हातास उंच डोंगर व दुसऱ्या हातास खोल दरींतून वाहात असलेली हिंवन नदी दिसत होती. डोंगराच्या काहीं भागावर सुरूचीं रानें व काहीं भागावर पायऱ्यासारखीं शेतें होती. मधे मधे काहीं डोंगर केवळ कोळशासारख्या काळ्या दगडाचे व काहीं स्लेट दगडाचे होते. उंचीवरून वाहात येणाऱ्या झऱ्याचें पाणी शेतातून खेळविलें होते. काहीं ठिकाणीं ह्या उंचीवरून येणाऱ्या पाण्याचा उपयोग धान्य दळण्याच्या चक्क्या चालविण्या-करिता केलेला दिसत होता. ह्या चक्क्या झऱ्याच्या पायथ्याशी बांधलेल्या लहानशा झोपडींत असतात. नागनी येथें एका हलवायाच्या दुकानात आम्ही मुक्काम केला. येथें दूध मिळालें तें घेतलें.

## मंगळवार ता. १३ जून १९३९. दिवस ३ रा.

नागनीहून पहाटेस चार वाजता निघालों ते सकाळीं ७ वाजता **चमूआ** येथें पोहोंचलो. चमूआ एका उंच शिखराच्या सपाटीवर आहे. चमूआ व त्याच्याजवळील तीन गांवातील १४ तरुण लढवय्ये गेल्या जर्मन युद्धांत बळी पडले होते. त्यांचे स्मारक म्हणून ह्या सपाटीवरील मैदानात एक स्तंभ उभारला आहे. हा स्तंभ टेहरीचे पोलिटिकल एजंट यानीं १९२५ सालीं उघडला. स्तंभाच्या चार बाजूंस चार गांवाचीं व त्या त्या गावातील बळी पडलेल्या तरुणाची नांवें संगमरवरी पाटयांवर खोदलेलीं आहेत. चमूआ येथें दूध मिळालें तें घेऊन ९–१५ ला **जाख**-चट्टीस आम्ही येऊन पोहोचलों. दरम्यान दंडीवाहकापैकी एक जण आपल्याच्यानें पुढें येणे शक्य नाहीं, खांदे फार दुखतात म्हणून सांगूं लागला. तेव्हां त्यानें जवळील एका खेडयांतून बदली आणून दिला. त्याचें नाव व मूळ करारावर कबुलीबद्दल त्याचा आंगठा घेऊन पुढील प्रवासास सुरुवात केली. जाखपर्यंत बहुतेक रस्ता केवळ २ ते ३

फूट रुंद आहे व त्याच्या एका बाजूस उंच उंच सुरूच्या वृक्षांनीं भरलेले डोंगर व दुसऱ्या बाजूला ठिकठिकाणीं उतरणीवरील शेतांनीं भरलेल्या खोल दऱ्या आहेत. मधून मधून बाजूच्या डोंगरावरून वाहात येणाऱ्या झऱ्यांचें पाणी रस्त्यावरून दऱ्यांतील शेतांत सोडलें आहे. डोंगरांच्या मध्यावर व शिखरांवर व तसेंच खोल दऱ्यांतूनहि ठिकठिकाणीं चार चार, पाच पांच घरांचीं पहाडी गांवें दिसतात. ह्या गावातील बहुतेक घरें स्लेट दगडाच्या चौकोनी शिळानी शाकारलेलीं आहेत. जाख येथून १०–४५ ला निघालो तें ठिकठिकाणी विसावा घेत टेहरी येथे दुपारीं १२ वाजता पोहोंचलों. जाखपासून टेहरीपर्यंतचा रस्ता बहुतेक उतरणीवरून,परंतु फार खडकाळ जागेंतून आहे.टेहरी येथें भागीरथीच्या काठावरील सरकारी धर्मशाळेनजीक एका दुकानाच्या बाजूच्या खोलींत उतरलों. येथून भागीरथी बरीच खोल असल्यामुळें पाणी वर आणून स्नान करावें लागलें.

## टेहरी.

टेहरी ही टेहरी–गढवाल संस्थानची राजधानी आहे. ह्या गावाला 'गणेश-प्रयागहि' म्हणतात. भागीरथी व भिलंगना ह्यांच्या संगमावर असलेल्या एका रुंदशा सुंदर दरींत वसलेले हे शहर, हिज हायनेस राजा सुदर्शनशाहा ह्यांनीं ता. २८ डिसेंबर १८१९ सालीं स्थापिलें. ह्या रुंद सुंदर दरीची उंची समुद्र-सपाटीपासून २,९०० फूट आहे. ह्या गांवाची स्थापना झाल्यापासून ह्या संस्थानाचें नाव टेहरी–गरहवाल असें पडलें आहे. हल्लींच्या महाराजांचे पूर्वज महाराजा अनंगपाळ यानीं ह्या हिमालयातील सर्व प्रदेशास ' गरहवाल ' हें नांव इ. स. १४२५ पासून दिलें. पूर्वी ह्या प्रदेशास केदारखंड, बद्रीकाश्रम, तंगणा आणि भवानी वगैरे नावें होतीं. परंतु हल्लीं त्याना ब्रिटिश आणि टेहरी–गरहवाल असें म्हणतात.

हिज हायनेस राजे प्रतापशाहा यांनीं इ. स. १८७७ मध्यें उन्हाळ्यांत राहण्याकरितां प्रतापनगर नावाच्या शहरार्ची स्थापना केली. हें शहर समुद्र-सपाटीपासून ७,००० फूट उंचीवर वसविलें आहे. हें टेहरीपासून ९ मैल उत्तरेकडे आहे.

हिज हायनेस राजे कीर्तिशाहा बहादुर के. सी. एस्. आय्. यांनीं इ. स. १८९६ मध्ये कीर्तिनगर हें सुंदर शहर वसविलें. हें टेहरीपासून ३० मैलांवर पूर्वेच्या बाजूस श्रीनगरजवळ अलकनंदेच्या काठीं आहे.

टेहरी संस्थानचें क्षेत्रफळ ४५०० चौरस मैल आहे. ह्या क्षेत्रफळाचा अर्धा-अधिक भाग सतत बर्फानें आच्छादलेला व सुरु, देवदार, भोजपत्र वगैरे वृक्षांनीं भरलेला असतो. लागवड केलेल्या जमिनीचे क्षेत्रफळ फक्त ९०० चौरस मैल आहे . इ. स. १९२० सालच्या खानेसुमारींत टेहरी संस्थानची लोकसंख्या ३,१८,४५२ दिली आहे.

उत्तरखंडातील खालीं दिलेलीं महत्त्वाची तीर्थें टेहरी-गरहवाल संस्थानाच्या हद्दीत आहेत —मुनिकीरिटा ( हृषीकेशचा कांहीं भाग ), देवप्रयाग, यम्नोत्री, उत्तरकाशी, डोडीताल, गंगोत्री व बुढाकेदार ह्या तीर्थांना जाण्याचा सुमारें ३०० अधिक मैलाचा यात्रा-मार्ग टेहरी-गढवाल संस्थानच्या हद्दींतून आहे.

टेहरी येथें बाजार बराच मोठा आहे. येथील बाजारात बहुतेक जिन्नस मिळतात. गावात राजवाड्याच्या रस्त्यावर एक मोठा घड्याळाचा मनोरा ( क्लॉकटॉवर ) आहे. दोनतीन धर्मशाळा, पोस्ट व तारऑफिस हीं आहेत. हायस्कूलची इमारत, स्टेट हॉस्पिटल व सरकारी कचेऱ्याच्या इमारती फार सुंदर आहेत. यम्नोत्री, गंगोत्री ह्या तीर्थांच्या वाटेवरील टेहरी हेंच शेवटचें तार-ऑफिस आहे. येथून पुढें पोस्टाची फारच अव्यवस्था आहे. टेहरीपासून नरेंद्रनगरपर्यंत मोटारची सडक बाधण्याचें काम चालूं आहे.टेहरी येथे बदरीनाथ, केदारनाथ व श्रीराम यांचीं जुनीं चिरेबंदी बांधणीची देवळें आहेत.

आम्ही भागीरथीच्या पलीकडच्या काठावरील दुकानात उतरलों होतों. तेथून गावात येण्यास चांगला भक्कम लोखंडी झुलता पूल आहे. पुलावरून भागीरथी बरीच खोलीवरून वाहाताना दिसते.

## बुधवार ता. १४ जून १९३९ दिवस ४ था.

केदारनाथाच्या देवळाच्या मागें सुमारें एक फर्लांगावर भागीरथी व भिलंगना यांचा संगम आहे. संगमावर एक विशाल वटवृक्षाखाली लहानसा घाट बांधलेला आहे. सकाळीं संगमावर स्नान करून देवळें पाहिलीं व पोस्ट ऑफिसात जाऊन ता. १० चें घरून आलेलें पत्र घेतलें व मुक्कामावर आलों. पूजा, पोथी वगैरे नित्यक्रम आटोपून जेवण घेऊन दुपारीं येथून निघण्याचा बेत करण्याच्या विचारात होतों तों एका बोजेवाल्यास फार ताप भरला असल्याचें कळलें. करितां दुपारी निघण्याचा बेत रहित करून आजची रात्र येथेंच काढण्याचें ठराविलें. आजारी झालेल्या बोजेवाल्यास क्विनाइनव ॲस्पिरिनच्या गोळ्या दिल्या. संध्याकाळीं त्याचा ताप कमी झाला व त्यास बरें वाटूं लागलें. रात्रीं

त्याला पुन्हां क्विनाइन व ॲस्पिरिनच्या गोळ्या दिल्या. रात्रीं त्याला चांगली झोप लागली. सकाळीं व दुपारीं पावसाच्या थोड्या सरी आल्या होत्या; परंतु संध्याकाळपासून आकाश स्वच्छ होऊं लागले. रात्री साधारण गारवा होता.

## गुरुवार ता १५ जून १९३९. दिवस ५ वा.

आम्ही टेहरीहून सकाळीं ५ वाजता निघालों. काल दुपारीं आजारी झालेला बोजेवाला कुली आता चांगला हुशार झाला होता. त्याला दोन क्विनाइनच्या गोळ्या दिल्या व तोहि सामान पाठीवर घेऊन मार्गास लागला. सात वाजतां **सिरेन**–चट्टीस पोहोचलों. तेथे दूध न मिळाल्यामुळें हॉर्लिक्स मॉल्टेड मिल्क व क्रुशेन सॉल्ट घेतले. टेहरीपासून सिरेन–चट्टी ५½ मैल आहे. सिरेन येथून ७–१० ला निघालों ते **उप्पू** येथे ८–१० ला आलों व तेथे थोडा विसांवा घेऊन ८–३० ला निघालों ते **भलडियाना** येथें १० वाजतां येऊन पोहोंचलों. भलडियाना सिरेनपासून ५½ मैल आहे. टेहरीपासून भलडियाना-पर्यंतचा सर्व रस्ता मोठमोठया पर्वताच्या कड्याच्या बाजूनें काढलेला आहे. रस्त्याच्या दुसऱ्या बाजूने खोल दऱ्यातून नागमोडीनें 'सों सों' आवाज करीत वाहात असलेल्या भागीरथी नदीचा सुंदर देखावा दिसत असतो. पर्वताचे सर्व कडे मोठमोठ्या काटे–निवडुंगानीं व सुरूच्या वृक्षांनीं भरलेले आहेत. कांहीं ठिकाणीं रस्त्यावर मोठाले अश्वत्थ वृक्ष आहेत. बहुतेक ठिकाणीं ह्या अश्वत्थ वृक्षाना दगड रचून पार बांधलेले आहेत. काही ठिकाणीं रस्ता बराच रुंद तर कांहीं ठिकाणीं केवळ १½ ते २ फूट अरुंद आहे. रस्ता चढ–उताराचा आहे, तथापि चढणच जास्त आहे.

**भलडियाना** येथून एक रस्ता मसूरीस जातो व दुसरा रस्ता चमूआवरून नरेंद्रनगरला जातो. येथून भागीरथी खोल दरींतून खालीं वाहतांना दिसते; परंतु तिचे पाणी आणणें शक्य नसल्यामुळें सुमारें दोन फर्लांग दूर असलेल्या, वरून वाहात आलेल्या झऱ्याच्या पाण्याचा उपयोग करणे भाग पडतें. येथें कालीकमलीवाल्याची मोठी दुमजली धर्मशाळा आहे व अन्नछत्र आहे. धर्म-शाळेसमोर एक मोठा अश्वत्थ वृक्ष आहे व त्याच्याभोवतीं मोठा दगडी पार आहे. धर्मशाळेच्या दुसऱ्या मजल्यावरील एका हवेशीर खोलींत आम्हीं उतरलों.

हृषीकेश येथील कालीकमलीवाले यांच्या मुख्य ऑफिसांतून त्यांच्या प्रत्येक धर्मशाळेतील चौकीदारास देण्याकरिता आम्हांस चिठ्ठ्या मिळाल्या

होत्या. त्या त्या धर्मशाळेच्या चौकीदारांस ती ती चिठ्ठी दिल्यावर आम्हास चांगली खोली अगर जागा मिळत असे.

झऱ्याचें पाणी आणवून अश्वत्थाखालीं स्नान केलें व पूजा-पोथी वगैरे नित्यकम आटोपून जेवण घेतलें. परवां आजारी झालेला बोजावालाहि चांगला झाला होता. दोन प्रहरांनंतर येथून निघण्याचा बेत होता. परंतु दंडी-वाल्यांपैकीं दोघेजण आपणांस पुढचा प्रवास होणार नाहीं असे सांगूं लागले. एक म्हणाला, माझ्या खांद्याला फोड आले आहेत व दुसरा सांगूं लागला कीं, माझें पोट दुखत आहे. करिता माझ्यानें पुढची मजल झेपणार नाहीं. करारांत लिहिलेल्या शर्तीप्रमाणें आम्हांस त्यांना त्या पट्टीच्या पटवाऱ्याकडे ( पोलिस पाटलाकडे ) नेतां आले असतें; परंतु चौकशीअंतीं पटवाऱ्याचें ठिकाण तीन मैलांवर डोंगरात आहे असें कळले, तेंव्हां चौकीदारास व आमच्या नोकरास दुसरे दोन दंडीवाले पाहाण्यास सांगितलें व ती रात्र भल डियाना येथें काढावी असें ठरविलें. भलडियाना येथें दोन प्रहरच्या सुमारास आम्हास यू. पी. मधील रॉकबेड ख्रिश्चन स्कूलचे हेडमास्तर मि. फरजर व त्यांच्याबरोबर असलेले दुसरे एक युरोपियन गृहस्थ व मसूरी येथील वुडस्टॉक स्कूलमधील सहा विद्यार्थी भेटले. ही युरोपियन मंडळी गंगोत्रीहून आली होती असे त्यांनीं सांगितलें. ही मंडळी पायानें प्रवास करीत होती. त्याच्याबरोबर सामानाकरिता एक खेचरवाला व दुसरा एक कुली होता. ही सर्व मंडळी येथून मसूरीस जाणार होती. त्यांनींहि धर्मशाळेंतील माडीवर दुसऱ्या बाजूस मुक्काम केला. पंधरा दिवसांच्या रजेंत ही मंडळी गंगोत्री पाहण्यास गेली होती. त्यानीं धर्मशाळेच्या बाजूला उघडया जागेंत दगड माडून त्या चुलीवर रोट्या व डाळीची आमटी बनविली. कांहीं मुले पाणी आणीत होतीं व कांहीं स्वयंपाकास लागलीं होतीं. संध्याकाळपर्यंत जेवण वगैरे आटोपून ते सर्व झोपीं गेले; कारण पहाटेस लौकर उठून मार्गास लागण्याचा त्याचा बेत होता. संध्याकाळपर्यंत दुसरे कुली ( दंडीवाले ) मिळाले नाहींत. करता पोटात दुखतें म्हणून सांगणाऱ्या दंडीवाल्यास पुढें पाच मैलावर असलेल्या ‘ छाम ’ नांवाच्या गांवापर्यंत येण्यास विनंति केली व छामपर्यंत सव्वा रुपयास एक कंडी वाहणारा कुली दंडीकरितां ठरविला व पहाटेस भलडियानाहून निघण्याचा बेत करून झोपी गेलों.

## शुक्रवार ता. १६ जून १९३९ दिवस ६ वा.

सकाळीं चार वाजतां आम्ही भलडियाना सोडलें. मसुरीस जाणारी युरोपीय मंडळी आधींच निघून गेली होती. आम्ही ६–१५ ला पुढें ३ मैलांवर असलेल्या **सीयांसू**–चट्टीस पोहोंचलों. येथें दूध मिळालें तें घेतलें व थोडासा विसांवा घेऊन पुढील मार्गास लागलों. सुमारें ७ वाजतां **छाम** येथें आलों. भलडियाना-पासून येथपर्यंतचा बहुतेक रस्ता सुरूच्या वृक्षांनीं भरलेल्या पर्वताच्या बाजूनें गेला आहे. रस्त्याच्या दुसऱ्या बाजूस खोल दऱ्यांतून भागीरथी 'सों सों' आवाज करीत वाहातांना दिसते. रस्त्याच्या बाजूला कांहीं ठिकाणीं डाळिंबाचीं झाडें व भोंवतीं दगडी पार असलेले मोठाले अश्वत्थ वृक्ष आढळतात.

छाम येथें नेपाळचे कमांडर–इन्–चीफ यांनीं टेहरीच्या एका राजास दिलेल्या नेपाळच्या राजकन्येच्या स्मरणार्थ मोठी एकमजली धर्मशाळा बांधली आहे. ह्या धर्मशाळेंत पहिल्या मजल्यावरील एका खोलींत आम्ही मुक्काम दिला. धर्मशाळेच्या मागच्या बाजूस डोंगरावरून वाहात आलेला ओढा आहे तेथें स्नान केलें व पूजा–पोथी आटोपून जेवणानंतर नोकरास दोन दंडीवाले शोधण्यास बाजूच्या गांवांत पाठविला. दोनप्रहरीं दोन दंडीवाले मिळाले. त्यांना सोडलेल्या दंडीवाल्यांचे करार वाचून दाखविले व ते करार त्यांना कबूल असल्याबद्दल त्यांच्या सह्या घेतल्या व नंतर थोडा विसांवा घेऊन ३–३० लां छामहून निघालों ते ५ मैलांवर असलेल्या **नागूना** गावीं ६ वाजता आलों. येथें पोहोंचण्यापूर्वी वाटेंत पावसानें गांठले व रस्त्यांत एका गाईम्हशींच्या गोठ्यांचा आश्रय करण्याची पाळी आली. बहुतेक रस्ता पर्वताच्या कडेनें व खोल दऱ्यातून नागमोडीनें वाहात असलेल्या भागीरथीच्या बाजूनें गेला आहे. कांहीं ठिकाणीं लहान लहान सपाटीवर पायऱ्यांसारखीं हिरवींगार शेतें दिसतात.

**नागूना** हे भागीरथी व नागेंद्रगंगा ह्यांच्या संगमावर आहे व म्हणून त्यास 'नागेंद्रप्रयागहि' म्हणतात. केदारखंडात ह्या नागेंद्रप्रयागचा उल्लेख आहे. येथें संगमावर एका संन्याशानें बांधलेली लहानशी धर्मशाळा आहे. गोपाळसरण निपानंद नावाचे अबूकडील एक वृद्ध संन्याशी संगमावर एका लहानशा खोलांत राहतात. त्यांची धूनी जवळच एका अश्वत्थ वृक्षाखालील पारावर आहे. ते येथें बरीच वर्षे राहात आहेत. संगमाजवळच एक लक्ष्मीनारायणाचे देऊळ आहे. धर्मशाळेतील खोलींत केराच्या राशी पडल्या होत्या, करितां आम्ही रात्रीं म्हरांड्यावर दूध घेऊन झोपीं गेलों.

## शनिवार ता, १७ जून १९३९. दिवस ७ वा.

नागूना येथून पहाटे ४–३० ला निघालों व ५ मैलावर असलेल्या **धरासू** येथें ६–३० च्या सुमाराम पोहोंचलों. बहुतेक रस्ता खोल दरीतून नागमोडीने वाहात असलेल्या भागीरथीच्या बाजूनें गेला आहे. दुसऱ्या बाजूला उंच उंच सुरूच्या व इतर वृक्षानीं भरलेले पर्वत आहेत. त्यांपैकीं कांहीं पर्वतांवर पायऱ्यासारखीं शेतें व मधून मधून पांचसात घराचीं लहान लहान गावें दिसतात. सर्व घरें स्लेट–स्टोनच्या फरशानीं शाकारलेलीं आहेत.

## धरासूपासून यम्नोत्री–४८ मैल.

धरासू हे अगदीं भागीरथच्या काठावर आहे. येथून एक रस्ता यम्नोत्रीस, दुसरा उत्तर–काशीवरून गंगोत्रीस व तिसरा मसुरीस जातो. एथें टपालाची पेटी आहे. ती आठवड्यातून दोन दिवस पोस्टाच्या मनुष्याकडून उघडली जाते. भागीरथीच्या अगदीं काठावर कालीकमलीवाल्याची धर्मशाळा बरीच मोठी असून जवळच दोन तीन दुकानें आहेत. नागूनापासून धरासूला येईपर्यंत भागीरथाला मिळणाऱ्या लहान लहान नद्यांवरील तीन चार, सुरव्या वेलींनीं दोन बाजूस टाकलेल्या वाशांस बांधलेल्या फळ्यांचे पूल ओलांडावे लागले. धर्मशाळेच्या पहिल्या मजल्यावरील एका हवाशीर खोलींत मुक्काम केला. भागीरथीचें स्नान केले पूजा, पोथी व जेवण आटोपलें, १ वाजेपर्यंत विश्रांति घेतली. घरीं पत्र टाकले व १–१५ ला धरासू सोडलें व साडेपांच वाजतां **बारमखाला** अथवा **गेंबूंला** येथें आलों. धरासूपासून **कल्याणी** चार मैल आहे व कल्याणीपासून बारमखाला ( गेवूंला ) पाच मैल आहे. कल्याणी व गेवूंलाच्या दरम्यान **कुम्हारडा** म्हणूनहि एक चट्टी आहे. आम्ही धरासूपासून पुढें एक मैल आल्यानंतर भागीरथीचा काठ सोडून जम्नोत्रीच्या रस्त्याला लागलो. भागीरथीच्या काठचा रस्ता उत्तर–काशीवरून गंगोत्रीस जातो. येथून पुढे भागीरथीचे दर्शन उत्तरकाशीनजीक येईपर्यंत होत नाहीं. यम्नोत्रीच्या रस्त्याला यापुढें बऱ्याच खडया चढणी व उतरणी लागल्या. कांहीं ठिकाणीं रस्ता केवळ दीड ते एक फूट अरुंद होता. गेवूंला येथें बाजूच्या पर्वतावरून वाहात येणाऱ्या एका ओढ्याच्याजवळ वृक्षांच्या गर्द छायेंत चार खोल्यांची एक धर्मशाळा टेहरीच्या महाराजांनीं नुकतीच बांधली आहे. ह्या धर्मशाळेंतील एका खोलींत आम्ही मुक्काम दिला. दूध न मिळाल्यामुळें हॉर्लिक्स मॉल्टेड मिल्क घेतलें व झोंपी गेलो. येथपासून जरा थंडी भासूं लागली.

## रविवार ता. १८ जून १९३९. दिवस ८ वा.

गेंबूला येथून सकाळी ४-३० ला निघालों ते **सिलक्यारी** येथें सकाळी ७ वाजतां पोहोंचलों. लहान लहान चार ओढे लाकडी पुलावरून ओलांडावे लागले. वाटेनें साधारण थंडी भासत होती. सुमारें दोन मैलांपर्यंत रस्ता हिरव्यागार शेतांनीं भरलेल्या खोल दऱ्याच्या बाजूनें गेला आहे. ह्या सर्व शेतांतून वरून वाहात येणाऱ्या मोठमोठया झऱ्यांचे पाणी खेळविलेलें आहे. शेतांत भात, आपल्याकडील बाजरीसारखें सामा व काकुरी नावाचें गरिबाचें धान्य व तंबाखू हीं पेरलेलीं दिसतात. तिसऱ्या मैलापासून पुढें सिलक्यारी-पर्यंत बहुतेक चढाव व कोठें कोठें थोडीशी उतरण सुरू होते. सिलक्यारी गेंबूलापासून पांच मैल आहे. येथें कालीकमलीवाले यांची धर्मशाळा आहे. धर्मशाळेच्याजवळूनच एक लहानशी नदी वाहात जाते. धर्मशाळेच्या पहिल्या मजल्यावरील एका खोलींत आम्ही मुक्काम दिला. आम्हीं नदींत स्नान केलें व पूजा-पोथी व जेवण आटोपून, थोडी विश्रांति घेतली व ११-३० वाजतां सिलक्यारी सोडली व सुमारें १-४५ ला **राहरीपास** येथें आलों. राहरी-पासपर्यंत सुमारें पांच मैलांची सारखी चढण आहे. हा सर्व रस्ता सुरूच्या उंच उंच झाडांच्या दाट जंगलांतून गेला आहे. रस्त्याच्या बाजूच्या दऱ्यांत व पर्वतावर कांहीं ठिकाणीं हिरवीगार शेतें आहेत. राहरीपास येथें फक्त पीयाऊस' (पाणपोई) आहे. चट्टी वगैरे नाहीं. पुढें **डांडलगांव**पर्यंत साधारण पांच मैलांची उतरण आहे. दाट जंगलांतील रस्त्याच्या बाजूच्या वृक्षावर " इस जंगलमें आग जलाना मना है " अशा पाट्या ठिकठिकाणीं आढळतात. राहरीपास येथें एका मोठ्या पाटीवर " एकिला मुसाफिर इस जंगलसे बारा बजेबाद जाना खतरनाक है " असें मोठ्या अक्षरानीं लिहिलें आहे. आम्ही डांडलगांव येथें तिसऱ्या प्रहरीं ३-३० पोहोंचलों. येथें एका लहानशा सुकलेल्या सुरूच्या पानांनीं शाकारलेल्या झोपडींत एक दुकान व त्याच्या बाजूला उतरण्याची जागा होती. जवळच एक स्वच्छ व गार पाण्याचा ओढा वाहात होता. डांडलगांवापासून एक मैल पुढें रस्त्याच्या एका बाजूला खोल दऱ्यांतून नागमोडीनें वाहाणारी यमुना व दुसऱ्या बाजूला सुरूच्या उंच उंच वृक्षांनीं भरलेले गगनचुंबित पर्वत आहेत. दऱ्यांतून वाहाणाऱ्या यमुनेपलीकडेहि सुरूच्या वृक्षांनीं भरलेले उंच उंच पर्वत आहेत. ह्या पर्वतांवर कांहीं ठिकाणीं

साधारण मध्यावर जाड फळ्यांचे प्लॅटफॉर्मस् बांधलेले दिसतात. वरील जंगलांत मोठाले वृक्ष पाडून त्यांची मोठमोठीं बहालें व फळ्या तयार करतात व यमुनेला पूर आला म्हणजे ही बहालें व फळ्या ह्या प्लॅटफॉर्मवरून यमुनेंत लोटून देतात व तीं यमुनेच्या ओघाबरोबर मसुरीच्या वरच्या बाजूस असलेल्या चक्रोट्टा येथपर्यंत वाहून आल्यावर तेथें यमुनेतून तीं काढून घेतात व तेथून पुढें डेहराडूनपर्यंत आणून तीं रेल्वेनें पुढे रवाना होतात. डांडलगांवपासून पुढे दोन मैलावर असलेल्या **सिमली**पर्यंत साधारण उतरण आहे. सिमलीस पोहोंचण्यापूर्वी आम्हांस पावसानें गांठलें व रस्ता खराब असल्यामुळें सुमारें तीन मैल चालावे लागले; व चार ओढ्यावरील डळमळीत लाकडी पूल ओलांडावे लागले. सिमली येथें हल्लीं चट्टी वगैरे नाही. सिमलीपासून पुढें गंगणाणीपर्यंत दोन मैलांचा बहुतेक रस्ता सरळ आहे. एक-दोन ठिकाणीं थोड्या उतरणी आहेत. आम्हीं **गंगणाणी** येथें साडेपाच वाजतां पोहोंचलों. येथें कालीकमली वाले याची मोठी धर्मशाळा यमुनेच्या काठीं एक उंचशा लहान सपाटीवर आहे. धर्मशाळेच्या पहिल्या मजल्यावरील एका खोलींत आम्ही मुक्काम दिला. धर्मशाळेपासून सुमारें एक फर्लांगावर यमुनेच्या कांठीं दगडी बांधणीचें एक स्वच्छ पाण्याचे कुंड आहे. ह्या कुंडास गंगेचें कुंड म्हणतात. त्यांत बरेच लहान मासे आहेत. हे कुंड फार खोल नाहीं. असें म्हणतात कीं, ह्या कुंडांतील रेती व पाणी हीं गंगेच्या पाण्यासारखीं आहेत. ह्या कुंडाची दंतकथा खालीं लिहिल्याप्रमाणें सांगण्यात येते. जमदग्नि ऋषींनीं ह्या ठिकाणीं फार वर्षे तप केलें व त्या तपाच्या प्रभावानें त्यांच्याकरिता गंगा येथें प्रगट झाली. ह्या जमदग्नि ऋषींचा आश्रम यमुनेच्या पलीकडे असलेल्या पर्वतावर आहे असें सांगतात. त्या आश्रमाचा रस्ता यमुनेपलीकडे ६००० फूट उंचीवर असलेल्या राजगड्डी नांवाच्या टेहरी संस्थानातील एका तहसीलीच्या मुख्य ठिकाणावरून जातो. कुंडांत एका बाजूच्या दगडी भिंतीवर जमदग्नि ऋषींचा मुखवटा ( **बस्ट** ) आहे. कुंडाच्या वरच्या बाजूला एक लहानशा देवळांत गंगा व यमुना यांचे दगडी लहानसे पुतळे आहेत. जवळच दुसऱ्या एका पर्वतावर मार्कंडेय ऋषींचा आश्रम आहे असें सांगतात. ह्या कुंडास व देवळास जाण्याचा रस्ता जरा अवघड आहे. आम्हांस तेथें जातांना एक दोन ठिकाणीं आमच्या नोकराचा हात धरून जावें लागलें. सिमली व गंगणाणी यांच्या दरम्यान चार रस्ते फुटतात. त्या प्रत्येक रस्त्याच्या सुरुवातीस " रस्ता जम्नोत्री को, "

" रस्ता गंगोत्री को, " " रस्ता टेहरी को " व " रस्ता राजगड्डी को " अशा पाट्या आहेत. गंगणाणी येथे दूध मिळालें तें घेऊन झोपीं गेलों.

**सोमवार ता. १९ जून १९३९. दिवस ९ वा.**

आम्ही गंगणाणी येथून सकाळीं पांच वाजतां निघालों. पुढें दोन मैलांवर **खैरातचट्टी** लागली. ही चट्टी अगदीं निरुपयोगी आहे. तीन मैल पुढे **जगन्नाथ-चट्टी** आहे. ही चट्टीहि साधारणच आहे. आम्ही एक मैल पुढे गेल्यावर साडेआठ वाजतां **जम्नाचट्टीस** पोहोचलों. आतांपर्यंत आज सहा मैल प्रवास झाला होता. पहिल्या मैलाला बराच चढाव होता व पुढच्या पांच मैलांत साधारण चढणी व उतरणी होत्या. चौथ्या मैलापासून यमुना एका पर्वतापलीकडे राहते व बाजूच्या पर्वतावरून खालीं येणाऱ्या एका धबधब्यापासून उगम पावणाऱ्या एका नदीच्या बाजूनें रस्ता गेला आहे. चौथ्या मैलापासून हिमालयाच्या बर्फाच्छादित शिखरांचें प्रथमच दर्शन झाले व आजूबाजूचा देखावाहि पालटला. रस्त्याच्या डाव्या हातास रुप्यासारख्या चमकणाऱ्या पांढऱ्या गोट्यांनीं भरलेल्या खोल दऱ्यांतून वाहात असलेली स्वच्छ पाण्याची यमुना नदी, तिच्या बाजूच्या उंचसखल प्रदेशांत वसलेले लहान गाव, एका गांवाहून दुसऱ्या गावास जाणारे लहान लहान पायरस्ते, पहाडांच्या उतरणीवर ठिकठिकाणीं असलेलीं हिरवीगार शेतें वगैरे दिसूं लागलीं म्हणजे येथून हलूंच नये असें वाटतें. जम्नाचट्टी येथे काली-कमलीवाल्याची मोठी धर्मशाळा आहे. ह्या धर्मशाळेत सदावर्तहि आहे. येथे यम्नोत्रीहून परत आलेले बरेच यात्रेकरी भेटले. त्यांपैकीं कांहीं पायीं यात्रा करणारे, कांहीं कंडींतून जाणारे होते. कंडींतून जाणाऱ्या एका बाईस दोन वर्षांचें मूल होतें. ह्या बाईचा नवरा पायानें प्रवास करीत होता. दुसरी एक बाई दंडींतून प्रवास करणारी होती. यात्रेकरी एकमेकांस भेटल्यावर " जम्ना मय्याकी जय " असे ओरडतात. स्नान, पूजा, पोथी व जेवण आटोपून दीड वाजतां जम्नाचट्टी सोडली, व तीनच्या सुमारास **ओझरी** येथे आलों. आकाशांत गडगडाट सुरू झाला, वीज चमकूं लागली व पावसाचीं चिन्हें भासूं लागलीं. पुढे अनुक्रमे अडीच व दोन मैलांवर असलेल्या **दाडोटी व राणागांव** ह्या चट्ट्यावर दुकानें व उतरण्याची चांगली सोय नाहीं असे कळलें. करितां रात्रीं ओझरी येथें मुक्काम करण्याचें आम्ही ठरविलें. येथें एक दुकान व दोन झोपड्या आहेत. ह्या झोपड्या तीन बाजूंस उघड्या

आहेत. त्यांपैकीं एका झोपडींत आम्ही उतरलों. जम्नाचट्टी सोडल्यावर यमुनेवरील एक लांकडी फळ्यांचा पूल ओलांडावा लागला. हा पूल अगदीं जीर्णदशेस आला होता. ह्या पुलाच्या दोन्ही बाजूस पुढें दिलेल्या मजकुराच्या हिंदी भाषेंत लिहिलेल्या पाट्या होत्या. " ह्या पुलावरून: एक घोडा, खेचर



कंडींतून प्रवास.

अगर गाढव व दोहोंपेक्षां जास्त मनुष्यांनीं जाऊं नये. " पुढें पुढें रस्ता अगदीं अरुंद आहे. एका बाजूस गगनचुंबित सुरूच्या वृक्षांनीं भरलेले उंच पर्वतांचे

कडे व दुसऱ्या बाजूला खोल दऱ्यांतून वाहाणारी यमुना नदी व तिच्या पलीकडेहि सुरूच्या गर्द जंगलांनीं भरलेले उंच उंच पर्वत दिसत होते. दुसऱ्या एका लहान नदीवरचा लांकडी फळ्यांचा पूल ओलांडल्यानंतर केवळ एक फूट रुंदीचा रस्ता एका उंच कड्याच्या बाजूने जातो. दुसऱ्या बाजूला पांच सहा पुरुष खोल अरुंद दरींतून यमुना 'सों सों' आवाज करीत वाहातांना दिसते. हा एक मैलाचा अरुंद रस्ता फार अवघड असल्यामुळे आम्हांस दंडातून उतरून दंडीवाल्यांपैकीं दोघांची मदत घेऊन ह्या रस्त्याने पार पडावे लागलें. संध्याकाळच्या सुमारास एका दंडीवाल्यास ताप भरल्याचें कळले. त्याला क्विनाइन व अॅस्पिरिन दिले. क्विनाइनची बाटली पाहाताच दुकानदार म्हणूं लागला की, माझ्या बायकोला बरेच दिवस ताप येत आहे: करितां क्विनाइनच्या कांहीं गोळ्या द्या. तेव्हां त्याला पाच गोळ्या दिल्या. झोपडीच्या बाजूनें एक सुंदर पाण्याचा झरा वाहात होता. त्याचे पाणी पिऊन रात्रीं दूध घेतले व झोपीं गेलों.

**मंगळवार ता. २० जून १९३९.        दिवस १० वा.**

रात्रीं ताप आलेला कुली पहाटे हुशार झाला होता. त्याला पुन्हां क्विनाइन दिले व आम्ही साडेचार वाजतां ओझरी येथून निघालों व ७-५० ला साडेसहा मैलावर असलेल्या **हनुमानचट्टीवर** पोहोंचलों. दुसऱ्या मैलानंतर यमुनेवरील एक लाकडी पूल ओलांडावा लागला. येथपर्यंत रस्ता सरळ आहे. थोडीशी उतरण आहे. दाडोटीपासून पुढें एक मैल गेल्यावर पुन्हां अवघड रस्त्यास व चढावास सुरुवात होते. एका बाजूस उंच पर्वतांच्या रांगा, त्यांवरून पडणारे शुभ्र पाण्याचे धबधबे व दुसऱ्या बाजूनें खोल दऱ्यातून वाहाणारी यमुना व समोर रुप्यासारखे बर्फाच्छादित पर्वत दिसतात. येथून बऱ्याच कठीण चढावास सुरुवात होते. येथें पुन्हां खोल दरींतून वाहाणारी यमुना, दोहों बाजूस तारेने बांधलेल्या लाकडी पुलावरून ओलांडावी लागते. परंतु आजूबाजूचा देखावा पाहून एक प्रकारचा आल्हाद वाटतो. बाजूच्या पर्वतावर मोठे वृक्ष नसून ते सर्व पर्वत निरनिराळ्या रंगांच्या जंगली फुलांच्या लहान लहान झुडुपांनीं भरलेले आहेत. त्या फुलाच्या सुस्वादानें एक प्रकारची हुशारी वाटते. **राणागांवपर्यंत** आल्यानंतर रस्ता खोल दरींतून जातो. ठिकठिकाणीं फेसाळलेल्या हिरवट रंगाच्या पाण्याची यमुना रस्त्याच्या बाजूनें वाहातांना दिसते. बाजूच्या दोन पर्वतांमधून वाहात आलेली हनुमानगंगा नांवाची

मोठी नदी ह्या दरीपासून एक फर्लांगावर यमुनेस मिळते. ही हनुमानगंगा लाकडी फळ्यांच्या पुलावरून ओलांडून गेल्यावर तिच्या कांठालाच हनुमान-चट्टी आहे. येथें कालीकमलीवाल्याची धर्मशाळा व सदावर्त हीं आहेत. राणागांव-पासून पुढे सर्व पहाडी लोक गोऱ्या रंगाचे, सशक्त व मजबूत बाधणीचे दिसतात. बायकाहि सशक्त, गोऱ्या, गालावर गुलाबी छटा असलेल्या, परंतु बसकट ( bloated ) चेहेऱ्याच्या अशा दृष्टीस पडतात. बायकांचा पोशाक म्हणजे अंगांत घोंगडीचा अंगरखा, खालीं घोंगडीचा घागरा, नाकाच्या मधल्या पडद्यावर सुमारे तीन साडेतीन व्यासाचे सुंकलें, हातात जाड वाळे व गळ्यांत जाड चादीची ठुशी व पोंवळ्याच्या माळा, व दोन्ही कान त्यांचे सर्व पाळ्याभर घातलेल्या वाळ्यांनीं खालीं पडलेले; बायकांच्या डोक्याला फेट्या-सारखें पांढरें वस्त्र बांधलेले असतें. पुरुषांचा पोशाक म्हणजे पायात घोंगडीचा पायजमा, गुडघ्यापर्यंत येणारा घोंगडीचा लांब कोट, त्यावर तांबडा अगर राकट म्हणजे घोंगडीच्या रंगाचा कमरबंद, व डोक्यांत घोंगडीची केलेली टोपी. इकडे बहुतेक पुरुषाच्या हातात टकळी व काखेंत मेंढ्याच्या लोकरीनें भरलेली लहान करंडी असते. इकडील पहाडी लोक टकळीवर मेंढयांच्या लोकरीचे सूत बनवून तें मागवाल्यास देऊन त्याचा घोंगडीसारखा कपडा बन-वून घेतात व त्याचे कपडे बनवितात.

धर्मशाळेच्या पहिल्या मजल्यावर एका खोलींत आम्ही उतरलों. हनुमान-गंगेत स्नान करून पूजा-पोथी व जेवण उरकलें व साडेअकराला हनुमान-चट्टीहून निघालों. हनुमानगंगेवरील दुसरा लाकडी पूल ओलांडल्यावर पुढें रस्ता बटाटे, राजगिरा व गहूं यांच्या शेतांच्या बाजूनें जातो व पुढें एक मैलाच्या चढावानंतर खोल दरींतून वाहाणाऱ्या यमुनेच्या बाजूनें जातो. हनुमानचट्टीपासून चार मैलांवर असलेल्या **भीपा** येथें आम्ही साडेतीन वाजता पोहोंचलों. भीपा येथून एक रस्ता यमुनेवरील लोखंडी झुलत्या पुला-वरून, खरसाळी गांवांतून यम्नोत्रीला जातो व दुसरा रस्ता भीपा येथून थेट यम्नोत्रीला जातो.

**खरसाळी** हें ह्या भागातील नेहमीं मनुष्यवस्ती असणारें शेवटचें ठिकाण आहे. यम्नोत्रीला सतत बर्फ पडूं लागल्यावर तेथें कोणी राहात नाहीं. खर-साळीच्या पुढे कायमची मनुष्यवस्ती नसते. जम्नोत्रीचे पंडे खरसाळी येथे राहतात. आम्ही भीपावरून जम्नोत्रीस जाणाऱ्या रस्त्यानें पुढें गेलों.

भीपापासून सुमारें एक मैलावर यमुनेच्या काठीं 'मार्कंडेय-तीर्थ' नांवाचें एक गरम पाण्याचें कुंड आहे. येथे श्रीब्रह्माजी नांवाच्या संन्याशानें बांधलेली एक धर्मशाळा आहे. भीपा अथवा खरसाळी येथून यम्नोत्री चार मैल आहे. भीपा येथून आम्ही पावणेचार वाजता निघालों. खरसाळी येथील एका पंड्याचा पुतण्या आम्हास धरासू येथें भेटला होता व त्यानें आपल्या चुलत्यास कळविलें होतें, तेव्हां तो चुलता आम्हांस भीपा येथे भेटला व तो आमच्याबरोबर यम्नोत्रीस आला. यम्नोत्रीच्या पहाडाची चढण सुरू झाल्यावर यमुना ह्या पहाडाच्या पलीकडे राहते. यम्नोत्रीचा सर्व पहाड बोरूच्या जाडीच्या बांबूच्या बेटांनीं व कोठें कोठें रानगुलाबानीं भरलेला आहे. वर जाणारा रस्ता खड्या नागमोडी चढणीचा, खडकाळ व काहीं ठिकाणीं अगदीं अरुंद असल्यामुळें फार अवघड आहे. अर्ध्या मैलाच्या चढणीनंतर पुढे अर्धा मैल सरळ व पुढे एक मैलाची खडी मोडीची चढण व पुढें रस्ता सरळ आहे. परंतु तो तुटलेल्या कड्याच्या बाजूनें गेला आहे. ह्या कड्याच्या बाजूनें वर आल्यावर एक लहानसें भैरवाचें देऊळ लागते म्हणून ह्या पहाडावरील नागमोडी चढणीच्या रस्त्यास **भैरवघाटी** असें म्हणतात. दिल्ली येथील ज्या मारवाडी गृहस्थांनीं आपल्या मृत पुत्राच्या स्मरणार्थ टेहेरी सरकारला वीस हजार रुपये देऊन त्या सरकारकडून हा रस्ता बांधविला. त्यांची व त्यांच्या मृत पुत्राच्या नांवाची पाटी ह्या भैरवनाथाच्या देवळासमोर लावलेली आहे. येथून पुढें दीड फूट रुंदीच्या तुटलेल्या कड्यावरील वाटेनें एक फर्लांग गेल्यावर आम्ही **यम्नोत्री** ह्या ठिकाणीं पोहोचलों. ह्या वेळीं संध्याकाळचे साडेसहाचा सुमार झाला होता; तथापि आकाश स्वच्छ असल्यामुळें तीन चार शुभ्र बर्फानें भरलेल्या पर्वतामधून खालीं येणारें यमुनेच्या उगमाचें पाणी स्पष्ट दिसत होतें, व त्या पाण्याच्या बाजूला असलेल्या तप्त-कुंडातून निघणाऱ्या वाफाहि दिसत होत्या. येथें कालीकमलीवाल्याची मोठी धर्मशाळा, तीन चार दगडी झोपड्या व लहानसें यमुनेचें देऊळ आहे. धर्मशाळेंतील पहिल्या मजल्यावरील एका खोलींत आम्ही उतरलों. धर्मशाळेच्या चौकीदारानें खोलींत शेगडी व आठ टिबेटचे रग्ज् हीं आणून ठेवलीं. आमचे दंडीवाले, बोजावाले व नोकर ह्यानीं त्याचा उपयोग केला. आमच्याजवळ आमचे स्वतःचे दोन रग्ज् व दुलई वगैरे होती. हिमालयातील बर्फमय प्रदेशात असलेल्या प्रत्येक धर्मशाळेत रग्ज् व कंबळ याचे ढीग कालीकमलीवाले याच्या क्षेत्राकडून ठेविलेले असतात.

## यम्नोत्री.

**यम्नोत्री** हें ठिकाण सतत बर्फाच्छादित असणाऱ्या तीन चार पर्वताच्या-मधील एका उतरत्या खिंडीमध्यें, ३१·१ उत्तर-अक्षावर व ७८·२८ पूर्व–अक्षा-वर असून, ह्या ठिकाणाची उंची समुद्रसपाटीपासून १०,८०० फूट वर आहे. दोन बर्फाच्छादित पर्वतांमधून निघून ह्या खिंडींतून खालीं वाहात जाणाऱ्या यमुनेच्या प्रवाहाच्या पलीकडील पर्वतांच्या कडयांतून गरम वाफा निघत असतात. ह्या कडयाच्या खालीं पंधरा वीस फूट अंतरावरून हिममय यमुना खालीं वाहात गेली आहे. प्रवाहापासून आठ दहा फुटांच्या अंतरावर तीन चार वाफेनें भरलेल्या गरम पाण्याचे फवारे वर येत असतात. त्यांपैकीं एका मोठ्या फवाऱ्यांतून ‘ सों सों ’ असा आवाज निघत असतो. ह्या फवाऱ्यांच्या जरा खालीं गरम पाण्याचीं चार कुंडे आहेत. त्यांपैकीं सूर्यकुंड नांवाच्या कुंडाचें पाणी फारच गरम ( १९४.७° फयारनहीट ) आहे. तांदूळ, डाळ अगर बटाटे कपडयांत बांधून ह्या कुंडांत सोडले असतां पांच मिनटांत शिजतात! कुंडांतील पाण्यास गंधकाचा अगर कसलाहि वास येत नाहीं. ‘सों सों आवाज निघणाऱ्या फवाऱ्यानजीकच्या कुंडास ‘गौतमकुंड’ असें नाव आहे. ह्या कुंडाजवळ गौतम ऋषि ‘सोहं सोहं’ असा आवाज करीत आहेत असें सांग-तात. दुसऱ्या दोन कुंडातील पाणी आंत उतरून स्नान करण्याइतकें गरम आहे. त्यांपैकीं एक कुंड उच्च वर्गाकरितां व दुसरें अन्य वर्गाकरिता ‘आहे असें सांगण्यात येतें.

### बुधवार ता. २१ जून १९३९. दिवस ११ वा.

सकाळीं साडेपाच वाजता उठून तप्त–कुंडांत स्नान उरकलें. गौतमकुंडा-जवळील फौवाऱ्यापुढें गंगादान–पूजा केली. खोपटीसारख्या यमुनेच्या दगडी देवळांतील यमुनाजीच्या दगडी पुतळ्याचें दर्शन घेतलें व बरोबर आणलेले बदाम, मिस्री ( खडीसाखर ), छोटी इलाइची ( वेलची ), अर्धा वार हलकें रेशमी कापड वगैरे यमुनेस अर्पण केलें; म्हणजे पुजाऱ्यास दिले. ह्या वेळीं आकाश स्वच्छ असल्यामुळें खिंडीच्या भोंवतालचे रुप्यानीं भरल्यासारखे भास-णारे बर्फमय उंच उंच पर्वत स्पष्ट दिसत होते. कुंडांतून व कडयांतून निघ-णाऱ्या ऊन वाफांमुळें थंडीहि वाजत नव्हती; त्यामुळें हा सुंदर देखावा पाहात येथेंच बसावें असें वाटूं लागतें. बराच वेळ येथें काढून धर्मशाळेंत आलों व

पूजा-पोथी व इतर नित्यक्रम आटोपला. आमच्या मागोमाग इंदूरकडील १५।२० मारवाडी स्त्रिया व पुरुष धर्मशाळेंत येऊन उतरले होते. त्या मंडळींनीं पंडे लोकास ब्राह्मणभोजन दिले, तें खालीं चालू होतें. जेवणास भोजपात्र नांवाच्या आपल्याकडील केळीच्या बुंदासारख्या झाडांच्या सालींचा उपयोग केला होता. ही साल साधारण पातळ कपड्यासारखी असते. श्रीराम ह्या भोजपात्राचीं वल्कलें वनवासात असतांना वापरीत असत असा 'रामायणांत' उल्लेख आहे. गव्हाची कणीक, गूळ व घी ( तूप ) यांचा बनविलेला शिरा, जाड जाड मोठाल्या पुऱ्या व आलूची ( बटाट्याची ) भाजी भोजपात्रावर वाढली होती. पायांत कंबळी पायजमा, अंगांत लांब कोट, डोक्यांत कंबळची टोपी घातलेले १०।१५ पंडे व आपल्याइकडील जाड पातळासारख्या कापडांचे झगे, कंबळ व मखमलीचे सबंध हातांचे ब्लाउज व डोक्यास फेट्याप्रमाणें गुंडाळलेले कापड, अशा ८।१० पंड्यांच्या गोऱ्या गुलाबी गालांच्या सशक्त स्त्रिया एक दोन ओळींत बसल्या होत्या. हे सर्व पंडे गौड ब्राह्मण आहेत. आम्ही काल भीपापासून मोठ्या कष्टानें क्रमिलेला भैरवघाट चढून आलों. हे पंडे व त्यांच्या बायका ह्या खरसाळीहून केवळ भोजन व दक्षिणेच्या आशेनें आलीं होतीं. खरसाळी येथें राहाणारे यमुनेचे सर्व पंडे चांगले सुखवस्तु आहेत. कारण प्रत्येकाजवळ गहूं, राजगिरा व बटाटे हीं जीत चांगलीं पिकतात अशी बरीच जमीन आहे. खरसाळी गावांत टेहेरी सरकारतर्फे एक हिंदी व एक संस्कृत पाठशाळा आहे.

दुपारीं जेवण वगैरे आटोपून जरा विश्रांति घेत असतां, चमुआ येथें ठरविलेल्या दोन दंडीवाल्यांपैकीं एकजण आम्हां सर्वांस ठरलेल्या रकमेपेक्षां दहा रुपये जास्त दिले तर आपण पुढे येऊं असा हट्ट धरून बसला. आमच्या नोकरानें त्याला शेवटपर्यंत पोहोंचविल्यानंतर सर्व मिळून पांच रुपये बक्षीस देऊं असेंहि सांगितलें तरी तो ऐकेना. तेव्हां आमच्या नोकरानें त्याला चालता हो म्हणून सांगितलें. तेवढ्यावरून तो एकदम खालीं निघून गेला, व आम्ही विवंचनेत पडलों. संध्याकाळीं यमुनेची आरती पाहिली. कांहीं वेळ आकाश निरभ्र असल्यामुळें भोंवतालचा अवर्णनीय देखावा पाहून, आठ आणे शेरप्रमाणें खरसाळी येथून मुद्दाम मागविलेलें दूध घेतलें व सकाळीं दंडी कशी चालणार, ह्या विवंचनेंत झोंपीं गेलों. अंगांत गरम कपडे, पांघरण्यास दोन रज़ू व एक दुलई व खोलींत झगरी असल्यामुळें थंडीचा फारसा त्रास झाला

नाही. सकाळी दंडी चालविण्यास चवथा मनुष्य वर न मिळाल्यास भैरव-घाटीचा अवघड मार्ग पायानें क्रमावा लागणार, हा विचार मनांत घोळत होता.

## यम्नोत्रीपासून गंगोत्री ९९ मैल.

### गुरुवार ता. २२ जून १९३९. दिवस १२ वा.

पहाटेस आमच्या पंड्याचा निरोप घेऊन एक मनुष्य वर आला व त्यानें सांगितलें कीं, काल निघून गेलेल्या दंडीवाल्याला आमच्या पंड्यानें व भीपा येथील दुकानदारानें अडवून ठेविलें आहे. हा निरोप आम्हांस पहाटें साडे-चार वाजतां पोहोंचला. त्यानंतर प्रातर्विधि आटोपून आम्ही यम्नोत्री सोडून खाली जाण्यास निघालों. धर्मशाळेतून बाहेर पडतांच भोंवतालचे बर्फा-च्छादित पर्वत व त्यांच्या पलीकडील उंच पर्वतांचीं बर्फाच्छादित शिखरें पाहून येथून हलूं नये असें वाटूं लागलें; तथापि अद्याप अशा तऱ्हेचे पुष्कळ देखावे दिसणार आहेत, हीं गोष्ट मनांत आणून खालीं उतरण्याच्या रस्त्याला लागलों. बहुतेक उतार व अवघड ठिकाणचा अरुंद रस्ता आमच्या नोकराच्या मदतीनें उतरत उतरत **भीपा** येथें साडेदहा वाजतां पोहोंचलों. तेथें आल्या-वर बिथरलेल्या दंडीवाल्यास बोलवून आणला. दुसरे तीन दंडीवाले दंडी घेऊन आम्ही येथे पोहोंचण्यापूर्वींच खालीं आले होते. त्यानाहि बोलाविलें व त्या सर्वांना त्यानीं पुढें सर्व चारधामांची यात्रा पुरी होइपर्यंत नीट रीतीने काम केल्यास चौघाचे दरम्यान त्यांना रु. १० देण्याचें ठरविलें. सर्व यात्रा संपवून देवप्रयाग येथून आमचा हृषीकेशपर्यंत मोटारनें जाण्याचा विचार झाल्यास मैलास चार आणेप्रमाणें ४४ मैलांचे पैसे कापून घेण्यास हरकत नाहीं असेंहि त्यांनीं कबूल केलें. त्यानंतर धर्मशाळेच्या समोरून वाहात असलेल्या गरुडगंगेंत स्नान केले व पूजा–पोथी व जेवण आटोपून साडेबारा वाजतां भीपा येथून निघालों तें तीन वाजतां **हनुमानचट्टी** येथें पोहोंचलों. दर-म्यान दोन तीन ठिकाणी पावसाच्या सरीने गांठलें. धर्मशाळेत उतरल्यावर मेघ-गर्जना सुरू झाली व बराच जोराचा पाऊस पडला. करिता पुढें न जाता रात्र येथेंच काढण्याचें ठरविले. रात्रीं दूध मिळालें ते घेऊन झोपीं गेलों.

### शुक्रवार ता. २३ जून १९३९. दिवस १३ वा.

आम्ही सकाळीं साडेचारला हनुमानचट्टी सोडली व साडेआठला **जम्नाचट्टी**

येथे पोहोंचलों. येथें टेहेरी संस्थानांतील डिव्हिजनल फॉरेस्ट ऑफिसर भेटले. ते सहकुटुंब यम्नोत्रीस जात होते. त्यांचें कुटुंब दंडींत होतें. दोन लहान मुलें दोघां कुलींच्या खांद्यांवर होतीं व ते स्वतः व रेंजर घोड्यावरून प्रवास करीत होते. एके ठिकाणीं कालच्या पावसानें रस्ता वाहून गेला होता. तेथून दंडी-वाल्यांच्या मदतीनें फार जपून पार पडलों. यमुना नदींत स्नान केले. पूजा पोथी व जेवण आटोपून साडेबाराला तेथून निघालों ते पुढें आठ मैलांवर-असलेल्या **गंगणाणी** येथें साडेतीनला आलों. वाटेंत सुमारें अर्धा तास पाऊस लागला. रस्त्याच्या बाजूनें खोल दरींतून वाहात असलेल्या यमुनेचा व तिच्या पलीकडील हिरव्यागार जंगलानी भरलेल्या पर्वतांचा सुंदर देखावा आल्हादकारक होता. रात्र गंगणाणी येथें काढण्याचें ठरविलें व दूध घेऊन झोपीं गेलों.

**शनिवार ता. २४ जून १९३९ दिवस १४ वा.**

सकाळीं साडेचारला आम्ही गंगणाणी सोडली. सुमारें दीड दोन मैलांपर्यंत रस्ता सरळ आहे. पुढें **सिमली**पासून गंगोत्रीचा रस्ता लागतो. हा रस्ता दाट जंगलातून गेला आहे. सुमारें दोन मैलपर्यंत बरीच चढण व थोडी उतरण आहे. दोन लहान नद्यांवरील लाकडी फळ्याचे पूल ओलांडल्यानंतर इतक्या दाट जंगलास सुरुवात होते कीं, त्यातून सूर्यकिरणेंहि दिसत नाहींत. नंतर रस्त्याच्या एका बाजूला दाट जंगलानें भरलेल्या खोल दऱ्या व दुसऱ्या बाजूला मोठमोठ्या गगनचुंबित वृक्षानें भरलेले पर्वत दिसूं लागतात. दोन तीन ठिकाणीं रस्ता अतिशय अरुंद आहे. पुढें अशा एका पर्वताच्या माथ्यावर पोहोंचल्यानंतर रस्ता, **फिला-की-धार** अथवा **फिलापास** नांवाच्या खिंडींतून जातो. नंतर बऱ्याच अवघड उतरणीस सुरुवात होते. येथून अरुंद खिंडींतून नागमोडीनें वाहाणारी भागीरथी दिसूं लागते. थोड्या नागमोडी चढावानें पुढें गेल्यावर सिंगोट व भागीरथीच्या कांठावर असलेलें उत्तरकाशी हीं दिसूं लागतात. नंतर सिंगोटपर्यंत थोडी उतरण आहे. गंग-णाणीपासून सिंगोट साडेनऊ मैल आहे. आम्ही **सिंगोट** येथें दहाच्या सुमा-रास पोहोंचलों. गंगणाणीपासून सिंगोटपर्यंत रस्ता, एक दोन ठिकाणांखेरीज बराच रुंद आहे. बहुतेक रस्ता चढावाचा असल्याकारणानें बोजावाले बऱ्याच वेळानें आले. येथें कालीकमलीवाल्याची धर्मशाळा आहे तेथें उतरलों. स्नान करून पूजा-पोथी व जेवण आटोपेपर्यंत एकाचा सुमार झाला. पुढें अनुक्रमें साडेतीन

व तीन मैलांच्या अंतरावर असलेल्या **नाकोरी** व **डुंडा** येथें रात्रीच्या मुक्कामास योग्य अशा चट्टया नाहींत व उत्तरकाशी पुढें सहा मैल आहे असें कळलें तेव्हां आजची रात्र सिगोट येथें काढण्याचें ठरविलें. येथें दूध मिळालें तें घेतलें व झोपीं गेलों.

**रविवार ता. २५ जून १९३९.                दिवस १५ वा.**

आम्ही सकाळीं चार वाजता सिंगोट येथून निघालों. एक मैलपर्यंत रस्ता दाट जंगलांतून सरळ जातो. पुढें सुमारें अर्ध्या मैलाचा चढाव आहे. येथून भागीरथी रस्त्याच्या बाजूने साधारण खोल दरींतून ‘ झो झो ’ आवाज करीत वाहात असते. रस्त्याच्या एका बाजूला हिरव्यागार झुडुपांनीं व *सुरूच्या वृक्षानीं भरलेले पर्वत व दुसऱ्या बाजूला भागीरथीच्या काठापर्यंत उतरणीवर असलेलों भाताची व तंबाखूचीं शेतें आहेत. गोऱ्या व टवटवीत चेहेऱ्याच्या सशक्त पहाडी स्त्रिया कांहीं शेतातून काम करीत होत्या. इकडे पुरुष फक्त शेतें नागरण्याचें काम करतात व पेरणी, बेणणी वगैरे सर्व कामे बायका करतात. नाकोरीपर्यंत दोन मैलाची बहुतेक चढण व थोडीशी उतरण आहे. दरम्यान भागीरथीस मिळणाऱ्या तीन नद्यावरील लाकडी फळ्यांचे पूल ओलांडावे लागले. येथें भागीरथीच्या ह्या तीरावरून त्या तीरास जाण्यास पहाडी लोकांच्या उपयोगाकरिता केलेला दोराचा झुलता पूल पाहाण्यात आला. जनावरें ह्या तीरावरून त्या तीराला न्यावयाचीं असल्यास तीं भागीरथीच्या प्रवाहात लोटून देतात. त्यांपैकीं कांहीं प्रवाहाबरोबर वाहात जाऊन पैलतीरास पोहोचतात व कांहीं प्रवाहांत गडप होतात. नाकोरी येथें टेहेरी सरकारचा डाकबंगला आहे. नाकोरीपासून पुढचा रस्ता शेताच्या व गुलाब व इतर वनस्पतींच्या झुडुपांच्या बाजूने गेला आहे.भागीरथी रस्त्यापासून सुमारे एक फर्लांग दूर राहाते. उत्तरकाशी आतां दिसूं लागली; परंतु जसजशी उत्तरकाशी जवळ येऊं लागली तशीतशी चढावास व अवघड रस्त्यास सुरुवात झाली. एका बाजूस उंच पर्वत व दुसऱ्या बाजूला खोल दरीतून वाहाणारी भागीरथी असा देखावा दिसूं लागला. कांहीं ठिकाणीं खडी चढण व रस्ता अगदीं अरुंद असल्यामुळें दंडींतून उतरून दोघां दंडीवाल्याचा हात धरून बरेंच चालावें लागलें. अतिशय खोल दरीच्या बाजूला हात दीड हात उंचीची दगडी कच्ची भिंत

---

* सुरूच्या झाडाला इकडे ‘ चीड ’ म्हणतात. ह्या झाडांच्या सालींच्या ढलप्यांचा इकडील पहाडी लोक मशालीसारखा उपयोग करतात.

आहे. सकाळपासून साडेबारा मैलाचा प्रवास करून दहाच्या सुमारास आम्ही उत्तरकाशी येथे पोहोंचलो.

## उत्तरकाशी.

**उत्तरकाशी** भागीरथीच्या काठावर आहे. टेहेरीनंतर मोठी सपाटी उत्तरकाशीस आहे. सर्व उत्तरकाशीचे क्षेत्रफळ १२ चौरस मैल आहे व वस्ती विरळ आहे. बाजारात दहाबारा दुकानें आहेत. त्यांत बहुतेक जिन्नस मिळतात. सुमारें ५०० माणसें व्यवस्थेशीर रीतीनें राहतील, अशी कालीकमलीवाल्याची धर्मशाळा आहे. या धर्मशाळेत अन्नछत्र व धर्मार्थ आयुर्वेदिक औषधालय आहे. कालीकमलीवाला क्षेत्र या संस्थेचे ब्रिटिश व टेहेरी-गरहवाल प्रांताचें केंद्र ( सेंटर ) ह्या धर्मशाळेंतच आहे. डेप्युटी कलेक्टरची कचेरी, अँग्लो संस्कृत पाठशाळा व सरकारी दवाखाना हीं चांगल्या दगडी इमारतींत आहेत. पोस्टाची व्यवस्था मात्र चांगलीशी नाहीं. पोस्ट-ऑफिस एका दुकानाच्या बाजूच्या लहान खोलींत आहे व तो दुकानदारच पोस्टाचें काम पाहात असतो. टेहेरीहून येथें रोज संध्याकाळीं रनर टपाल घेऊन येतो व सकाळीं टपाल घेऊन जातो. तार दिल्यास तीहि हा रनर ती टपालाबरोबर टेहेरीस घेऊन जातो व टेहेरीहून ती तारेनें जाते. टेहेरीहून येथें टपाल येण्यास दोन दिवस लागतात. हृषीकेश येथून निघाल्यापासून पंधरा दिवसांनीं घरचें ता. ११ चे पत्र येथें मिळाले. धर्मशाळेच्या मागें चांगले शौचकूप बांधले आहेत. धर्मशाळेलगत भागीरथीवर मणिकर्णिका नावाचा घाट बांधलेला आहे. मणिकर्णिका घाटाच्या बाजूस दुसरा एक घाट आहे. वरच्या बाजूस विश्वेश्वराचें, एकादशरुद्राचे व शक्तिदेवीचे अशीं तीन सुंदर दगडी बांधणीचीं देवळें आहेत. शक्तिदेवीच्या देवळांत चौकोनी ताम्रपटावर शक्तिचक्र आहे. हा ताम्रपट आद्य शंकराचार्यांच्या वेळचा आहे असें म्हणतात. तसाच त्या देवळासमोर मोठा दोन पुरुष उंचीचा लोखंडी त्रिशूल ( Trident ) आहे. शक्तिदेवीचे देऊळ विश्वेश्वराच्या देवळासमोर आहे. गांवाच्या मागच्या बाजूस नाना तऱ्हेच्या हिरव्यागार वनस्पतींच्या झुडुपांनीं भरलेला गंधमादन पर्वत आहे. ह्या पर्वताच्या पायथ्याशीं व भागीरथीच्या कांठीं साधुसंतांच्या पुष्कळ कुटी आहेत. त्यांत ३०० वर संन्याशी राहतात. त्यांपैकीं बरेच फार विद्वान् व अधिकारी पुरुष आहेत असें सांगतात. उत्तरकाशी येथें बरींच अन्नछत्रें आहेत.

त्यांमधून ह्या संन्याशांना कोरडा शिधा ( कोरान्न ) अथवा शिजलेलें अन्न पुरविलें जातें. ह्यापैकीं कांहीं संन्याशी सहा महिने येथें व सहा महिने गंगोत्री येथें राहाणारे आहेत. भागीरथीचें स्नान करून पूजा-पोथी व जेवण वगैरे आटोपून जरा विश्रांति घेतली. घरीं पत्रें लिहिलीं व तीं टपालांत टाकून देवळें व गांवांतील इतर इमारतीं पाहून धर्मशाळेंत परत आलों. रात्रीं दूध न मिळाल्यामुळें हॉर्लिक्स माल्टेड मिल्क घेतलें व झोंपीं गेलों.

## सोमवार ता. २६ जून १९३९. दिवस १६ वा.

सकाळपासून झिरमिर पाऊस पडूं लागला. मणिकर्णिका घाटाजवळच्या दुसऱ्या घाटावर भागीरथीचें स्नान केलें. भागीरथीला बराच पूर आला होता. पूजा-पोथी व जेवण साडेदहापर्यंत आटोपलें. पाऊस पडत असल्यामुळें आज रात्रीं येथें मुक्काम करावा लागेल कीं काय ह्या विवंचनेंत होतों. इतक्यांत काल संध्याकाळीं आलेलें ता. १५ चें घरचें पत्र मिळालें; त्यामुळें घरची खुशाली कळली. बाराच्या सुमारास पाऊस थांबला, तेव्हां निघण्याचा बेत केला व साडेबाराच्या सुमारास उत्तरकाशी येथून निघालों. वाटेंत येथील डेप्युटी कलेक्टर भेटले. हे गृहस्थ ब्रिटिशमधील लष्करी पेन्शनर असून टेहरी संस्थानामध्यें नोकरीस होते. हे टेहरीचे रहिवाशी आहेत असें त्यांनीं सांगितलें. पुढील रस्ता पावसामुळें खराब झाला आहे, संभाळून प्रवास करा असें त्यांनीं सांगितलें. ईश्वर सांभाळणार आहे असें सांगून त्यांची रजा घेतली. गंगोत्रीचा एक पंडा आपलें गत्राळें घेऊन आमच्या मागें येत आहे असें कळलें. आम्हास पंड्याची जरूर नाहीं, आमच्याबरोबर आमचा नोकर व दंडीवाले आहेत, ते चांगले माहीतगार आहेत असें त्यास सांगितलें तरी तो ऐकेना, तेव्हां तूं बळजबरीनें आमच्या पाठीं येऊं लागलास तर डेप्युटी कलेक्टर यास कळवीन, अशी धमकी दिल्यावर तो मागें परतला. पुढें तीन मैलावर असलेल्या **गंगोरीचट्टी** येथें पावणेदोनला आलों. उत्तरकाशी सोडल्यानंतर दोन मैलपर्यंत भागीरथीच्या दोन्ही कांठाला संन्याशांच्या कुटी दिसत होत्या. गंगोरीपर्यंत बहुतेक चढाव व थोडा उतार आहे व रस्ता भागीरथीच्या कांठानें गेला आहे. गंगोरी येथें भागीरथी व असिगंगा यांचा संगम झाला आहे.

## डोडीताल.

येथून एक रस्ता **डोडीताल** नावाच्या सुप्रसिद्ध तलावास असिगंगेच्या बाजूनें गेला आहे. दोन मैल घेराचा हा सुंदर तलाव गंगोरीपासून सोळा मैलांवर

आहे. असिगंगा ह्या तलावापासून उगम पावते. गगनचुंबित बर्फमय पर्वत-शृंगामधील १३,००० फूट उंचीवर असलेल्या ह्या तलावाचे दृश्य अवर्णनीय आहे. भोंवतालच्या हिममय शृंगावरून ह्या तलावांत आलेलें पाणी फारच स्वच्छ आहे. बहुतेक तलाव सुंदर कमळांनीं भरलेला आहे. अनेक रंगांच्या प्रफुल्लित फुलांनीं भरलेलीं, तलावाभोंवतालच्या सपाटीवरील हिरव्यागार वन-स्पतींचीं झुडपे, त्यांचा मधुर सुगंध व भोंवतालचीं आकाशास मिळून दिस-णारीं हिमाच्छादित पर्वतांचीं शृंगे असा हा हुबेहूब चित्रासारखा भव्य देखावा एकसारखा पाहात राहावें असे वाटतें. हिमाचलातील सृष्टिदेवीच्या सुंदर देवालयाचें हें पहिले दृश्य आहे. ( सृष्टिदेवीच्या सौंदर्याचीं अशींच दुसरीं देवालयें वसुकिताल, तिसरें लोकपाल व चौथें सत्यपंथ अथवा सतोपंथ येथें आहेत. त्यांचे वर्णन पुढें योग्य स्थळीं देण्यांत येईल. ) येथे मुक्कामास जागा नाहीं व थंडी बरीच असल्यामुळे सृष्टिसौंदर्याच्या ह्या अप्रतिम दृश्याचें दर्शन घेऊन लगेच गगोरी येथें आलो. येथें संगमावर सरकारी डाकबंगला, एक दुकान व लहानशी एक झोपडी आहे. पुढे सुमारें दोन फर्लांगपर्यंत रस्ता असिगंगेच्या बाजूनें जातो व नंतर बऱ्याच लांब लाकडी फळ्याच्या पुलावरून पुन्हा भागी-रथीच्या बाजूला येतो, व नंतर हिरव्यागार झुडुपांनीं व सुरूच्या वृक्षांनीं भर-लेल्या पर्वताच्या बाजूनें गेल्यावर कचोऱ्याच्या फुलांनीं भरलेल्या डोंगरावरून जातो. गंगोरीस येण्यापूर्वींहि असाच कचोरीच्या फुलांनीं भरलेला डोंगर लागला होता. पुढें **नैताला** व **गवन** नांवाच्या दोन चट्टया लागल्या; परंतु तेथील धर्मशाळा व चट्टया अगदीं वाईट स्थितींत होत्या, करीतां तेथें न उत-रतां पुढें **मनेरी** येथें आलों. दरम्यान गवन येथें येण्यापूर्वीं भागीरथीस मिळ-णारी एक लहान नदी, तिच्यावरील पूल वाहून गेला असल्यामुळें नदींतील मोठ्या खडकावर टाकलेल्या फळ्यांवरून, मोठ्या सावधगिरीनें ओलांडावी लागली. नंतर सुमारें एक मैलपर्यंत पुन्हां कचोऱ्यांनीं भरलेली लहानशी सपाटी लागली. आतां भागीरथी एक फर्लांगपलीकडे खोल दरींतून वाहात होती. नंतर पुढचा रस्ता मोठमोठ्या पांढऱ्या रंगाच्या खडकांतून गेला आहे. पुढें थोड्याशा चढणी-उतरणी लागल्या व एका बाजूनें पर्वताचा कडा व दुसऱ्या बाजूस खोल दरींतून वाहाणारी भागीरथी व मधील अरुंद रस्त्यास सुरुवात झाली. जेथें दरी अतिशय खोल होती तेथें दरीच्या बाजूला कच्चा दगडी बांध होता. परंतु तोहि पावसामुळे ठिकठिकाणीं कोसळला होता. असा कठीण मार्ग

क्रमीत पुन्हां कचोऱ्यांनीं भरलेल्या लहानशा सपाटीवर आलो. नंतर पर्वतावरून खालीं पडणाऱ्या धबधब्यापासून खाली वाहात जाणाऱ्या एका नदीवरील लांब लाकडी फळ्यांचा पूल ओलांडून मनेरी येथे पोहोचलों. त्या वेळीं रात्रीं नऊचा सुमार झाला होता. मनेरीचट्टी एका धबधब्याच्या बाजूला बऱ्याच उंचीवर आहे व तेथून सुमारें एक फलांग पलीकडे खोल दरींतून वाहाणारी भागीरथी, तिला मिळणारी नदी व तिच्या बाजूचा सर्व देखावा फार सुंदर आहे. येथें दोन लहान धर्मशाळा आहेत. पैकीं एकीचा व्हरांडा मोठा दिसला; त्यात आम्ही मुक्काम दिला. बारा वाजल्यापासून एकंदर २६ मैलाचा प्रवास झाला होता. दूध मिळालें ते घेऊन झोपीं गेलों.

**मंगळवार ता. २७ जून १९३९. दिवस १७ वा.**

मनेरी येथून पहाटेस पाच वाजतां निघालो. पुढें एक मैल रस्ता सरळ आहे. नंतर खोल दरींतून वाहाणाऱ्या भागीरथीच्या बाजूनें सुमारें दीड मैलाची उतरण आहे. रस्ता ठिकठिकाणीं बराच रुंद आहे; परंतु मोठमोठया पांढऱ्या दगडातून गेला आहे. नंतर तो पर्वताच्या कडेने जाताना अगदीं अरुंद झाला आहे. एक मैल पुढें पावसाने रस्ता वाहून गेला असल्यामुळें कुलीच्या मदतीनें आम्हांस तो भाग मोठ्या प्रयासानें ओलांडावा लागला. नंतर पांढऱ्या शुभ्र दगडानें भरलेल्या पर्वतांच्या व खोल दरींतून वाहाणाऱ्या भागीरथीच्या बाजूने एका नदीजवळ आलों. बाजूच्या पर्वतावरून खालीं पडणाऱ्या तीन चार धबधब्यापासून उगम पावणारी ही नदी लांकडी फळयांच्या पुलावरून ओलांडून **कुम्हाली** येथें आलो. मनेरीपासून कुम्हाली चार मैल आहे. साताचा सुमार झाला होता. झिमझिम पाऊस पडण्यास सुरुवात झाली होती, तरीहि भोंवतालचा सुंदर देखावा मनास एक प्रकारचा आनंद देत होता. दरींतून ' सों सों ' आवाज करीत वाहाणाऱ्या भागीरथींत पांढऱ्या दगडांनीं व कांहीं ठिकाणी सुरूच्या झाडानीं भरलेलीं लहान लहान सुंदर बेटें व धबधब्याच्या पाण्यापासून चालूं असलेल्या पिठाच्या गिरण्याचीं तीन चार झोपडीं हीं ठिकठिकाणीं दिसत होतीं. कुम्हाली येथें एक लहानशी धर्मशाळा व एक दुकान आहे. येथें येईपर्यंत दहाचा सुमार झाला होता. पाऊसहि पडत होता; करितां ह्या धर्मशाळेत उतरलों. नदींत स्नान केलें व पूजा-पोथी वगैरे उरकून एक वाजेपर्यंत विश्रांति घेतली. पाऊस थांबल्यामुळें पावणेदोनच्या सुमारास कुम्हाली येथून निघालों. एक मैल सरळ रस्त्यानें गेल्यावर एका बाजूस

पर्वताचा उभा कडा व दुसऱ्या बाजूस खोल दरींतून वाहाणारी भागीरथी असा रस्ता सुरू होतो. कांहीं ठिकाणी हा रस्ता अगदीं अरुंद आहे व बऱ्याच चढणी-उतरणीहि आहेत येथेंहि दोन ठिकाणीं रस्ता वाहून गेला असल्यामुळें ते भाग कुलींच्या मदतीने ओलांडण्यास फारच कठीण पडलें. पुढे एक लहानशा ओहो-ळावरील मोडकळीस आलेल्या लाकडी पुलावरून **मल्लाचट्टी** येथें आलों. येथून एक रस्ता बुढाकेदारवरून केदारनाथ व बद्रीनाथ येथें जातो व दुसरा रस्ता गंगोत्रीला जातो. आम्ही गंगोत्रीच्या मार्गास लागलों. आम्ही मल्लाचट्टी येथें आलों त्या वेळीं दोन वाजले होते. पुढें एक मैल रस्ता खोल दरींतून वाहाणाऱ्या भागीरथीच्या बाजूने, परंतु एका खिंडीतून जातो. ही सर्व खिंड मोठमोठ्या काळ्या-पांढऱ्या दगडांनीं व इतर सुरु व हिरव्यागार झुडुपांनीं भर-लेली आहे. कांहीं ठिकाणीं रस्ता अगदीं अरुंद असून मोठमोठया खडकाच्या खालून गेला आहे. एका नदीवरील मोडकळीस आलेल्या लाकडी पुलावरून पुढें गेल्यावर पावणेतीनच्या सुमारास **भटवारीस** आलों. भटवारी मनेरीपासून ४ मैल आहे. येथ भागीरथीच्या कांठावरील एका थोड्या उंचशा सपाटीवर काली-कमलीवाले याच्या दोन दुमजली धर्मशाळा व अन्नछत्र ही आहेत. धर्मशाळेच्या पहिल्या मजल्यावरील एका खोलींत आम्ही उतरलों. धर्मशाळेच्या सज्जा-मधून आजूबाजूचा भव्य व सुंदर देखावा दृष्टीस पडतो. धर्मशाळेपासून थोडयाशा उंचीवर भास्करेश्वर महादेवाचें दगडी देवालय आहे. ह्या देवालयाची बांधणी बुद्धकालीन स्तूपाच्या आकाराची आहे. देवळाच्या जरा पलीकडून वाहात येणारी वानगंगा नावाची नदी खालीं भागीरथीस मिळते व म्हणून भटवारीस भास्करप्रयाग म्हणतात. देवळापासून बऱ्याच उंचीवर पहाडी ब्राह्मणाचा सुमारें ४० घराचा गाव आहे. एवढ्यावरून ह्या ठिकाणास 'भटवारी' हें नाव पडले असावें. देवळांत शिवलिंग, गणपति, पार्वती व सूर्यनारायण ह्यांच्या दगडी मूर्ती आहेत. देवालयाच्या घुमटाखालील दगडावर सूर्याची आकृति कोरली आहे. येथील पुजाऱ्यानें आम्हास असें सांगितलें कीं, ह्या आकृतीपासून दीड फूट खालीं एका दगडावर एक शिलालेख होता. परंतु कांहीं वर्षांपूर्वी देवालयाच्या त्या भागावर वीज पडली व तो सर्व भाग पडून गेला. पुढें तो भाग पुन्हा बांधला त्या वेळीं त्या शिलालेखाचा दगड नव्या बांधणींत कोठे गडप झाला. देवालयाच्या डाव्या बाजूस एका लहानशा देवळांत अंबिकेची

( पार्वतीची ) मूर्ति आहे, व उजवीकडे एक पडकी इमारत आहे. बऱ्याच वर्षांपूर्वी या इमारतींत कृष्णानंद स्वामी नांवाचे दक्षिणेकडील संन्याशी रहात असत, व त्यांनीं तेथें सदावर्तहि ठेविले होतें; परंतु ते येथून दुसरीकडे कोठें गेले. ही माहिती आम्हांस पुजाऱ्याने दिली. देवालयानजीक एका लहान कुटींत एक वृद्ध संन्याशी चांदीच्या पादुका पुढें ठेवून एक लहान पुस्तक वाचीत बसला होता. चौकशीअंतीं असें कळले कीं, हा संन्याशी धराली येथून सात आठ दिवसांपूर्वी येथें आला आहे. ( धरालीची माहिती पुढें योग्य स्थळीं दिली आहे. ) देवालयापासून सुमारें एक फर्लांगावर प्राथमिक शाळेची इमारत व पटवारी ( पोलिस–पाटील ) क्वार्टर्स व जरा उंचीवर डाकबंगला आहे.

## बुधवार ता. २८ जून १९३९ दिवस १८ वा.

भटवारी येथून सकाळीं आम्ही पांच वाजता निघालों. रस्ता खडबडीत असून मोठमोठ्या पांढऱ्या दगडांतून गेला आहे. एक मैल गेल्यानंतर रस्ता तुटून गेला होता. तेथें मोठी भेग पडली होती. ही भेग तीन कुलींच्या सहाय्यानें मोठ्या कष्टानें ओलाडावी लागली. येथें पावसासहि सुरुवात झाली. पुढें भागीरथीच्या काठानें व काळ्या दगडी पर्वताच्या बाजूनें चढावास सुरुवात झाली. अर्धा मैल पुढें आल्यावर पर्वतावरील मोठमोठाले दगड रस्त्यावर येऊन पडल्यामुळें रस्त्यात ठिकठिकाणीं अडथळा झाला होता. येथूनहि कुलींच्या मदतीने चालणें भाग पडले. जरा पुढें आल्यावर पलीकडील हिमाच्छादित रुपेरी शिखरें दिसूं लागलीं. पुढच्या खिंडींत उतरेपर्यंत तीं दिसत होतीं. ही सर्व खिंड तऱ्हे-तऱ्हेच्या रंगीबेरंगी फुलांनी व रानगुलाबांनीं भरलेली होती व एक प्रकारचा आल्हादकारक सुगंध येत होता जरा पलीकडे भागीरथी १० ते १५ फूट अरुंद दरींतून वहातांना दिसत होती. रस्ता मात्र फारच अवघड जागेतून जात होता. आतापर्यंत भागीरथीस मिळणाऱ्या तीन नद्यांवरील मोडके लाकडी फळ्यांचे पूल ओलांडावे लागले. चौथ्या मैलाजवळ आल्यावर पाऊस थांबला. चकचकीत सूर्यप्रकाश पडला. येथून पुन्हां चढावास व अरुंद रस्त्यास सुरुवात झाली. पुढें एकसारख्या दोन मैलांच्या उतारास सुरुवात झाली. नंतर दोहों तीरांवरील लाकडी खांबास बांधलेल्या जाड तारा व त्यांवर बांधलेल्या लांकडी फळ्या अशा तऱ्हेचा भागीरथीवरील झुलता पूल ओलांडावा लागला; व पुढें भुकी-चट्टीवर आठच्या सुमारास येऊन पोहोंचलों. येथें एक दुकान आहे. त्यावर

दूध व क्रुशन सॉल्ट घेतलें. येथें धर्मशाळा आहे असें वाचलें होतें. परंतु ती कोठें दिसली नाहीं. दुकानदारास विचारतां तो म्हणाला, येथें धर्मशाळा होती; परंतु ती सात वर्षांपूर्वी भागीरथीच्या पुरांत वाहून गेली. भुक्कीपासून पुन्हां चढ-उताराच्या खडबडीत रस्त्यास सुरुवात झाली. एका लहानशा नदीवरील लांकडी फळ्यांचा पूल ओलांडल्यावर एका बाजूस काळ्या फत्तराच्या पर्वताचा उंच कडा व दुसऱ्या बाजूस खोल दरींतून वाहाणारी भागीरथी, अशा अरुंद रस्त्यास सुरुवात झाली. नंतर दीना नदीवरील मोडकळीस आलेला लांकडी पूल ओलांडला. ही नदी डावीकडील पर्वतांच्या कड्यावरून खालीं पडणाऱ्या धब-धब्यापासून उगम पावते. येथें रस्त्याच्या दोन्ही बाजूंस बोरूच्या जाडीइतक्या बांबूंचीं बेटें, देवदाराचे व सुरूचे मोठमोठे वृक्ष दिसूं लागले. पुढें भागीरथीच्या कांठानें चढउताराच्या रस्त्यास सुरुवात झाली. ह्या रस्त्यावर एक मोठा पिंवळा-



**भागीरथी नदीवरील लांकडी फळ्यांचा पूल.**

धमक नाग दृष्टीस पडला. त्याची लांबी सहा-सात फूट व जाडी तीन-चार इंच होती! येथून भागीरथीच्या पलीकडील तीरावर असलेली **गंगणाणी**चट्टी दिसूं लागली. एक रस्ता भागीरथीवरील लाकडी पुलावरून गंगणाणीस जातो; व दुसरा उजव्या हातास असलेल्या डोंगरावर जातो. त्या रस्त्यानें सुमारें एक फर्लांग गेल्यावर **ऋषिकुंड** नांवाचीं तीन ऊन पाण्याचीं कुंडें आहेत. दंडी-वाल्यांना दंडी गंगणाणीस घेऊन जाण्यास सांगून आम्ही व आमचा नोकर

ऋषिकुंड पाहावयास वर चढलों. येथें दोन मोठीं व एक लहान अशीं तीन गरम पाण्याचीं कुंडें आहेत. एकास व्यासकुंड, दुसऱ्यास वशिष्ठकुंड व तिसऱ्यास नारद-कुंड म्हणतात. कुंडातील पाण्याची उष्णता १३२° फयारनहीट आहे. वर असलेल्या एका देवळाच्या खालील झऱ्यांतून वाफेनें भरलेले पाणी कुंडांत येतें व बाजूच्या थंड वातावरणानें तें आंत उतरण्याइतकें गरम होतें. या देवळास पाराशर ऋषींचे देऊळ म्हणतात. आंत एका दगडास चिकटून राहिलेला पांढरा दगड व त्याला बोट टोंचल्यासारखे खळगे आहेत. हीच पाराशर ऋषीची मूर्ति असें सांगण्यात येतें. कुंडांत स्नान करून त्याच्या उजवीकडे जरा उंचीवर असलेल्या कुटींत गेलों. तेथें स्वामी गंगेश्वरानंद नांवाचे एक संन्याशी रहातात. त्यांना विचारतां ते म्हणाले, मी सहासात वर्षे येथें रहात आहे. येथें येण्यापूर्वी ते धराली, हृषी-केश, हरिद्वार व कंकळ येथें रहात असत असे त्यांनी सांगितलें. हे मूळचे कुर्ग-कडील रहाणारे आहेत. गीता व भागवत यांचे पाठ करण्यात आपला वेळ घालवितों असें ते म्हणाले. नंतर आम्ही गंगणाणी येथें गेलों. येथें मोठी धर्म-शाळा भागीरथीच्या कांठावर उंच सपाटीवर आहे. धर्मशाळेच्या एका खोलींत आम्ही मुक्काम केला. पूजा-पोथी व जेवण उरकून तीनच्या सुमारास गंगणाणी सोडली. भागीरथीच्या कांठानें खडबडीत चढणीउतरणीवरून व उंच उंच कड्यावरून सुमारें चार मैलांचा प्रवास झाला. पुढच्या दोन मैलांतील रस्ता फारच अरुंद असून तीन ठिकाणीं मोठीं भगदाडे पडलीं होतीं; त्यामुळें बहुतेक मार्ग चालून जावें लागले व तुटलेले भाग कुली व नोकर यांच्या मदतीनें पार पाडावे लागले. अशा अवघड रस्त्यानें सुमारें सहा वाजतां भागीरथीवरील लोखंडी पूल ओलांडून **लोहरीनाग** येथें पोहोंचलों. येथें तीन खोल्यांची जुनाट धर्मशाळा आहे. तीनहि खोल्यांचा गुरें बांधण्यास उपयोग केला जात असावा. त्यांतील थोड्या स्वच्छशा खोलींत आम्हीं मुक्काम दिला. व्हरांड्यात लहा-नसें दुकान होतें. खेंचरांवर, मेंढ्यांवर व स्वतःच्या पाठीवर माल घेऊन जाणारे कांहीं पहाडी लोक व्हराड्यांत चुली पेटवून रोट्या भाजीत होते; त्यामुळें खोली धुरानें भरत होती. अशा स्थितींत रात्र काढणें भाग पडलें. मध्यरात्रीच्या सुमा-रास कडा कोसळल्याचा मोठा आवाज ऐकूं आला. सकाळीं चौकशीअंतीं असें कळलें कीं, भागीरथीच्या पलीकडील पर्वताच्या कड्याचा कांहीं भाग कोसळला व त्याखालीं दोन गाई प्राणास मुकल्या.

## गुरुवार ता २९ जून १९३९. दिवस १९ वा.

सकाळीं सहा वाजतां आम्ही लोहरीनाग येथून निघालों. पुढें चार मैल रस्ता

खडबडीत असून साधारण चढाव आहे. रस्त्याच्या कांहीं उंच भागावरून पलीकडील बर्फाच्छादित शुभ्र पर्वताचीं उंच शिखरें दृष्टीस पडतात. येथपासून रस्ता गर्द जंगलांत शिरतो व अवघड वळणानें गगनचुंबित वृक्षांनीं भरलेल्या पर्वतावर जातो. भागीरथी आतां बरीच बाजूला रहाते. कांहीं उंच वळणावरून खोल दऱ्यांतून वहाणारी भागीरथी दूरवर दृष्टीस पडते. एक लहान नदीवरील फळ्याचा पूल ओलांडल्यानंतर आजूबाजूला ठिकठिकाणीं अक्रोड, अंजीर व जर्दाळूचीं मोठालीं झाडें दृष्टीस पडतात. दरम्यान एकेठिकाणीं तुटलेला रस्त्याचा भाग कुलींच्या व नोकरांच्या मदतीनें ओलांडावा लागला. जवळच एका कड्यांतून वाफ निघणारें पाणी झिरपताना दिसले. असा अवघड मार्ग क्रमीत दुपारीं साडेबारा वाजतां लोहरीनागपासून पाच मैलांवर असलेल्या सुक्की येथे आलों. येथें उंच सपाटीवर कालीकमलीवाल्याची धर्मशाळा आहे. धर्मशाळेच्या पहिल्या मजल्यावर एका खोलींत आम्ही उतरलों. धर्मशाळेच्या बाजूला दगडी कुंड आहे व वरून येणारें पाणी त्या कुंडांत सोडले आहे. कुंडात उतरण्यास दगडी पायऱ्या आहेत. ज्या बाजूनें कुंडांत पाणी पडते, त्या बाजूला मोठ्या दगडावर कोरलेल्या तीन मूर्ति आहेत. कुंडांत पडणाऱ्या धारेखालीं स्नान केलों पूजा–पोथी व जेवण आटोपले व दोनच्या सुमारास सुक्की येथून निघालों. येथून एक मैल चढण, एक मैल उतरण व पुढें **झाला** नावाच्या खेडेगांवापर्यंत साधारण सरळ रस्ता आहे. झाला येथें तीनच्या सुमारास पोहोंचलों. येथें सिंध–पंजाब क्षेत्राची लहानशी धर्मशाळा व तीनचार लहान घरें आहेत. येथून दोन्ही बाजूंचे पर्वत देवदाराच्या उंच वृक्षांनीं भरलेले आहेत. ह्या देवदाराच्या दाट जंगलातून बाहेर आल्यावर रस्ता पुन्हां भागीरथीच्या कांठानें गेला आहे. येथे भागीरथीचें पात्र बरेंच रुंद म्हणजे जवळ जवळ हरिद्वार येथील पात्राइतकें रुंद आहे व त्यामध्ये लहान लहान बेटें आहेत. अर्धा मैलपर्यंत रस्ता खडबडीत व चढउतरणीचा आहे व पुढे तो शामगंगा नावाच्या पांढऱ्या दगडांनी भरलेल्या कोरड्या नदींतून जातो. ही नदी एक फर्लांगपलीकडे भागीरथीस मिळते व म्हणून ह्या ठिकाणास **शामप्रयाग** म्हणतात. शामगंगेचे दोन ओढे दोन वाशांना जाड वेलीनें बांधलेल्या फळ्यांवरून ओलांडावे लागले. नंतर 'गॅलीगाड' नांवाच्या सफेद दगडांनीं भरलेल्या कोरड्या नदीतून रस्ता गेला आहे. ही नदीहि सुमारें अर्ध्या फर्लांगावर भागीरथीस मिळते. ह्या ठिकाणास **गुप्तप्रयाग** हें नांव आहे. येथपर्यंत रस्त्याला थोड्या चढणीउतरणी आहेत. परंतु पुढे अर्ध्या मैलावर

असलेल्या हर्सिल अथवा हरप्रयागपर्यंत सरळ रस्ता आहे. हा रस्ता हर्सिलपर्यंत देवदाराच्या दाट जंगलांतून गेला आहे. हर्सिल हें भागीरथीच्या अत्यंत सुंदर व आनंददायक दरीमध्ये आहे. गांवाच्या सुरुवातीस देवदाराच्या फळ्यांनीं बांधलेलीं तिबेटी लोकांचीं घरें व दुकाने आहेत. येथे आल्यावर आपण तिबेटांत आहों असे वाटतें. बसकट चेहेऱ्याच्या लठ्ठ तिबेटी स्त्रिया याकची (yak–तिबेटांतील बैलासारखें केसाळ जनावर) व मेंढरांची लोकर पिंजीत बसल्या होत्या. काहीं स्त्रिया टकळीवर लोकरीचे धागे बनवीत होत्या व कांहीं पुरुष दोऱ्यांचीं वस्त्रे विणीत होते. दुकानावर तिबेटी रज्जूंचे व कांबळ्यांचे ढीग दिसत होते. कांहीं स्त्रीपुरुष घरापुढें फळ्यांच्या बांकावर चहा पीत बसले होते. ओबडधोबड बांधणीचीं शेबडी गलिच्छ पोरें इकडे तिकडे खेळत होतीं. ह्या तिबेटी लोकास इकडे 'जाड' (jad) अथवा 'भोट' म्हणतात. हे लोक इकडून साखर, धान्य वगैरे तिबेटांत नेतात व लोकर, सैंधव–खार वगैरे तिबेटांतील माल इकडे आणतात. हे लोक कांहीं महिने येथें व कांहीं महिने तिबेटांत रहातात. दंडींतून उतरून एका दुकानावर गेलों व रज्जूंच्या किंमती विचारल्या. पांचपासून दहा पंधरा रुपयांपर्यंत किंमतीचे रज्जू दुकानदारानें दाखविले. दुकानदारास तिबेटांतील कांहीं माहिती विचारली. परंतु आमचे प्रश्न त्याला नीट समजले नाहींत असें दिसून आलें. त्यानें मोडक्या हिंदुस्थानींत असें सांगितलें कीं, रस्त्यावरील बर्फ कमी झाल्यावर आम्ही तिबेटास जातों. तेथे जाण्यास दोन अडीच महिने लागतात! चारपांच महिने तिबेटांत राहून मग माल घेऊन इकडे येतों. इकडे आल्यावर आमच्यापैकीं कांहीं येथे राहतात व कांहीं डेहेराडून येथें व्यापाराकरितां जातात. मालाची ने–आण करण्यास आम्ही घोड्यांचा व मेंढरांचा उपयोग करतों. तिबेटांत जातांना बराच रस्ता बर्फानें भरलेल्या प्रदेशांतून गेला आहे व सुमारें सात आठ दिवस अगदीं निर्जन प्रदेशांतून जावें लागते. आमच्या रहाण्याच्या ठिकाणापासून मानससरोवर जवळ आहे व कैलास पर्वतहि जवळच आहे. दुकानदाराजवळून ही माहिती घेतली व पुढें चालूं लागलों. देवदाराच्या गर्द जंगलांतून पलीकडच्या पर्वतावरून येणाऱ्या तीन चार लहान नद्या भागीरथीस मिळण्याकरिता धांव घेत होत्या. ह्या नद्यांस हरिगंगा, नीलगंगा व गुप्तगंगा हीं नावें आहेत. त्यांपैकीं एका नदीवरील लांकडी फळ्यांचा पूल ओलांडून हरप्रयाग येथें चार वाजता आलों. येथें एक लक्ष्मी-नारायणाचे व दुसरें नर्मदेश्वर महादेवाचें अशीं दोन देवळें आहेत. हीं देवळें

आहेत. हीं देवळें स्वामी राजारामजी नांवाच्या ब्रह्मचाऱ्यानें बांधलीं आहेत. देवळांच्यामागें भागीरथीच्या कांठीं काळीकमलीवाल्याची पांच खोल्यांची देवदाराच्या जाड फळ्यांनीं बांधलेली धर्मशाळा आहे व सदावर्तहि आहे. हर्सिल अथवा हरप्रयाग हें समुद्रसपाटीपासून ६,००० फूट उंचावर आहे. जवळच जंगलखात्याचा लाकडी बंगला आहे. ह्या बंगल्याच्या बाजूस विस्तीर्ण बागेंत मोठा दोन मजली बंगला आहे. हा बंगला मिस्टर विल्सन नांवाच्या युरोपियन गृहस्थांनी बऱ्याच वर्षांपूर्वी बांधला व त्यांत ते नेहमी रहात असत; परंतु पुढें ते कोठें निघून गेले व त्यांचा पत्ता न लागल्यामुळें हा बंगला टेहरी सरकारनें आपल्या ताब्यांत घेतला असें कळलें. ह्या बंगल्याच्या बागेत व शेजारच्या दुसऱ्या बागेंत ॲपल्स-( Apples ) चीं झाडें लावलेलीं आहेत. हर्सिल व हरप्रयाग ह्यांच्या आजूबाजूचा देखावा फारच रमणीय आहे. वर्षांतून कांहीं दिवस येथें राहाणाऱ्या तिबेटातील जाड लोकाचीं वस्ती येथे नसती तर हें ठिकाण दुसरें वैकुंठ झालें असतें. खरोखर, सृष्टिसौंदर्याचें हें एक देवालय आहे असें म्हणता येईल. आजूबाजूचा सुंदर देखावा पाहून मुक्काम केलेल्या खोलींत परत आलों. दूध घेतलें व झोपीं गेलों. खोलींतील जमिनीची तक्तपोशीहि देवदारी फळ्यांची होती.

## शुक्रवार ता. ३० जून १९३९. दिवस २० वा.

हर्सिल येथून आम्हीं सकाळीं सहा वाजतां निघालो. देवदाराच्या दाट जंगलांतून सुमारें अर्धा मैल गेल्यानंतर **अनियान** नावाचा भागिरथीवरील पूल ओलांडला. पुलाच्या पलीकडे एक दुकान व त्याच्या बाजूस एक लहान चट्टी आहे. रस्ता सरळ असून आजूबाजूचा देखावा फार मनोहर आहे. तऱ्हेतऱ्हेच्या रानटी फुलांचा, वनस्पतींचा व रानगुलाबांचा मधुर सुगंध मनास आल्हाद देत होता. अशा रस्त्यानें दोन मैल पुढें गेल्यावर **धराली** येथें सुमारें सात वाजतां पोहोचलों. येथून पुढें चार मैलांवर असलेल्या जंगल अथवा जान्हवी-चट्टीवर दुकान वगैरे नाहीं असे कळलें तेव्हां धराली येथें मुक्काम करण्याचें ठरविलें. धराली येथें तिबेटी लोकांबरोबर व्यापार करणारे धारीयाल नांवाचे क्षत्रिय लोक रहातात. येथें दोनतीन धर्मशाळा, तीन दुकानें व २५-३० घरें आहेत. धर्मशाळाच्या जवळ भागीरथीच्या कांठीं शिव व पार्वती याचीं समोरासमोर दोन देवळें आहेत. ह्या देवळांपासून सुमारें पाव फर्लांगावर दूधगंगा नांवाची नदी भागीरथीस मिळते. देवळांची बांधणी बुद्धिस्ट स्तूपांच्या आकाराची

आहे. दोन्ही देवळें पाण्यानें भरलेलीं आहेत. देवळांच्या दरवाजाच्या वरच्या बाजूस अनुक्रमे शिव व पार्वती याच्या मूर्ति कोरलेल्या दिसतात. देवळांच्या बाजूस भागीरथीच्या स्नानाकरितां लहानसा दगडी घाट बांधलेला आहे. घाटाच्या बाजूस मोठ्या दगडावर सूर्याच्या आकाराची मूर्ति कोरलेली आहे व जवळच शिवलिंग आहे. दोन देवळामध्यें मोठा अश्वत्थ वृक्ष आहे व आजूबाजूला फुललेले रानगुलाबांचे बरेच मोठाले गुच्छ आहेत. त्यामुळें देवळाचे आवार फारच रमणीय दिसतें. धरालीच्या आसपास बऱ्याच सुप्रसिद्ध साधुसंतांच्या कुटी आहेत. त्यांपैकीं काहीं गंगोत्री येथील बर्फ कमी झाल्यावर गंगोत्रीस रहातात व तेथें फार बर्फ पडूं लागला म्हणजे धराली येथें येऊन रहातात. घाटावर स्नानास जातांना एक जटाधारी लंगोटी नेसलेले वृद्ध संन्याशी भेटले. आपण येथे किती वर्षें आहांत असे विचारतां ते म्हणाले, " मी येथें ११ वर्षे रहात आहे." पुढे साडेदहाच्या सुमारास धराली येथून निघतांना हे संन्यासी भागीरथींमध्यें कंबरभर पाण्यांत गंगोत्रीकडे तोंड करून उभे असलेले, डोळे मिटलेले व हात जोडलेले असे दृष्टीस पडले. घाटावर स्नान करून पूजा-पोथी व जेवण उरकून साडेदहा वाजतां धराली सोडली. येथून ४ मैलांवर असलेल्या जंगल अथवा जान्हवी-चट्टीपर्यंत रस्ता सरळ असून भागीरथीच्या कडेनें देवदाराच्या दाट जंगलांतून गेला आहे. दरम्यान तीन चार ओढ्यांवरील लांकडी फळ्यांचे पूल ओलांडावे लागले व नंतर अभ्रकाच्या दगडांनीं भरलेल्या पर्वताच्या बाजूबाजूनें रस्ता गेला आहे. रस्त्यानें वनगायींसारख्या दिसणाऱ्या शेपटीला चौरीसारखा झुपका असलेल्या आखूड शिंगांच्या चार तिबेटी गाई चरतांना दिसल्या. **जंगल** अथवा **जान्हवीचट्टी** येथें बारीकशी झोपडी आहे व जंगलखात्याचा बंगला आहे, दुकान वगैरे नाहीं. येथून एक रस्ता धराली समोरच्या पर्वताच्या मध्यावर असलेल्या **मखामा** नांवाच्या गांवास जातो. गंगोत्रीचे पंडे ह्या मखामा गांवांत रहातात. कार्तिक महिन्यानंतर गंगोत्रीस बर्फ पडूं लागलें म्हणजे पुढें चैत्रापर्यंत सहा महिने गंगोत्रीची पूजा, आरती वगैरे मखामा येथील गंगोत्रीच्या देवळांत होते. आम्ही जंगलचट्टी येथें साडेबारा वाजतां पोहोंचलों. येथपासून पुढे भागीरथी पर्वताच्या मुद्दाम फोडून तयार केलेल्या खिंडींतून वाहात आहे असे वाटतें. येथें पुन्हां भागीरथीवरील लांकडी पूल ओलांडावा लागला. येथून देवदाराच्या दाट जंगलांस सुरुवात झाली. रस्त्याच्या बाजूस मध्यें मध्ये अक्रोड, जर्दाळू व अंजीर यांचे मोठाले वृक्षहि दिसत

होते. येथें लहान एकेरी कापडी तंबूंत कांहीं 'भोट' म्हणजे ( जाड ) बायका व पुरुष उतरले होते. बाजूस तीन घोडे व बरीच केसाळ मेंढरें चरत होतीं. तंबूच्या बाजूस काळ्या रंगाच्या गोणीसारख्या मालानें भरलेल्या लहान पिशव्यांचे ढीग पडले होते. एका पुरुषास विचारतां त्यानें सांगितलें कीं, आम्ही इकडील माल घेऊन तिबेटास जात आहोंत. सुमारें एक फर्लांग पुढें गेल्यावर 'तिब्बतकू' व 'गंगोत्रीकू' अशा दोन पाट्या लागल्या. येथून एक रस्ता, जाडगंगा अथवा जान्हवीच्या काठानें मोटन गांवावरून नेलंग खिंडींतून तिबेटांत गेला आहे व दुसरा रस्ता गंगोत्रीस गेला आहे. आम्ही गंगोत्रीच्या रस्त्यास लागलों. थोड्या उतरणीनंतर स्वच्छ पाण्याची जाडगंगा ( जान्हवी ) व दुधासारख्या पांढऱ्या पाण्याची भागीरथी यांच्या संगमाजवळ येऊन पोहोंचलों. हा संगम बऱ्याच खोलीवर आहे. जान्हवीचें पात्र बरेंच रुंद आहे. परंतु तिच्या स्वच्छ पाण्यास अडवून अरुंद पात्राच्या भागीरथीचें पाणी पुढें जातांना दिसतें. ह्या संगमापासून पुढे एका बाजूस खोल दरींतून वहाणारी जान्हवी व दुसऱ्या बाजूस पर्वतांचे उभे कडे फोडून त्यांमधून काढलेला उभ्या चढणीचा रस्ता, वळणें घेत गेला आहे. ह्या रस्त्यास **भैरवघाटी** म्हणतात. ह्या रस्त्यानें बरेंच वर चढल्यावर खालीं पंचवीस-तीस पुरुष खोल दरींतून वहाणाऱ्या जान्हवी नदीवरील लोखंडी गर्डर्सचा झुलता पूल ओलांडावा लागला. ह्या पुलावरून खालीं पाहिलें असतां डोळे फिरतात. पूल मात्र अगदीं भक्कम आहे. हा पूल अलीकडे बांधलेला आहे. जुना तारेचा, हल्लीं निरुपयोगी झालेला झुलता पूल. ह्या पुलापासून बऱ्याच उंचीवर आहे. तो पूल उपयोगांत असल्यावेळीं त्यावरून एकवेळीं फक्त दोन माणसें डोळे मिटून जाण्याचा प्रघात होता असें सांगतात. नव्या पुलावरून बऱ्याच उंचीवरचा हा जुना पूल स्पष्ट दिसतो. भैरवघाटीचा हा सर्व पर्वत गंधकाचा असल्यामुळें ह्या चढावाच्या रस्त्याला फारशी थंडी भासत नाहीं. रस्ता मात्र अतिशय बिकट असल्यामुळें बहुतेक मार्ग चालून जाणें भाग पडलें. जान्हवीकडील रस्त्याच्या बाजूला फुललेले रानगुलाब व तुळशी यांचे गुच्छ व बोरूसारख्या लहान बांबूंचीं बेटें पाहून आल्हाद वाटत होता. कांहीं ठिकाणीं वाफ निघणाऱ्या गरम पाण्याचे झरे आढळले. ह्या झऱ्यांतील मातीचा रंग पिवळा आहे. ह्या झऱ्यापासून जरा पुढें हिंगुळासारख्या तांबड्या रंगाच्या पाण्याचा झरा आहे. ह्या झऱ्याचें पाणी सपाटीवरील ( plains ) खनिज पदार्थमिश्रित पाण्यापेक्षां ( mineral waters )

श्रेष्ठ प्रतीचें आहे. हें पाणी पानथरी व हृदयक्रियेच्या रोगांवर फार गुणकारक आहे अशी ह्या पाण्याची ख्याति आहे. दोन्ही बाजूंचे पर्वत देवदाराच्या दाट जंगलांनी भरलेले होते. भैरवघाटीनें वर जातांना औरंगाबाद येथील मुरलीधर चौकशे नांवाचे गृहस्थ व त्यांच्याबरोबर असलेल्या दोन बायका भेटल्या. हे गृहस्थ पायीं प्रवास करीत होते व बायका कंडींत होत्या. ही मंडळी गंगोत्री पाहून खालीं चालली होती. पुढें अशाच एक मैल नागमोडी चढावानें **भैरवघाटी** नांवाच्या **चट्टीवर** चारच्या सुमारास पोहोंचलों. भैरवघाटी ही चट्टी देवदाराच्या जंगलांत लहानशा सपाटीवर आहे. येथें भैरवाचें लहानसें देऊळ आहे. काळीकमलीवाल्याची दुमजली धर्मशाळा, अन्नछत्र, देवदारी फळ्यांच्या दोन झोंपड्या व एक दोन दुकानें आहेत. मुंबईच्या एका श्रीमंत दयाळू बाईनें बाजूच्या पर्वतावरून लांकडी व लोखंडी नळानें येथें पाणी बांधून आणले असल्यामुळें पाण्याची सोय चांगली झाली आहे. धर्मशाळेच्या पहिल्या मजल्यावरील एका खोलींत आम्ही उतरलों. थंडी बरीच पण उत्साह-वर्धक होती. येथें दूध मिळालें तें घेऊन झोपीं गेलों.

## शनिवार ता. १ जुलै १९३९, दिवस २१ वा.

सकाळीं सहा वाजतां आम्ही भैरवघाटी येथून निघालो. रस्ता थोड्या चढणी-उतरणीनें देवदाराच्या दाट जंगलांतून गेला आहे. पुढे सुमारें एक मैलाचा सरळ रस्ता भागीरथीच्या बाजूनें गेला आहे. त्यानंतर पुढील दोन मैलांचा रस्ता बराच अरुंद असल्यामुळें अवघड आहे. नंतर एक मैलाचा रस्ता खडबडीत असून थोडीं वळणें आहेत. परंतु दोन्ही बाजूला तांबड्या व पांढऱ्या गुलाबांचे व इतर फुलांचे मोठाले गुच्छ, अक्रोड, अंजीर व जर्दाळूचीं मोठालीं झाडें व देवदाराचे मोठाले वृक्ष आहेत. सर्व रस्ताभर ह्याचा व इतर औषधी वनस्पतींचा मधुर सुगंध येत होता. नंतर गंगोत्रीपर्यंत एक मैलाचा सरळ रस्ता देवदाराच्या दाट जंगलांतून गेला आहे. हा एकंदर सहा मैलाचा मार्ग आक्रमण करून नऊच्या सुमारास गंगोत्री येथें पोहोचलों.

## गंगोत्री.

गंगोत्री हें ठिकाण समुद्रसपाटीपासून १०,३०० फूट उंचीवर आहे. थंडी कडक परंतु उत्साहकारक आहे. हिमालयाच्या ह्या भागांतील मनुष्यवस्तीचें हें

शेवटचें ठिकाण आहे. येथें आल्यावर समोरच्या बर्फाच्छादित अनेक शुभ्र पर्वतांमधून भागीरथी जोरानें वाहात येतांना दिसते तिचा मुख्य उगम, ज्यास गोमुख म्हणतात, तें ठिकाण गंगोत्रीपासून पुढें चौदा पंधरा मैलांवर आहे. त्या ठिकाणची उंची १३,००० फूट आहे. त्याचें वर्णन पुढें देण्यांत येईल. गंगोत्री येथें भागीरथीच्या उजव्या बाजूस उतरत्या सपाटीवर चिरेबंदी बांधणीचें सात सोनेरी कळसांचें देऊळ आहे. हें देऊळ जयपूरच्या माजी महाराजांनीं बांधलें आहे. देवळापासून एक फर्लांगावर केदारनाथ येथून येणाऱ्या केदार गंगेचा व भागीरथीचा संगम आहे. संगमापासून एक फर्लांग पुढें भागीरथी सुमारें २० फूट उंचीवरून खालीं पडते. ह्या खोल प्रवाहाचे खालीं डोहांत शंकराची ( केदारनाथाची ) पिंडी आहे, असें सांगतात. ह्या खोल डोहास **गौरीकुंड** म्हणतात. देवळाच्या वरच्या बाजूस तीन मोठ्या धर्मशाळा ( एक काळीकमलीवाल्याची, दुसरी पंजाब-सिंध क्षेत्राची व तिसरी जयपूरच्या महाराजांची) आहेत.ह्या प्रत्येकींत अन्नछत्रें आहेत.देवळाच्या मागच्या बाजूस बैराग्यासाठीं एक निराळी धर्मशाळा आहे. जवळच एक हलवायाचें व तीन किराणा जिनसाचीं दुकानें आहेत व चार पांच पंड्यांच्या झोपड्या आहेत. देवळामध्यें भागीरथीची संगमरवरी दगडाची सुंदर मूर्ति आहे. तिला गंगाजी म्हणतात. गंगाजीच्या डावीकडे काळ्या दगडाची यमुनाजीची मूर्ति आहे व उजवीकडे पार्वतीची मूर्ति आहे. तिच्या पलीकडे राजा भगीरथाची व श्रीशंकराचार्यांची अशा दोन मूर्ति आहेत. जवळच शिवलिंग व इतर लहान मूर्ति आहेत. भागीरथीच्या पलीकडच्या बाजूस पर्वताच्या पायथ्याशीं भोजपात्र व देवदार यांचे दाट जंगलांत आठ दहा संन्याशांच्या कुटी आहेत. ह्या कुटी देवदारी फळ्यांनीं बांधलेल्या आहेत. ह्या सर्व संन्याशांना काळीकमलीवाले क्षेत्रातून व पंजाब सिंध क्षेत्रांतून सदावर्तें मिळतात.

भागीरथीच्या पात्राची रुंदी सुमारें ५० फूट आहे व खोली चार पांच फूट असावी. प्रवाहांतील मोठमोठ्या दगडांवर फळ्या टाकून पलीकडे जाण्याकरितां वाट केली आहे. केदार गंगेवरहि लहानसा लाकडी पूल आहे. कांहीं संन्यासी भागीरथीच्या कांठच्या मोठमोठ्या खडकांतील गुंफांत राहतात. देवळाचे बाजूकडील हिमवत् प्रवाहात तांब्यानें अंगावर पाणी घेऊन स्नान उरकलें. आज व्यास पौर्णिमा असल्यामुळें बरेच बैरागी व यात्रेकरी स्नानास आलेले दिसले. पूजा, पोथी व इतर नित्यक्रम आटोपला

व नंतर गंगोत्री येथील काळीकमलीवाले क्षेत्राचे व्यवस्थापक स्वामी राजारामजी यांची भेट घेतली.

हे पंजाबकडील असून काळीकमलीवाला संस्थेमध्यें आज वीस पंचवीस वर्षें स्वयंसेवक आहेत. त्यांनीं धर्मशाळेमध्यें, यात्रेकरूंच्या उपयोगाकरितां ठेवलेले तिबेटी रग्स व कामळ्यांचे ढीग, दऱ्या, बत्त्या व अन्नछत्रांतील अन्नाचा सांठा हीं सर्व दाखविलीं, व पलीकडच्या कुटींत राहाणाऱ्या कांहीं संन्याशांची भेट मुद्दाम घ्या असें सांगितलें. दुपारीं तीनचे सुमारास फळ्यावरून भागीरथीचें पात्र ओलांडून पलीकडे गेलों. फळ्यांवरून चालतांना व पुढेंहि नोकराची मदत घ्यावी लागली. पलीकडे गेल्यावर प्रथम स्वामी केशवानंद हे वृद्ध संन्यासी भागीरथीच्या तीरावर उंच काठीवर दोन्ही हात टेकून उभे असलेले दिसले. ह्यांना १९३७ सालीं मार्च महिन्यांत हृषीकेश येथें आम्ही भेटलों होतों. त्यावेळींहि हे अशाच स्थितींत गंगेच्या कांठीं उभे असलेले पाहिलें होतें. त्यांचें शरीर जाडजूड असून पोट मोठें आहे. डोक्यावर जटा आहेत. हे फक्त एक लंगोटी नेसतात व प्रातःकाळीं स्नान करून संध्या-काळीं पर्यंत भागीरथीचे काठीं उभे असतात,ह्यांचा आहार म्हणजे मुख्यत्वें दही व कधीं कधीं थोडीशी रोटी हा आहे. हृषीकेश येथें व गंगोत्रीसहि, हे जिन्नस त्यांना काळीकमलीवाले संस्थेकडून पुरविले जातात. आपणास येथें आल्यास पांच सहा दिवस झाले व आतां कार्तिक पौर्णिमेपर्यंत आपण येथें राहणार आहोंत असें तें म्हणाले. बरेंच ठिकाणीं तुटलेला रस्ता दुरुस्त झाला आहे किंवा नाहीं असें त्यांनीं विचारलें. कोठेंहि दुरुस्ती झाली नाहीं असें त्यांना सांगितलें. व्यास पौर्णिमेला गंगोत्रीस पोहोंचल्याबद्दल त्यांनीं आमचें अभिनं-दन केलें. ह्यांची व ह्यांचे बरोबर असलेल्या ह्यांच्या शिष्याची कुटी हे उभे होते तेथून पाव फर्लांगावर आहे. नंतर स्वामी कृष्णाश्रम यांची भेट घेतली. हे दिगंबर असून मौन वृत्तींत असतात. चौकशीअंतीं हें मुलतान-कडील आहेत असें कळलें. ह्याचेजवळ ह्यांची सुमारें पंचवीस तीस वर्षांची, ह्यानी तिच्या तिसऱ्या वर्षापासून बाळगलेली, शिष्यीण आहे. ह्यांच्या खुणा वगैरे तिला कळतात.हे व ह्याची शिष्यीण गंगोत्रीस बर्फ पडण्यास सुरू झाल्या-वरहि येथेंच राहतात. " कांहीं वर्षांपूर्वी हे धराली येथें जात असत परंतु अलीकडे आठ दहा वर्षे ते खालीं जात नाहींत. मला समजूत आल्यापासून मीं ह्यांना दिगंबर पाहतें आहे. परंतु त्यानीं मौन वृत्ति मात्र दहा वर्षांपूर्वीपासून

धरली आहे." असें त्या शिष्यिणीनें सांगितलें. गंगोत्रीची वस्ती खालीं गेल्या वर, आजूबाजूच्या पहाडी लोकाकडून ह्यांना दूध, कंद व कधीं कधीं आटा हीं पुरविलीं जातात. ह्याचा बांधा उंच सडक असून रंग काळसर आहे व डोळे पाणीदार आहेत. नंतर पुढच्या कुटींत स्वामी तपोवनजी नांवाचे एक अधिकारी सन्याशी राहतात, त्याचेकडे गेलों. हे आपल्या कुटीच्या ओटीवर जाड रंगाची कफनी घालून बसले होते. ह्याचा बाधा मजबूत असून रंग गोरटेला. व चेहरा तेजःपुंज दिसत होता. एका बाजूच्या भिंतीशीं थोड्या उंचशा तिवईवर बरेच ग्रंथ व पोथ्या मांडल्या होत्या. त्याचेभोंवतीं देवदाराच्या झाडांच्या लहान फांद्याचें मखर केलें होतें. व मखराला मोठमोठ्या गुलाबाचे हार बांधले होते. व पोथ्यावर गुलाबाचीं फुलें वाहिलीं होतीं. जवळ भगव्या पेहेरावाचे दुसरे दोन संन्यासी बसले होते. ओटीवर गेल्यावर त्यांनीं आम्हास व आमचे नोकरास बसावयास सांगितलें, कोण, कुठूनचे वगैरे विचारपूस केली. व्यास पौर्णिमा गंगोत्रीस साधल्याबद्दल त्यांनींहि आमचें अभिनंदन केल.

**गोमुख** पाहाण्यास जाण्याचा विचार आहे कां म्हणून त्यांनीं प्रश्न केला. रस्ता कसा आहे असें विचारतां ते म्हणाले फारच अवघड आहे. ठिकठिकाणीं बर्फाच्या नद्या ओलांडाव्या लागतात व बराच रस्ता बर्फानें भरलेला असतो. त्यावरून जिवाची पर्वा न बाळगणारे आम्ही किंवा धाडशी युरोपीयन लोकच जाऊं शकतील, तुमच्यासारख्या वृद्ध गृहस्थांच्यानें तो मार्ग आक्रमण करणें अशक्य आहे. गोमुखापासून केदारनाथ वीस मैल आहे. परंतु सर्व रस्ता बर्फानें भरलेल्या पर्वतांच्या बाजूनें गेला आहे. मी स्वतः एकेकाळीं त्या रस्त्यानें केदारनाथाला गेलों होतों असें त्यांनीं सांगितलें. गोमुख येथें शिवलिंगाकार बर्फाचा मोठा पर्वत आहे व त्याचे मधून गढूळ व रेताळ पाण्याची मुसळधार खालीं पडते. तिच्या बाजूस फार वेळ उभे राहणें धोक्याचें आहे कारण वरून घसरणारे बर्फाचे खडक केव्हां खालीं येतील याचा मुळींच नेम नाहीं. स्वामी तपोवनजी हिंदुस्थानींत भाषण करीत होते. परंतु त्यांच्या स्वरभेदावरून हे महाराष्ट्रीयन असावे असें दिसलें व पुढें हें आमचें अनुमान खरें ठरलें. काळीकमलीवाला धर्मशाळेचे व्यवस्थापक स्वामी राजारामजी ह्यांनीं संध्याकाळीं आम्हांस सांगितलें कीं स्वामी तपोवनजी दाक्षिणेकडील असून उत्तर काशी व गंगोत्री येथें ते आज पंचवीस वर्षें आहेत. उत्तर काशी येथें असलेल्या कांहीं संस्कृत जाणणाऱ्या अधिकारी

व्यक्तींमध्यें ते प्रमुख आहेत. वेदान्त, ब्रह्मसूत्रें वगैरे जाणणारांत त्यांना प्रमुख मानलें जातें. स्वामी तपोवनजी यांनी गौमुखाची सांगितलेली माहिती, श्रीनगर ( गरहवाल ) येथील रहिवाशी, ब्रह्मचारी चक्रधर शर्मा यांनीं आपल्या ( Guide to Badrinath Yatra ) ह्या पुस्तकांत दिलेल्या माहितीशीं बरीच जुळते; करितां ती सविस्तर माहिती खालीं दिली आहे.

## गौमुख.

गौमुख नांवाचें पवित्र गंगानदीचें उगमस्थान समुद्रसपाटीपासून १३,००० फूट उंचीवर बर्फमय वातावरणात ( Glacier ) आहे. तेथें ३०० वार रुंदीची व १०० वार उंचीची बर्फाची भिंत आहे. ह्या भिंतीच्या सभोंवतीं बर्फाच्छादित पर्वत आहेत. ह्या बर्फाच्या भिंतीच्या वरच्या भागाला ५० औरस–चौरस मैलांची सतत बर्फानें भरलेली सपाटी आहे. भागीरथी (गंगा), अलकनंदा व मंदाकिनी ह्या नद्यांच्या बर्फमय जळाचा हा एक प्रकारचा खजिना आहे. ह्या तिन्ही नद्या ह्या बर्फाच्या भिंतीच्या निरनिराळ्या बाजूंनीं उगम पावतात. ह्या बर्फमय वातावरणांतील बर्फाच्या भिंतीखालून राड व रेताड पाण्याचा मोठा प्रवाह जोरानें बाहेर पडत असतो. हाच पवित्र भागीरथीचा ( गंगेचा ) मुख्य प्रवाह आहे व ह्यालाच 'गौमुख' हें नांव दिलें आहे. हिमालयाच्या पायथ्यानजीकच्या निर्जळ प्रदेशास सुपीक करण्याकरितां भगीरथानें भागीरथीचा ( गंगेचा ) प्रवाह इकडे आणला तें ठिकाण हेंच असावें. हें ठिकाण गंगोत्रीपासून चौदा-पंधरा मैल आहे. पवित्र भागीरथीचा ( सुर–सरी अथवा देवगंगेचा ) हा उगम अवघड ठिकाणीं आहे व तेथें जाण्याचा रस्ता फारच कठीण आहे. परंतु तेथें जाणें अशक्य नाहीं. हा रस्ता खडकाळ, उभ्या चढणीचा, निसरडा, खडबडीत, बर्फमय व दगडांनीं भरलेला असल्यामुळें ह्या रस्त्यानें एक तासांत एक मैलापेक्षां जास्त चालणें होत नाहीं. ठिकठिकाणीं भागीरथी बर्फाच्या पुलावरून ( Glaciers वरून ) ओलांडावी लागते. ह्या प्रवासास तीन दिवस लागतात, व तो आकाश निरभ्र व स्वच्छ असेल अशा दिवसांत केला पाहिजे. तीन दिवस पुरेल इतकी शिजविलेली शिधासामुग्री व कपडेलत्ते बरोबर ठेवावे लागतात. गंगोत्रीपासून आठ नऊ मैलांवर, भोजपात्राच्या झाडांच्या गुच्छाजवळ एक गुंफा आहे. ही गुंफा सातआठ माणसें बसूं

शकतील इतकी आहे. मंदगतीनें चलन पावणाऱ्या बर्फाच्या ढिगांमधून ( Glaciers मधून ) गेलेला हा रस्ता व ही गुंफा याचा मागमूस लागणें त्या प्रदेशांतील माहीतगार असा वाटाड्या बरोबर असल्याखेरीज अशक्य आहे. पहिल्या दिवशीं ह्या गुंफेत मुक्काम करावा व दुसऱ्या दिवशीं सकाळीं पुढच्या मार्गास लागावें. ह्या गुंफेपासून गौमुख ६ मैलांवर आहे. ह्या गुंफेपासून गौमुख ( Glacier ) येथे जाण्यास चार पाच तास लागतात. गौमुख येथें दोन तीन तास काढून त्याच दिवशीं ह्या गुंफेत परत यावें; बरोबर मुक्कामापुरती सामग्री व कपडेलत्ते असले तरी गौमुख येथें मुक्कामास राहणें धोक्याचें आहे. कारण प्रत्येक पळास वरून येणाऱ्या बर्फाच्या खडकाबरोबर ( Avalanches ) वाहून जाण्याचा संभव असतो. 'Survey of India'च्या नकाशांत हा भाग 'Gaumukh Glaciers' या नांवानें दाखविला आहे.

भगीरथ व त्याचे पूर्वज ह्यांनीं गंगेच्या प्राप्तीकरतां जेथें महान् तपश्चर्या केली व जेथें प्रत्यक्ष शिवशंकर, इतर देवता, यक्ष, गंधर्व, किन्नर व ऋषि हल्लीं गुप्तपणें वास करतात असा हा गौमुख, गंगोत्री व त्यांच्या आजूबाजूंचा प्रदेश, तेथील वातावरण, देवदार, भोजपात्र व इतर औषधी वनस्पतींनीं भरलेलीं तेथील जंगलें, साधकांच्या योगसाधनास स्वाभाविकपणें मदत देणारीं आहेत. हल्लीं देखील ह्या भागांत कोठें कोठें प्रसिद्ध, प्रतिष्ठित, कीर्तिवंत व विद्वान् तपस्वी आढळतात. जगांतील वेदांती व तत्त्वज्ञानी येथील महान् ऋषींच्या मार्फत शास्त्रीय संशोधनास दैवी शक्तीची मदत मिळावी, ह्या हेतूनें दरवर्षी ह्या ठिकाणीं जातात.

## विरोधाभास ( Paradox ).

मानवानीं व पशूंनीं हरतऱ्हेचीं द्रव्यें आंत टाकल्यामुळें भ्रष्ट झालेल्या व दृष्टीस मलिन दिसणाऱ्या गंगेच्या पाण्यांत, मानव जातींतील अत्यंत तीव्र व प्राणघातक रोगांचे जंतू असूनहि तें पाणी इतकें निरुपद्रवी कसें व कां राहिलें ह्याचा थांग अद्यापि कोणास लागला नाहीं. रसायनशास्त्र्यांच्या नव्या पिढीनें संशोधनास सुरुवात केली व अशी कल्पना बसविली कीं, अत्यंत सूक्ष्म परमाणू दर्शविणाऱ्या मायक्रॉस्कोपमधून सुद्धां न दिसणाऱ्या सूक्ष्म जंतूंचें पोषण गंगेचें पाणी करीत असतें, आणि इतर प्राणघातक रोगांच्या जंतूंबरोबरच्या त्यांच्या सतत सुरू असलेल्या लढयांत ते

( गंगेच्या पाण्यांतील सूक्ष्म जंतू ) नेहमीं जय पावतात. ह्या कल्पनेची खरी परीक्षा पहाण्याच्या उद्देशानें, गंगेचें पाणी आत एकहि जिवंत सूक्ष्म जंतू राहूं नये इतकें गाळून शुद्ध केलें, आणि नंतर त्या गाळून शुद्ध केलेल्या गंगेच्या पाण्यात, सूक्ष्म जंतूंची वाढ करण्याच्या प्रचलित कृतीप्रमाणें, दुसरे कांहीं जंतू घातले, परंतु गाळून शुद्ध केलेल्या गंगेच्या पाण्यांत त्या जंतूंची वाढ झालेली दिसण्यात आली नाहीं. नंतर ह्या जंतूमिश्रित गंगेच्या पाण्याचे थोडे थेंब, कॉलरा, आमांश व आंतड्या-संबंधीं ( Enteric ) रोगांच्या अत्यंत विषारी जंतूनें मिश्रित दूध-पाणी भरलेल्या टेस्ट-टयूबमध्यें टाकलें. ह्याचा परिणाम असा झाला कीं, दुधाचा पांढरेपणा दिसेनासा झाला, व मायक्रॉस्कोपमधून निरीक्षण केल्या-नंतर ते रोगांचे अत्यंत विषारी जंतू मेलेले आढळले. ह्यावरून असें अनुमान निघतें कीं, समकालीन माहिती-( Contemporary know-ledge ) प्रमाणें टेस्ट-टयूबमध्यें कोणतेहि शिथिल द्रवपदार्थ ( Inert fluid ) सांपडले नाहींत. इतकेंच नाहीं, परंतु त्या त्या रोगाच्या विषारी जंतूंना मारक असे शुद्ध करणारे वैयक्तिक प्राणी ( Filter passing organisms ) टेस्ट-टयूबमध्यें सापडले.

अशा तऱ्हेनें पवित्र गंगा नदीच्या महत्त्वासंबंधानें व पवित्रपणासंबंधीं हिंदुधर्माची कल्पना पाश्चात्य रसायनशास्त्री देखील कबूल करतात. पवित्र गंगानदीबद्दल रसायनशास्त्र व धर्मशास्त्र याचें एकमत आहे, हें पुढें दिलेल्या ता. ११ मे १९३१ च्या "हिंदुस्थान टाइम्स" ( Hindustan Times ) मधील उताऱ्यावरून दिसून येईल.

The Calcutta correspondent of the **Manchester Guardian** writes:—

"The Ganges is the holiest river of Hindustan, associated in Hindu mythology with diverse benign Deities. On the banks of the Ganges there are various points which are the goals of immense pilgrimage, held at various times and seasons and there is pious merit in every sip from or plunge into its water. So much so that even the dead bodies thrown into it are supposed

to be purified. The more sophisticated say that because the ancients found the Ganges free of mischief they gave it to Gods and Goddesses in their hymns and legends. Their judgment is endorsed by modern science."

संध्याकाळीं गंगेची पूजा व आरती पाहिली व दूध घेऊन झोपीं गेलों.

## रविवार ता. २ जुलै १९३९. दिवस २२ वा.

सकाळीं भागीरथीचें स्नान केलें. पूजा, पोथी वगैरे नित्यक्रम आटोपला. इंदूरकडील कांहीं मारवाडी स्त्रीपुरुषाबरोबर असलेला पंडा चंद्रमोहन नांवाचा व गंगोत्रीचा एक पंडा उत्तरकाशीपासून मधें मधें भेटत असे. ती मंडळी व पंडा चंद्रमोहन हेहि काल दुपारीं गंगोत्रीस आले होते. तेव्हां पंडा चंद्रमोहन यांजकडून भागीरथीची घागर भरून आणविली व तिची पूजा केली व त्याला एक रुपया दक्षिणा देऊन लेख म्हणजे नांव, गांव, पत्ता वगैरे लिहून दिला. जेवण आटोपून थोडी विश्रांति घेतली व साडेबारा वाजतां गंगोत्रीहून निघालों. चकचकीत ऊन पडलें होतें व आकाश स्वच्छ होतें; त्यामुळें आजूबाजूचीं आकाशास मिळून दिसणारीं बर्फाच्छादित रुपेरी पर्वतशिखरें स्पष्ट दिसत होतीं. त्याच्याकडे पहातांना येथून हलूं नये असें वाटत होतें. **भैरवघाटी** येथें आम्हीं दोन वाजता आलों. पुढचा भैरवघाटीचा रस्ता अवघड असल्यामुळें बराच रस्ता चालून जावा लागला. जान्हवी-( जाड गंगा ) वरील पूल ओलांडला. भागीरथी व जान्हवी यांच्या संगमावरील सुंदर देखावा पुन्हां एकदां पाहिला. चार वाजतां **जंगलचट्टीस** आलों. तेथें थोडा विसावा घेऊन संध्याकाळीं सहाच्या सुमारास **धराली** येथें पोहोंचलों. जंगलयेथूनहि बर्फाच्छादित पर्वतशिखरें स्पष्ट दिसत होतीं. भागीरथीच्या पलीकडील पर्वताच्या मध्यावर असलेला गंगोत्रीच्या पंड्यांचा मखामा गांव व त्या गावापासून जरा खालीं असलेलें गंगोत्रीचें देऊळहि आम्ही उतरलों होतों त्या धर्मशाळेंतून स्पष्ट दिसत होतें. दूध मिळालें तें घेऊन झोपीं गेलों.

## सोमवार ता. ३ जुलै १९३९. दिवस २३ वा.

धराली येथून सकाळीं साडेपांच वाजतां निघालों व साडेसहा वाजतां **हार्सिल** येथें पोहोंचलों. तेथें थोडा विसावा घेऊन शामप्रयाग व झालावरून **सुख्खी** येथें आठ वाजतां आलों. आतांपर्यंत ८ मैल प्रवास झाला होता.

सुख्खी येथील काळीकमलीवाले यांच्या धर्मशाळेंत मुक्काम केला. आकाश निरभ्र असल्यामुळें आजूबाजूंच्या बर्फाच्छादित उंच पर्वतांचीं शिखरें स्पष्ट दिसत होतीं. स्नान, पोथी, पूजा वगैरे नित्यक्रम आटोपून व जेवणानंतर थोडा विसावा घेऊन साडेबाराला सुख्खी येथून निघालों. पुढचा रस्ता भागीरथीच्या कांठच्या खोल दरींतून गेला आहे. ह्या दरींत उत्तरेपर्यंत बर्फमय पर्वतशिखरें दिसत होतीं. चार ठिकाणीं तुटलेल्या रस्त्याच्या मोठ्या भगदाडांतून पलीकडे जाण्यास कुलींची मदत घ्यावी लागली व केवळ जगन्नियंत्याच्या कृपेनें आपण येथून पार पडलों असें वाटूं लागलें. सुख्खी येथून गंग्राणी येथें येण्यास ५ तास लागले. तेथील धर्मशाळेंत उतरलों. दूध घेतलें व झोपीं गेलों.

## मंगळवार ता. ४ जुलै १९३९. दिवस २४ वा.

सकाळीं पांच वाजतां **गंग्राणी** सोडली. पुढें अर्ध्या मैलावर एक गरम पाण्याचा प्रवाह लागला. **भुर्खी** येथें सातला आलों. रस्ता दगडाळ व खडबडीत असून मध्यें मोठमोठाले दगड पडले होते; त्यामुळें बराच रस्ता चालावा लागला. एकदोन ठिकाणीं तर रस्ता इतका अवघड होता कीं, तेथून दोन दंडीवाल्यांचा हात धरूनहि चालण्यास फार कष्ट पडले. **भटवारी** येथें दहाच्या सुमारास पोहोंचलों. धर्मशाळेपासून जरा खालीं वाहात असलेल्या भागीरथीचें स्नान केलें. पूजा, पोथी व जेवण उरकून चार वाजेपर्यंत विश्रांति घेतली. कारण सकाळीं बरीच चाल झाली होती. साडेचार वाजतां भटवारी येथून निघालों व साडेपांचला **मल्लाचट्टी** येथें आलों. भटवारीपर्यंत गेल्या रस्त्यानेंच परत आलों; परंतु भटवाडीपासून दुसरा रस्ता लागला. हा रस्ता मल्लावरून केदारनाथला जातो. मल्ला येथें सात आठ खोल्यांची एकमजली धर्मशाळा आहे, व धर्मशाळेंत एक दुकान आहे. धर्मशाळा अगदीं भागीरथीच्या कांठीं आहे. व पलीकडे मोठा उंच पर्वत आहे. **सौरी-की-गाड** नांवाचें पुढचें मुक्कामाचें ठिकाण तीन मैल दूर असल्याकारणानें रात्रीचा मुक्काम मल्ला येथें करण्याचें ठरविलें. येथें दूध मिळालें तें घेऊन झोपीं गेलों.

## मल्लापासून बुढाकेदार २७ मैल.

## बुधवार ता. ५ जुलै १९३९. दिवस २५ वा.

मल्ला येथून सकाळीं पाच वाजतां निघालों. धर्मशाळेजवळ असलेल्या

लाकडी फळ्यांचे पुलावरून भागीरथी ओलांडली व नंतर खडबडीत दगडांनीं भरलेल्या अवघड रस्त्यास सुरुवात झाली. हा रस्ता नसून केवळ पायवाट आहे. इकडे पायवाटेस पगदंडी म्हणतात. येथून भागीरथी बरीच पलीकडे राहते. ह्या पायवाटेला बऱ्याच त्रासदायक चढणी असून ती मोठमोठ्या खडकांतून गेली आहे. पायवाटेच्या दोन्ही बाजूंस रानतुळशी, गुलाब, झेंडू व शेवंती यांचे मोठाले गुच्छ आहेत. ह्या पायवाटेनें **सौरा-की-गाड** येथें पावणेसात वाजतां आलों. येथें दोन लहान झोपड्या व एक दुकान आहे. नंतर मोठाल्या खडकातून खडबडीत उतरणीस सुरुवात झाली. डावीकडील उंच पर्वतावरून खालीं वाहात जाणाऱ्या सौरी नदीचे कांठापर्यंत ह्या उतरणीनें यावें लागलें. ही सौरी नदी पुढें भागीरथीस मिळते. सौरी नदीच्या कांठानें एक फर्लांग पुढें गेल्यावर ही नदी तीन लांब वाशांच्या पुलावरून ओलांडावी लागली. हे वाशेहि एकमेकापासून अर्ध्या फुटाच्या अंतरावर आहेत. मधल्या वाशावर आम्ही, आमच्यामागें आमच्या नोकरानें आमची कंबर धरलेली व बाजूंच्या दोन वाशांवरील दोन दंडीवाल्यानीं आमचे हात धरलेले अशा वधस्तंभाकडे ओढून नेत असलेल्या मेंढ्याप्रमाणें, केवळ परमेश्वराच्या कृपेनें आम्ही ह्या पुलावरून सुरक्षितपणें पलीकडे गेलों. नंतर नागमोडी खड्या चढणीच्या कंटाळवाण्या रस्त्यास सुरुवात झाली. हा रस्ता दाट जंगलांतून गेला आहे. सुमारें अडीच मैलांची चढण चालून जावी लागली. नंतर पुढें **फ्यालू** चट्टीपर्यंत तीन मैल रस्ता सरळ आहे. येथें काळीकमलीवाले यांची बैठी धर्मशाळा, दोन लहान चट्ट्या व एक दुकान आहे. धर्मशाळेच्या अलीकडे २ फर्लांगांवर काळीकमलीवाले यांची पाणपोई आहे. सौरा-की-गाडपासून फ्यालूपर्यंत बऱ्याचशा उंच ठिकाणावरून गंगोत्री व गौमुख 'Glacier' यांच्या भोंवतालचीं बर्फाच्छादित पर्वतशिखरें दिसत होतीं. फ्यालू येथें एका स्वच्छ चट्टींत आम्ही उतरलों. जवळच वरून येणाऱ्या एका स्वच्छ झऱ्याखालीं स्नान केलें. पूजा, पोथी व जेवण उरकलें व थोडी विश्रांति घेऊन अडीचचे सुमारास फ्यालू सोडलें. एका दंडीवाल्यास ताप भरला होता तेव्हां तसेंच चालत निघालों. उजव्या बाजूस दाट जंगलानें भरलेला पर्वत व डाव्या बाजूस जरा पलीकडे खोल दरींतून वाहात असलेली सौरी नदी अशा चढणीउतरणीनें रस्ता इतक्या दाट जंगलातून जात होता कीं, रस्त्यावरून आकाश मुळींच दिसत नव्हतें. पुढें आणखी एक

कंटाळवाणी चढण चढलों व सुमारें पांच वाजतां चुन्ना चट्टीवर आलों. येथें पंजाबसिंध क्षेत्राची धर्मशाळा, एक मोठी चट्टी व दोन दुकानें आहेत. धर्मशाळेंतील खोल्यात उजेड चांगला नव्हता; कारण प्रत्येक खोलीस लहानशी खिडकी होती, म्हणून आम्ही चट्टीमध्यें मुक्काम केला. चट्टीच्या बाजूनें, लहानसा ओढा वाहात होता व आजूबाजूंस रानगुलाब व इतर फुलझाडांचे गुच्छ होते. ताप आलेल्या दंडीवाल्यास क्विनाइन व ॲस्पेरिनच्या गोळ्या दिल्या. रात्रीं दूध घेतलें व झोपीं गेलों.

## गुरुवार ता. ६ जुलै १९३९. दिवस २६ वा.

काल ताप आलेला दंडीवाला परमेश्वरकृपेनें सकाळीं हुशार झाला होता. म्हणून चुन्ना पाच वाजतां सोडलें. येथपासून फारच कठीण नागमोडी चढा-वास सुरुवात झाली. हा कठीण चढावाचा रस्ता कांहीं पर्वताच्या कडेनें व कांहीं पर्वताच्या माथ्यावरून सुरूच्या दाट जंगलामधून गेला आहे. रस्त्याच्या दोन्ही बाजूंला पांढऱ्या व तांबड्या गुलाबाचे गुच्छ व बोरूच्या आकाराचीं लहान बांबूंचीं बेटें दिसत होतीं. ह्या सर्व रस्त्याला दंडीचा उपयोग करणें अशक्य असल्याकारणानें ठिकठिकाणीं दोन दंडीवाल्यांचा व नोकरांचा हात धरून चढावें लागलें. दोन ओढे फळ्यांच्या पुलावरून ओलांडावे लागले. पुढच्या दाट जंगलांत केसाळ डोक्याचे व काळ्या तोंडांचे दोन मोठे वानर भेटले. चार मैलांची ही खडबडीत उभी चढण चढून आठचे सुमारास **बेलक** येथें पोहोंचलों. हें ठिकाण समुद्रसपाटीपासून ९००० फूट उंचीवर पर्वताच्या माथ्यावर आहे ! येथें थंडी बरीच आहे. ही उत्साहवर्धक थंडी व भोंवतालचा देखावा हीं त्रासदायक प्रवासाचे श्रम कमी करतात व पुढचा प्रवास सुरू करण्यास एक प्रकारचा उत्साह वाटतो. येथें दोन चट्ट्या व दोन दुकानें आहेत. जवळच्या स्वच्छ झऱ्याखालीं स्नान केलें. पूजा, पोथी व जेवण उरकलें, व थोडीशी विश्रांति घेऊन बाराचे सुमारास बेलक सोडलें. नंतर पांच मैलांची घसरट चढण सुरू झाली. रस्त्यावर ठिकाठिकाणीं लहान लहान झरे वाहात होते व त्यामुळें बहुतेक रस्ता ओला झाला होता. पुढें अशाच तऱ्हेची उतरण लागली व सुमारें अडीच मैल कांहीं पर्वतांच्या बाजूनें दाट जंगलांतून व कांहींच्या माथ्यावरील सपाटीवरून दोनचे सुमारास **पांगराणा** येथें आलों. बेलक येथून पागराणा पांच मैल आहे. येथें अर्धा तास विश्रांति घेऊन चार मैल पुढें असलेले झाला येथें जाण्यास निघालों. येथून दाट जंगलांतून पाव

मैलाची अवघड उतरण उतरावी लागली. पुढें अर्ध्या मैलाचा चढाव चढलों. नंतर दोन मैलांवर असलेल्या काळीकमलीवाल्याच्या पाणपोईपर्यंत रस्ता सरळ आहे. पुढें दीड मैलावर असलेल्या झाला चट्टीपर्यंत अवघड उभी चढण आहे. झाला चट्टी पांगराणापासून चार मैल आहे. येथपर्यंत दुपारचा ९ मैल प्रवास झाला. पाणपोईच्या जरा पुढें आल्यावर पावसास सुरुवात झाली व त्यामुळें चढणी-उतरणीवरून दोन दंडीवाल्यांचे हात धरूनहि चालण्यास फार प्रयास पडले. झाला येथें संध्याकाळीं ५ वाजतां पोहोंचलों. येथें एक मोठी चट्टी व दोन दुकानें आहेत. ही चट्टी पर्वताच्या माथ्यावरून उगम पावलेल्या धर्मगंगा नांवाच्या नदीच्या कांठावर आहे. ही धर्मगंगा बुढाकेदार येथें बाळगंगेस मिळते, बाळगंगा भिलंगनेस मिळते; व भिलंगना व भागीरथी यांचा संगम टेहरी येथें झाला आहे. ह्या बाजूच्या रस्त्याला मुंग्यासारख्या लहान जळवा आहेत. अनवाणी चालणाऱ्याच्या पायांवर त्या केव्हां चढतात तें कळत नाहीं. परंतु नकळत डसून रक्त पिऊन जरा फुगल्यावर त्या डसल्या आहेत ह्याची जाणीव होते. रात्रीं डायरी लिहीत असता डायरीच्या पानावर वरून बारीक किडीसारखें कांहीं पडलें. नोकरास हाक मारून हें काय आहे म्हणून विचारलें. त्यानें ही जळू आहे असें सांगितलें. इतक्यांत आमच्या डाव्या हाताच्या आंगठ्याजवळील दोन बोटांच्या पेचांत रक्त दिसलें तेव्हां कळून आलें कीं, तेथें ही जळू लागली होती व रक्त शोषण करून फुगल्यावर ती खालीं पडली. नोकरानें सांगितलें कीं कांहीं वेळापूर्वी एक पहाडी मनुष्य आला होता व आपल्या पायांवरील केर व जळवा झाडीत होता त्या वेळीं ही जळू आमच्या हातावर उडाली असावी. कापूस जाळून तो डसलेल्या जागेवर लावतांच रक्त येण्याचें थांबलें. दंडीवाल्यांनींहि सांगितलें कीं त्यांच्यापैकीं दोघांच्या पायांला ह्या जळवा डसल्या होत्या. रात्रीं दूध घेतलें व झोपीं गेलों.

## शुक्रवार ता. ७ जुलै १९३९. दिवस २७ वा.

सकाळीं सहा वाजतां झाला सोडलें. जवळच असलेला धर्मगंगेवरील लाकडी फळ्यांचा पूल ओलांडला. पुढचा खडबडीत रस्ता धर्मगंगेच्या बाजूनें मोठाल्या दगडामधून गेला आहे. रस्त्याला चढणहि बरीच आहे. हा बहुतेक रस्ता चालून जावें लागलें. तीन मैलांनंतर हा रस्ता **अंगूरा** नांवाच्या खेड्यामधून जातो. येथून पुढें दोन मैल रस्ता सरळ. परंतु

खडकाळ आहे. पुढें रस्ता धर्मगंगेच्या काठानें मोठमोठ्या दगडांमधून गेला आहे; व पुढेंहि बुढाकेदारपर्यंत दगडांतून चढणीनें गेला आहे. एकंदर पांच मैल चालून **बुढाकेदार** येथें सुमारें दहा वाजता पोहोंचलों.

## बुढाकेदार.

बुढाकेदार हें धर्मगंगा व बाळगंगा ह्यांच्या संगमाजवळ लहानशा उंच सपाटीवर वसलेलें आहे. गांवांत उत्तम बांधणीचीं, भगवा रंग दिलेलीं तीस चाळीस घरें आहेत. येथें काळीकमलीवाल्याची, खालीं तीन व वर एक खोली असलेली, धर्मशाळा आहे. आम्ही वरच्या खोलींत उतरलों. येथून संगम जरा खालीं दोन फर्लांग लांब आहे. संगमावर स्नान करून बुढाकेदारच्या देवळांत गेलों. हे देऊळ लहान, परंतु बुधीस्ट स्तूपाच्या आकाराचें असून वर छत्रीच्या आकाराचें पाखें व त्यावर सोनेरी कळस आहे. आंत त्रिकोणी आकाराचें, खडबडीत दगडाचें मोठें लिंग आहे. गाभाऱ्यात साधारण काळोख आहे. परंतु मोठा दिवा लावून बारकाईनें पाहिले असतां ह्या त्रिकोणी दगडावर एका बाजूस एकमुखी दत्ताची अगर शंकराची चार हातांची, प्रत्येक हातांत अनुक्रमें माळा, त्रिशूळ, डमरू व चक्र असलेली, काखेंत झोळी असलेली व मुगुटांतून गंगा निघत आहे, अशा आकाराची मूर्ति कोरलेली दिसते. दुसऱ्या बाजूस गणपति व पार्वती ह्यांच्या मूर्ति कोरलेल्या आहेत व तिसऱ्या बाजूस पांच पांडव व द्रौपदी ह्यांच्या लहान मूर्ति कोरलेल्या दिसतात. ह्या देवळाचें पुजारित्व गोरख पंथाचे कानफाटे गोसाव्यांकडे आहे; परंतु कानाच्या मधल्या पाळ्यांत भोंक पाडून त्यांत गारेची मोठी बाळी घालणें, ह्याखेरीज त्यांच्यांत व इतर पहाडी लोकांत कांहींएक फरक दिसत नाहीं. हल्लीं हे सर्व कानफाटे पुजारी पहाडी रजपूत स्त्रियांशीं लग्नें लावून गोसाव्यांचे गृहस्थ बनलेले आढळतात. कानास मोठें भोंक पाडून त्यांत गारेची मोठी बाळी घालणें, ह्याखेरीज दत्त-गोरख पंथाची त्यांना कांहींएक माहिती नाहीं असे आढळून आलें. ह्या ठिकाणास ‘ बुढाकेदार ’ हें नांव पडण्यासंबंधानें अशी दंतकथा सांगण्यांत आली कीं, सत्ययुगांत हें ठिकाणच केदारनाथांचे वास्तव्याचें स्थान होतें; परंतु पांडवांनीं हिमालयाची यात्रा करीत असतां, केदारनाथांचें वास्तव्य हल्लीं असलेल्या बर्फाच्छादित पर्वतामधील दलदलीच्या सपाटीवर

आहे असे ठरविलें व तेंव्हांपासून हें स्थान बुढाकेदार ह्या नांवानें प्रसिद्धीस आलें. धर्मशाळेंत परत येऊन पूजा, पोथी व जेवण उरकलें. दरम्यान पंडा विशालमणि नांवाचा येथील एक पंडा संगमावर व देवळांत आमच्याबरोबर आला होता. करितां त्याला आमचें नांव, गांव व पत्ता हीं लिहून दिलीं. थोडी विश्रांति घेऊन दोन वाजतां बुढाकेदार सोडलें. सुमारें अर्धा मैल चढणी-नंतर रस्ता खडबडीत, परंतु सरळ आहे. पुढें दोन मैल रस्ता पर्वताच्या माथ्यावरून गेला आहे. हा माथा व आजूबाजूच्या दऱ्या, गहूं, तांदूळ, राज-गिरा व बाजरीसारखे इकडील गरीब लोकांचें अन्न ह्यांच्या शेतांनीं भरलेलीं दिसतात. आजूबाजूचे पर्वत व त्यांमधील दऱ्या हिरव्यागार गालिच्यानें आच्छादिल्या आहेत असा भास होतो. एकंदरींत हा सर्व देखावा फार आल्हाद-दायक आहे. पुढें दोन मैल प्रवासानंतर संध्याकाळीं पांच वाजण्याच्या सुमारास **कोलाचट्टी** येथें आलों. पाऊस लागला म्हणून येथें मुक्काम करण्याचा बेत होता, परंतु येथील दुकानदार दुकान बंद करून कोठें गेला होता, व पुढील टोलाचट्टी फक्त दोन फर्लांगावर आहे असें कळलें तेंव्हा कोला येथें जरा थांबून थोड्या चढणीउतरणीच्या खडबडीत रस्त्यानें सहा वाजतां **टोलाचट्टी** येथें आलों. येथें चार मोठ्या चट्टया व दोन दुकानें आहेत. रात्रीचा मुक्काम टोला येथें करण्याचें ठरविलें. येथें दूध मिळालें तें घेऊन झोपीं गेलों.

## शनिवार ता. ८ जुलै १९३९. दिवस २८ वा.

टोला येथून सकाळीं सहा वाजता निघालों. येथून पुढें तीन मैल उभ्या चढणीचा खडबडीत रस्ता दाट जंगलांतून गेला आहे. ह्या रस्त्यानें पर्वताच्या माथ्यावर आलों. माथ्याच्या सुरुवातीस एका झऱ्याच्या बाजूस दोन चट्टया व एक दुकान लागलें. ह्या चट्टीस **भैरवचट्टी** असें म्हणतात. येथें साडेसात वाजत आलों. येथून पुढें अर्ध्या फर्लांगावर लहानसें भैरवाचें देऊळ लागलें. हें देऊळ एका युरोपियन गृहस्थानें भैरवनाथावरील त्याचा दृढ विश्वास, भक्ति व प्रेम ह्यांचें द्योतक म्हणून बांधलें आहे. ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे बुधीस्ट स्तूपावरील छत्रीच्या आकाराच्या पाळ्याचें हें लहानसें देऊळ उंच चबुत्र्यावर आहे. आंत दगडावर कोरलेली भैरवनाथाची मूर्ति आहे. तिला चार हात आहेत. एका हातांत त्रिशूळ आहे. दुसऱ्या तीन हातांत का आहे, त्याचा उलगडा होत नाहीं. मूर्तीच्या बाजूला दोन लोखंडी त्रिशूळ आहेत. बाहेर दरवाजाजेवळ दगडावर कोरलेली हनुमानाची मूर्ति आहे

तिच्याजवळहि दोन लोखंडी त्रिशूळ आहेत. ह्या पर्वताच्या माथ्यावरून अर्धा मैल पुढें चढून गेल्यावर **जंगल**-चट्टी लागली नंतर खडबडीत मोठमोठ्या दगडामधून, परंतु सरळ रस्त्यानें आठ वाजता **भॉट** चट्टी येथें पोहोंचलों. येथेंहि झऱ्याच्या बाजूस दोन चट्ट्या व एक दुकान आहे. एका स्वच्छशा चट्टींत उतरलों. झऱ्याखालीं स्नान केलें व पूजा, पोथी, जेवण वगैरे उरकून बारा वाजता भॉट येथून निघालों. एक मैल चढणीच्या रस्त्यानें पुढें गेल्यावर **चोपट्टा** चट्टी लागली. नंतर थोड्या थोड्या उतरणीच्या रस्त्यास सुरुवात झाली. ह्या रस्त्याच्या डावीकडे पातळ-जंगलानें भरलेले पर्वत व उजवीकडे खोल दऱ्या आहेत. ह्या उतरणीच्या रस्त्यानें एका मोठ्या ओढ्याजवळ आलों व हा ओढा लाकडी फळ्याच्या पुलावरून ओलांडला. नंतर दोन बाजूंस असलेल्या भाताच्या शेतांतून उतरणीच्या रस्त्यास सुरुवात झाली. ही उतरण संपल्यावर रस्ता पर्वताच्या बाजूनें जाण्यास सुरुवात होते. रस्त्याच्या दुसऱ्या बाजूस भिलंगना वाहतांना दिसते. टेहरीहून येणारा रस्ता येथें ह्या रस्त्यास मिळतो. आतापर्यंत एकंदर सात मैलाचा प्रवास करून भिलंगनेवरील लाकडी फळ्याचा पूल ओलांडून, **घुट्टु**चट्टी येथें चारच्या सुमारास आलों. घुट्टु येथें काळीकमलीवाल्याची लहानशी धर्मशाळा व सदावर्त हीं आहेत. धर्मशाळेंत एक काळोखाची खोली व तिच्या तीन बाजूंस मोठा व्हरांडा आहे. एका बाजूच्या व्हराड्यात उतरलों. येथें येण्यापूर्वीच पावसानें सुरुवात केली होती. येथें येऊन उतरताच पावसाच्या मोठ्या सरी पडूं लागल्या. धर्मशाळा भिलंगनेच्या काठाला आहे. जवळच रघुनाथजींचें मंदिर आहे. घुट्टु गांवात पंधरावीस घरें आहेत. धर्मशाळेच्या समोर भिलंगनेच्या पलीकडे असलेल्या पर्वताच्या लहान टेकडीवर शंकराचें मंदिर आहे. ह्या मंदिरास पर्वतावरून पायवाट आहे. पाऊस पडत असल्यामुळे हें मंदिर पाहाण्यास जातां आलें नाहीं. एका बोजेवाल्यास ताप भरला आहे असें कळलें तेव्हा त्याला क्विनाइन व ॲस्पेरीनच्या गोळ्या दिल्या. क्विनाइनची बाटली पाहाताच धर्मशाळेच्या चौकीदारानें माझ्या घरांत दोन मुलांस व बायकोस ताप येत आहे असें सांगून कांहीं गोळ्या मागून घेतल्या. दूध मिळालें तें घेतलें व झोपीं गेलों.

## रविवार ता. ९ जुलै १९३९, दिवस २९ वा.

घुट्टु सकाळीं पांच वाजतां सोडलें. काल ताप आलेला बोजेवाला सकाळीं

हुशार झाला होता व आधींच बोजा घेऊन निघाला होता. प्रथम अर्ध्या मैलाची उभी चढण लागली. ही चढण दोन दंडींवाल्याचे हात धरून चढावी लागली. पुढचा रस्ता साधारण सरळ असून दाट जंगलातून गेला आहे. पुढे अर्ध्या मैलावर गावना चट्टी लागली. नंतर पुढच्या तीन मैलाच्या रस्त्याचा कांहीं भाग जंगलातून व कांहीं भाग पर्वताच्या बाजूनें गेला आहे. रस्त्याच्या दुसऱ्या बाजूला मोठाल्या दऱ्यातून नागमोडीने वाहणारी भिलंगना नदी दिसत होती. तिच्या पलीकडील पर्वताचे मध्यभाग भात, गहूं व बटाटे यांच्या पायऱ्यांसारख्या शेतानीं भरले होते व शिखरावर दाट जंगले दिसत होतीं; व त्या पर्वतांपलीकडे बर्फाच्छादित पर्वतांचीं शिखरें दिसत होतीं. येथे येण्यापूर्वी थोडा पाऊस लागला होता. परंतु पुढें तो थांबला पुढचा रस्ता पर्वताच्या माथ्यावरील लहान लहान सपाट्यांवरून गेला आहे. रस्त्याच्या दोन्ही बाजूस पांढरे, तांबडे व पिवळे फुललेले गुलाब व जांभळ्या तांबड्या, पिवळ्या वगैरे तऱ्हतऱ्हेच्या रंगांच्या फुलानीं भरलेले गुच्छ दिसत होते व त्यांचा सुगंध मनास आल्हाद देत होता. ह्या रस्त्यानें गावनापासून तीन मैलांवर असलेल्या **गोमंडा**-चट्टीवर नऊ वाजता आलों. येथे दोन घाणेरड्या चट्टया व एक दुकान आहे. पुढें असलेली धुपांडा-चट्टी तीन मैल दूर असून रस्ता उभ्या चढणीचा आहे. असें कळलें. तेव्हा गोमंडा येथेंच मुक्काम दिला. चट्टीचे बाजूस असलेल्या झऱ्या खालीं स्नान केलें. पूजा, पोथी व जेवण उरकून बाराचे सुमारास गोमंडा सोडलें. एक मैलपर्यंत पुढचा चढणीचा रस्ता जंगलांतून गेला आहे. नंतर पाव मैलाची खडी चढण आहे व नंतर पुढचा रस्ता, अनेक रंगांच्या फुलांच्या हिरव्यागार गवतानीं भरलेल्या पर्वतांच्या टेकड्यांवरून गेला आहे. ह्या टेकड्या वर मोठीं झाडें मुळींच नाहींत. कारण हा रस्त्याचा भाग समुद्रसपाटीपासून १३,०००फूट उंचीवर असलेल्या पर्वताच्या माथ्यावर आहे. येथें थंडी बरीच वाजत होती; तथापि भोंवतालचीं अनेक रंगीबेरंगी फुलांनीं व औषधी वनस्पतींनीं भरलेलीं हिरवींगार झुडपें मनास विशेष आनंद देत होतीं. धुकें पडत होतें. परंतु मधून मधून कांहीं वेळ स्वच्छ सूर्यप्रकाश पडत असे त्या वेळीं भोंवतालचे उंच उंच पर्वत व त्यांमधील खोल दऱ्या व कांहीं पर्वतांच्या पलीकडील बर्फाच्छादित रुपेरी शिखरें दिसत होतीं व अशा ह्या देखाव्याचें सौंदर्य एकसारखें पहात राहावें असें वाटत होतें. येथें तपकिरी रंगाची एक मोठी खार ( Squirrel ) तोंडांत गवताच्या काड्या धरून जातांना

दिसली. येथून पुढें रस्ता हिरव्यागार मखमाली दरीवरून जात आहे असा भास होतो. एकसारखें धुकें पडलें असता ह्या रस्त्यानें जाणें अवश्यक असतें. कधीं कधीं येथें गारांचा पाऊस पडतो. असें सांगतात कीं जून महिन्यात सुद्धां ह्या रस्त्याला ठिकठिकाणीं बर्फाचे ढीग आढळतात व कधीं कधीं चार मैल बर्फातून चालावें लागतें. व अशा वेळी रस्त्याचा थांग लागणे कठीण पडतें. ह्या भागाला **पंवाली कांटा** असें म्हणतात. पुढें एक मैल असलेल्या पंवाली चट्टीस जाईपर्यंत रस्ता पर्वताच्या अरुंद कड्यावरून गेला आहे. ह्या अरुंद कड्याच्या दोन्ही बाजूंस खालीं नजर पोहोंचत नाहीं. अशा खोल खोल दऱ्या आहेत. आम्हीं पंवाली चट्टी येथें चार वाजता पोहोंचलों. येथें काळीकमलीवाल्याची मोठी धर्मशाळा, अन्नछत्र व आयुर्वेदिक दवाखाना आहे, व दुसऱ्या दोन तीन चट्या व दुकानें आहेत.

धर्मशाळेंत खालीं कांहीं खोल्या व वर मोठा हॉल आहे. हॉलच्या एका बाजूस उतरलो. दुसरे चारपाच यात्रेकरू हॉलच्या दुसऱ्या बाजूस उतरले होते. येथें इंदूर संस्थानातील पेन्शनर धोंडो बाबाजी पारगावकर, देशस्थ ब्राह्मण भेटले. त्याचे बरोबर त्याचे गुरु शिवानंद ब्रह्मचारी, खाडवा येथील प्रसिद्ध दादा धुणीवाले याचे पट्टशिष्य, दोन बायका व दोन पुरुष होते. ही मंडळी गंगोत्री पाहून केदारनाथ येथें जाणार होती. घर सोडल्यापासून सुमारें एक महिन्यानंतर आज धोंडोपंत पारगांवकर याजपाशीं मराठींत बोलण्याचा प्रसंग आला. ह्या मंडळींनीं दादा धुणीवाले यांच्या स्तुतिपर कांहीं भजनाचीं पदें म्हटलीं तीं ऐकून, दूध घेतलें व झोपीं गेलों.

## सोमवार ता. १० जुलै १९३९, दिवस ३० वा.

सकाळीं साडेपाच वाजतां पंवाली येथून निघालों. पुढें एक मैलपर्यंत रस्ता रानगुलाब व इतर अनेक रंगांचीं फुलें याच्या हिरव्यागार गुच्छांनीं भरलेल्या पर्वताच्या टेकड्यांमधून उतरणीनें गेला आहे. येथून पुन्हां दोहोंबाजूंस हिरव्यागार गुच्छांनीं भरलेल्या भयंकर खोल दऱ्या, व मध्यें पर्वताचा अरुंद कडा अशा रस्त्यावरून जावें लागतें. नंतर दोन मैलांची खडी चढण असून रस्ता खडबडीत आहे. मोठें झाड एकहि दिसत नाहीं. नंतर वनौषधींच्या वनस्पतींनीं भरलेल्या, पर्वताच्या टेकड्यांमधून उतरणीस सुरवात झाली. ह्या वनस्पतींचा विलक्षण प्रकारचा गंध केव्हां केव्हां त्रासदायक वाटतो, तथापि त्यांच्या रंगीबेरंगी

फुलांकडे पाहून आनंद वाटतो. ह्या उतरणीस **क्युंकल्या-की-धार** अथवा क्युंकल्या पास ( खिड ) म्हणतात. नंतर पुढचे पर्वताच्या माथ्यावरून कांहीं फर्लांग सरळ रस्ता आहे. हें ठिकाण समुद्रसपाटीपासून ११,००० फूट उंच आहे व त्यामुळें येथे हवाहि बरीच थंड आहे. बरेंच खाली जाईपर्यंत पलीकडील केदारनाथच्या बर्फाच्छादित पर्वताचीं शिखरें दिसत असतात. पंवालीपासून पुढे येणाऱ्या मग्गूपर्यतचा सुमारे दहा मैलांचा रस्ता सगळ्या यात्रेच्या रस्त्यात फारच अवघड व खराब आहे अशी समजूत आहे. जून-ज्येष्ठ-महिन्यात हा सर्व रस्ता बर्फानें भरलेला असतो व आजूबाजूला अनेक औषधी वनस्पती असल्याकारणानें ह्या रस्त्यानें जातांना यात्रेकरूंनीं फार सावधगिरी ठेवावी असे सांगतात. **मग्गू-की-मंडी** चट्टीजवळ येईपर्यंत धुकें पसरलें होतें. परंतु चट्टीजवळ येताच पावसास सुरवात झाली. येथें येतांना बऱ्याच ठिकाणीं, दगड रचून लहान लहान बुरुज केलेले दृष्टीस पडले. हे बुरूज ब्रिटिश व टेहरी यांच्या हद्दीच्या खुणा दाखविण्याकरिता रचलेले आहेत असें कळले. कारण मग्गू-की-मंडी नंतर ब्रिटिश गहरवालची हद्द सुरू होते. आतांपर्यंतचा रस्ता टेहरीगहरवालच्या हद्दीमधून होता. मग्गू-चट्टीस आलों तेव्हा दुपारचे बाराचा सुमार झाला होता. येथें काळीकमली-वाल्याची पांच खोल्याची एकमजली धर्मशाळा आहे. दुसऱ्या दोन चट्टया व दोन दुकानें आहेत. धर्मशाळेपासून पाणी जरा दूर आहे. धर्मशाळेच्या पहिल्या मजल्यावरील एका खोलींत उतरलों. स्नान, पूजा, पोथी व जेवण आटोपेपर्यंत साडेतीन वाजले व प्रवासहि दहा मैलांचा झाला होता म्हणून आजची रात्र मग्गू येथें काढण्याचें ठरविलें. रात्रीं दूध घेतले व झोंपीं गेलों.

## मंगळवार ता. ११ जुलै १९३९, दिवस ३१ वा.

मग्गू येथून सकाळीं सहा वाजता निघालों. येथून एक मैलाची सारखी उतरण मोठमोठ्या खडकांतून उतरल्यानंतर रस्ता जंगलांत शिरतो. आकाश निरभ्र असल्यामुळें बर्फ वितळून त्याचें ताजें हिमजल आजूबाजूच्या पर्वतांवरून खालीं वाहात येताना ठिकठिकाणीं दिसत होते. केदारनाथ व बद्रीनाथ ह्याच्या व त्याच्या भोंवतालच्या बर्फाच्छादित पर्वतांचीं आकाशास लागून दिसणारीं शिखरें स्पष्ट दिसत होतीं. प्रचंड हिमवं-ताच्या सृष्टिसौंदर्याचें हे दृश्य पाहातांना येथपर्यंतच्या प्रवासाचे परिश्रम यात्रेकरू विसरून जातो व त्याला विलक्षण हुशारी वाटते. हा सर्व देखावा

फारच आल्हादकारक आहे. येथून जरा खालीं रुंद दरींतील उतरत्या सपाटी-वर असलेल्या त्रिजुगीनारायण ह्या क्षेत्रास पोहोंचेपर्यंत हा आल्हादकारक देखावा दृष्टीसमोर होता.

## त्रिजुगीनारायण.

**त्रिजुगीनारायण** मग्गूपासून पाच मैल आहे. उतरणीचा बराच भाग दोन दंडीवाल्यांचे हात धरून उतरावा लागला. त्रिजुगीनारायण येथे पोहो-चलो, तेव्हां दहाचा सुमार झाला होता. ह्या गांवात तीसचाळीस घरें आहेत. उतरत्या सपाटीवर वसलेल्या ह्या गावासभोंवतीं बटाट्याच्या शेतांनीं व इतर, हिरव्यागार वनस्पतींच्या झुडपांनीं भरलेल्या पर्वताच्या टेकड्या आहेत.

त्रिजुगीनारायण हें ठिकाण समुद्रसपाटीपासून ८००० फूट उंचीवर आहे. येथें गारवाहि बराच आहे. त्रिजुगीनारायणाचे देवळासमोर काळीकमली-वाल्याची सहा खोल्यांची एकमजली धर्मशाळा व अन्नछत्र आहे. पहिल्या मजल्यावरील एका खोलींत मुक्काम दिला. त्रिगुजीनारायणाचें देऊळ चिरेबंदी दगडानें बांधलेले आहे.देवळाचा आकार बुद्धिस्ट स्तूपासारखा आहे. वर चक्राकार घुमट त्याचेवर चक्राकार पत्र्याचे पाखे व त्यावर दोन फूट उंचीचा सोनेरी कळस आहे.आंत अष्टधातूची एक फूट उंचीची नारायणाची मूर्ति आहे.मूर्तीच्या मागें पितळेची प्रभावळ आहे. उजव्या बाजूस अष्टधातूची लक्ष्मीची मूर्ति आहे व डाव्या बाजूस पार्वतीची दगडी मूर्ति आहे. डावे बाजूचे कोपऱ्यास क्षेत्रपाळ भैरवाचा अष्टधातूचा मुखवटा आहे.गाभाऱ्याच्या बाहेर मोठी धुणी आहे. धुणीं-तील शंकर-पार्वती यांचें विवाहाचे वेळचा,हा अग्नि तीन युगापासून जळत आहे असे सांगण्यात येते. धुणीजवळ लाकडाचे ओंडे असतात. व सातू, तीळ यांनीं भरलेले थाळे ठेवलेले असतात. एक पैसा देऊन लाकडाचा लहानसा ओंडा व दोन पैसे देऊन थोडे सातू व तीळ घेऊन धुणींत टाकले म्हणजे हवन होतें अशी समजूत आहे. देवळाच्या बाहेर एक लहान व दोन मोठीं थंड पाण्याचीं कुंडें आहेत मोठीं कुंडें देवळाचे समोर आहेत व लहान कुंड देवळाचे उजवे बाजूला आहे. ह्या कुंडांना अनुक्रमे ब्रह्मा, विष्णु व महेश अशीं नावें आहेत. मोठ्या कुंडांत स्नान करतात व लहान कुंडावर नुसतें तर्पण करतात. कारण त्याचें पाणी पिण्याकरितां राखून ठेवलेले आहे. कुंडात स्नान करून देवळांत शिरतेवेळीं एक पैसा कर द्यावा लागतो. ह्या कुंडाच्या बाजूच्या दगडी

भिंतींतील कपारींत पिवळट तपकिरी रंगाचा दोन बोटें जाडीचा एक नाग दिसतो. आम्ही कुंडात उतरलो त्यावेळीं हा नाग भिंतीजवळ फिरत होता, परंतु दोन्ही कुंडात स्नान करून वर आलों त्यावेळीं हा भिंतीचे कपारांत शिरला होता व फक्त त्याचे डोकें बाहेर दिसत होतें. हा नाग कुंडाचे बाजूला हिंडत असतो. परंतु एखादे वेळीं कपारांत जाऊन बसतो व डोकें देखील बाहेर काढीत नाहीं व मग कित्येक यात्रेकरूंना त्याचे दर्शनाकरितां बराच वेळ तिष्ठत बसावें लागतें असें सांगतात. कुंडांतील स्नानानंतर त्रिजुगी-नारायणाचें दर्शन घेतले. तीन पैसे देऊन धुणींत लाकूड, सातू व तीळ टाकून हवन केलें. धर्मशाळेत येऊन पूजा, पोथी व जेवण उरकलें. सकाळीं बरीच चाल झाली होती म्हणून आजची रात्र येथे काढण्याचें ठरविलें. संध्याकाळीं त्रिजुगीनारायणाची आरती पाहिली. रात्रीं दूध घेतलें व झोपीं गेलों.

## बुधवार ता. १२, जुलै १९३९ दिवस, ३२ वा.

त्रिजुगीनारायण येथून सकाळीं साडेपांच वाजतां निघालों. यापुढे केदारनाथ व बद्रिनाथ ह्या दोन्ही क्षेत्राचा रस्ता ब्रिटिश हद्दींतून गेला असल्यामुळें तो ब्रिटिश गरहवाल प्रांताच्या पब्लिक वर्क्स खात्याच्या ताब्यांत आहे. सर्व रस्ता बारापासून पंधरा फूट रुंद असून गाडीच्या रस्त्यासारखा बांधलेला आहे. खोल दऱ्यांच्या बाजूस हात दीड हात उंचीचे पक्के बांध आहेत. नद्यांवरून व ओढ्यावरून लोखंडी गर्डर्सचे व पक्क्या बांधणीचे पूल आहेत. सर्व रस्त्याला मैलाचे व फर्लांगांचे दगड आहेत. दर दोन तीन मैलावर पक्क्या बांधणीच्या स्वच्छ चट्ट्या आहेत. प्रत्येक चट्टीजवळ पर्वतावरून नळानें पाणी आणून एकएक दोनदोन तोट्या व त्याचे खाली टाक्या बांधल्या आहेत. चट्ट्यांपासून जरा दूर ( A " Flagged Area for men " ) " मर्दोंकी तट्टीकी जगाह " " Flagged Area for women " " औरतोंकी तट्टीकी जगाह " अशा पत्र्यावर चिकटविलेल्या छापील पाट्या आहेत त्यांच्यावर हातांत लोटा घेतलेलीं पुरुषाचीं व बायकांचीं चित्रें आहेत. ह्या पाट्यांचा खांबाला तांबडें निशाण लावलेले असतें.

ह्या पाट्यांच्या पलीकडे दगड ठेवलेले असतात व लहान खळगे खणलेले असतात व त्यावर पांढरी क्यारबॉलिक पावडर टाकलेली असते. प्रत्येक चट्टीवर दोन दोन तीन तीन भंगी ठेवलेले असतात. त्यांना चूडा अगर

जमादार म्हणतात. त्याना राहण्याकरितां रस्त्यापासून जरा वरच्या बाजूस पक्क्या बांधणीची एक खोली व व्हराड्याचीं घरें बांधलेलीं आहेत. सर्व चट्या, तेथील पाण्याच्या तोट्या व शौचाच्या जागा स्पेशल हेल्थ ऑफिसरच्या देखरेखीखालीं आहेत. यात्रेच्या दिवसांत हे ह्या बाजूला फिरतीवर असतात. एखादी चट्टी घाणेरड्या स्थितींत आढळल्यास त्या चट्टीवाल्याचे दुकानाचें व चट्टीचें लायसेन्स रद्द करण्याचा त्याना अधिकार आहे. त्रिजुगीनारायणापासून अर्ध्या मैलावर मानसा देवीचें देऊळ आहे. एक मैलानंतर तीन रस्ते एके ठिकाणीं मिळतात. तेथें मोठी पाटी असून तिच्यावर " केदारनाथ १० मैल " " देवप्रयाग ४४ मैल " " त्रिजुगी नारायण १॥ मैल" असें इंग्रजींत व हिंदींत लिहिलें आहे. येथून रस्ता केदारनाथाचे पर्वतावर उगम पावलेल्या मंदाकिनीचे बाजूनें गेला आहे. रस्त्याच्या एका बाजूस उंच पर्वताचे कडे व दुसऱ्या बाजूस खोल दरींतून सो सो आवाज करीत, वाहणारी मंदाकिनी दिसते. पर्वतावर मोठीं झाडें दिसत नाहींत. परंतु ते गुलाब, इतर रंगी बेरंगी फुलें याच्या उंच झुडपांनीं व लहान आकाराच्या बाबूंच्या बेटांनीं आच्छादलेले दिसतात. मधून मधून हिम नद्याचे लहान–मोठे शुभ्र प्रवाहहि खालीं येतांना दिसतात. पुढें अर्ध्या मैलावर सोमद्वार अथवा सोमप्रयाग हें ठिकाण आहे. येथें सोमगंगा ( वासुकी नदी ) व मंदाकिनी यांचा संगम झाला आहे. सोमगंगेवरून पलीकडे जाण्यास लोखंडी गर्डर्सना झुलता पूल आहे. उजवीकडे पुलापासून ४० फुटावर मंदाकिनी सुमारें ३० फूट उंचीवरून खालीं पडते, व ह्या धबधब्याखालीं पुलाखालून येणारी सोमगंगा तिला मिळते. मंदाकिनीचे दुधासारखें पांढरें पाणी सोमगंगेच्या हिरवट रंगाच्या पाण्यास अडवून पुढें जातांना संगमावर स्पष्ट दिसतें. येथें पुलाच्या बाजूस दोन दुकानें आहेत. पूल ओलांडल्यानंतर साधारण चढणीचा रस्ता आहे. ह्या चढणीनंतर एक मैलावर **मुंडकट्टा गणेशाचें** लहानसें देऊळ आहे. आंत नांवाप्रमाणें शिररहित गणपतीची मोठी दगडी मूर्ति आहे. पार्वतीने स्नानास बसण्यापूर्वी आपल्या अंगाच्या मळापासून जो मानसपुत्र उत्पन्न केला तो हा गणपती. शंकरास आंत शिरण्यास ह्या मानसपुत्रानें अटकाव केला तेव्हां शंकरानीं त्याचें डोके छाटून टाकलें अशी कथा पुराणात आहे. नंतर पुढें गौरीकुंडापर्यंत रस्ता उतरणीन खोल दरींतून वाहाणाऱ्या मंदाकिनीचे बाजूबाजूनें गेला आहे. रस्त्याच्या दुसऱ्या बाजूस

हिरव्यागार वनस्पतीने आच्छादिलेले पर्वत आहेत. ह्या पर्वतांच्या कांहीं उंच भागावर बर्फ गोठलेले दिसते व काहीं भाग काळ्या खडकांनीं भरलेले दिसतात. काहीं ठिकाणीं गोठलेल्या हिमशिळाखालून शुभ्रपाण्याचे प्रवाह खालीं येताना दिसतात.

## गौरीकुंड

त्रिजुगीनारायणापासून साडे सहा मैल असलेल्या **गौरीकुंड** येथें सव्वा आठ वाजतां आलों. येथे मंदाकिनीच्या कांठावर काळीकमलीवाल्याची मोठी एकमजली धर्मशाळा आहे. पहिल्या मजल्यावरील एका हवेशीर खोलींत उतरलों. मंदाकिनीच्या वाहत्या पाण्यात ठिकठिकाणीं गोठलेल्या बर्फाच्या शिळा दिसत होत्या. गौरीकुंड हा ह्या बाजूचा साधारण मोठा गांव आहे. बाजारात शिलाजीत कस्तुरी वगैरेचीं मोठीं दुकानें आहेत. मजल्याचीं घरेहि बरींच आहेत. दुकानें वगैरे मिळून २५-३० घराची वस्ती आहे. मंदाकिनीच्या बाजूला एक गरम पाण्याचें व दुसरें थंड पाण्याचें अशीं दोन कुंडे आहेत. गरम पाण्याच्या कुंडांत पितळी गोमुखांतून वाफेभरली मुसळधार एकसारखी पडत असते. त्याची उष्णता १२८° फॅरनहीट आहे. गरम पाण्याच्या कुंडापासून एक फर्लांगावर थंड पाण्याचें दुसरें कुंड आहे. गरम पाण्याच्या कुंडांत उतरण्याची सोय नाहीं. ताब्यानें पाणी घेऊन स्नान करावें लागतें. ह्या गरम पाण्यास गंधकासारखी चव लागतें. शंकराची बायको गौरी ( पार्वती ) ह्या कुंडांत स्नान करीत असे म्हणून ह्या कुंडास व ह्या ठिकाणास 'गौरीकुंड' हें नांव पडले आहे. थंड पाण्याच्या कुंडाचें पाणी साधारण कोमट असून पिवळट रंगाचे आहे. येथें स्नान न करतां फक्त तर्पण करतात. गरम कुंडापासून दहा पंधरा कदमांवर पार्वतीचे देऊळ आहे. आंत पितळेची पार्वतीची मूर्ति आहे. इतर कांहीं मूर्ति व शिवलिंग हीं आहेत. गाभाऱ्याबाहेर धुणी आहे. गरम कुंडावर स्नान केलें, देऊळ पाहिलें व धर्मशाळेत येऊन पूजापोथी, जेवण उरकले. थोडीशी विश्रांति घेऊन दोन वाजतां गौरीकुंड सोडलें. एका बाजूस खोल दरींतून वाहणारी मंदाकिनी व दुसरे बाजूस वृक्ष व वनस्पतिविरहित पर्वताचे कडे अशा चढणीच्या रस्त्यानें जंगलांत शिरलों व एक मैल वर आल्यावर **चिरपट्या भैरवाचें** लहानसे देऊळ लागलें. दरम्यान हिमनद्यांचे शुभ्र प्रवाह ठिकठिकाणीं पर्वतांवरून खालीं येताना दिसत

होते. मध्यें दोन चट्टया लागल्या त्यांचीं नांवें अनुक्रमें **आरामचट्टी** व **जंगलचट्टी** अशीं आहेत. चिरपटच्या भैरवास यात्रेकरू फाटक्या चिंध्या वहातात. त्यामुळें तऱ्हतऱ्हेच्या कापडाच्या चिंध्या देवळाभोंवतीं टांगलेल्या दिसतात व हे निरनिराळ्या कापडाचें प्रदर्शन असावें असें वाटतें. देवळांत काळभैरवाची दगडी मूर्ति आहे. नंतर थोड्या चढणीच्या रस्त्यानें पुढे गेल्यावर **भीमशीळेचें** लहानसें देऊळ लागतें. ह्या देवळात मोठी दगडी शिल असून तिजवर भीमसेनाची आकृति कोरलेली आहे. ज्या भीमसेनानें केदार नाथाचें देऊळ, ह्या पर्वतावरील मोठाले दगड आणून त्यांच्या शिला बनवून बांधलें त्या भीमसेनाची ही मूर्ति आहे असें सांगतात. येथून पर्वताच्या वरच्या माथ्यावर एक बुरुजासारखी वर आलेली शिला खालून दिसते. असें सांगण्यांत येतें कीं, देऊळ तयार झाल्यानंतर वर शिल्लक राहिलेल्या शिलापैकीं ही शिला असावी. नंतर चार मैलांच्या नागमोडी चढावानें साडे चारचे सुमारास **रामबारा** येथें आलों. येथें ऊन मुळींच नव्हते व सर्व बाजूस धुकें पडलें होतें. थंडीहि बरीच होती. रामवाड्याच्या आजूबाजूला शुभ्र हिमालयाच्या शिखराखेरीज कांहींच दिसत नाहीं. केदारनाथचे कांही पंडे येथें राहतात. येथे काळीकमलीवाल्याची धर्मशाळा, कांहीं चट्टया, दुकानें व पंचवीस-तीस घरें आहेत. हा गाव मंदाकिनीपासून जरा वर लहानशा उतरत्या सपाटीवर आहे. ज्यांना केदारनाथची थंडी सहन होत नाही असे कांहीं यात्रेकरू, केदारनाथ येथे जाऊन त्याच दिवशीं येथें परत येतात. धर्मशाळेत अन्नछत्र असून तिबेटन रग व कांबळ्याचा मोठा सांठा यात्रेकरूंच्या उपयोगाकरितां ठेवला आहे. आमच्या नोकरास व दंडीवाले व बोजेवाल्यास चौकीदारानें चार चार—कांबळ्या व एक एक रग आणून दिले. रात्रीं दूध घेतलें व झोंपीं गेलों.

## गुरुवार ता. १३ जुलै १९३९, दिवस ३३ वा.

सकाळीं साडे सहा वाजतां रामबारा सोडलें. एका बाजूस बर्फाच्या मोठ-मोठ्या शिलांनीं भरलेली मंदाकिनी व दुसऱ्या बाजूस गुलाब व इतर रानटी फुलांच्या गुच्छांनीं भरलेल्या पर्वताच्या टेकड्या असा नागमोडी चढणीचा रस्ता सुरू होतो. कांहीं कांहीं ठिकाणीं ह्या रस्त्याला खडी चढण आहे; परंतु रस्ता रुंद असून चांगला बांधलेला आहे. हा रस्ता तीन मैल चढून आल्यावर बर्फाचे पर्वत व त्यांचीं उंच उंच शिखरें समोर दिसूं

लागतात. येथें काहीं पहाडी लोक ढोल व थाळी घेऊन बसलेले आढळतात. यात्रेकरूंस पाहिल्याबरोबर ते " केदारनाथ की यात्रा सफळ हो " असें ओरडतात व ढोल व थाळी वाजवतात. त्यांच्यापुढें पैसा दोन पैसे टाकले तरी ते खुष होतात. येथपासून पुढे बाजूच्या पर्वतावर झाडेंझुडपें मुळींच नसून काहीं ठिकाणीं पातळ हिरवेंगार गवत व काहीं ठिकाणीं गोठलेले बर्फाचे थर दिसतात बर्फाच्छादित पर्वत–शिखरांनी अर्धचंद्राकार बनलेल्या हिम-तटामध्यें उतरत्या दलदलींत मैदानामध्ये वसलेली केदारनाथाची पुरी व त्यांचे भव्य देवळाचा सोनेरी कळस, अर्धा मैल पुढे गेल्यावर दिसूं लागतो. म्हणून ह्या ठिकाणास **देवदेखणी** म्हणतात. लाकडी पुलावरून मंदाकिनी ओलां-डल्यानंतर मंदाकिनीच्या बाजूस बांधलेला घाट आहे. हा घाट गुणेरी येथील श्रीयुत गौरीदत बालमुकुंद यांनीं बांधला आहे. ह्या घाटाला पांच सहा पायऱ्या असून हा अठरा वीस फूट लांब आहे. अतिशय जोरानें वाहणाऱ्या मंदाकिनीच्या ओघाबरोबर पायरीवर बसून स्नान करणारे यात्रेकरू वाहून जाऊं नयेत म्हणून घाटाच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत जाड साखळदंड दोन टोंकास रोवलेल्या लोखंडी खांबास बांधलेला आहे. घाटापासून काहीं कदमावर जरा उंचीवर मंदाकिनीचें लहानसें देऊळ आहे. देवळाचे बाजूस लहान पडवी आहे. घाटापासून सुमारें पाव मैल गेल्यावर पुरी–केदारनाथ अथवा केदारनाथ गांवास सुरुवात होते.

## केदारनाथ.

हें ठिकाण समुद्रसपाटीपासून ११,५०० फूट उंचीवर आहे. केदारनाथ येथें सकाळीं आठ वाजतां पोहोंचलों. गांवात पांच सहा धर्मशाळा, तीस चाळीस लहान घरें व आठ दहा दुकानें इतकी वस्ती आहे. बाजारांत लहानसें ब्रँच पोस्ट ऑफिस आहे. दोन वर्षांपूर्वी येथें तार ऑफिसहि होतें; परंतु त्यापासून सरकारला फारशी किफायत होत नसल्यामुळें सरकारनें तें बंद केलें असें सांगतात. गावांतच रस्ते ओबडधोबड, दगडी बांधणीचे परंतु रुंद आहेत. एकंदर वस्ती तुरळक आहे. गांवांत रात्रीं दिवे लावण्याची व्यवस्था शेठ संचीराम जोहारमल नांवाच्या व्यापाऱ्यानें काळीकमलीवाला संस्थेमार्फत करून ठेविली आहे. गांवांत चार पांच सदावर्तें आहेत. काळीकमलीवाले यांच्या धर्मशाळेंत सदावर्त असून धर्मार्थ आयुर्वेदिक औषधालय व रुग्णालय ( Hospital )

आहे. बहुतेक धर्मशाळांवर त्यांच्या मालकाची व त्या कोणत्या पंड्याच्या ताब्यांत आहेत त्यांचा नांवें लिहिलेल्या पाट्या अगर खोदलेले दगड आहेत. गावाच्या वस्तीपासून पाव फर्लोंगावर बर्फमय पर्वताच्या खालीं एका उंचशा सपाटीवर केदारनाथाचें चिरेबंदी दगडी बांधणीचें भव्य देवालय आहे.

देवळाच्या मागच्या पर्वतशृंगाची उंची समुद्रसपाटीपासून २२,००० फूट आहे. गोमुख ( गंगोत्री ) व बद्रीनाथ हे पर्वत केदारनाथ पर्वताचे मागच्या बाजूला सुमारें २०।२० मैलांच्या अंतरावर आहेत; परंतु मधला सर्व भाग बर्फमय पर्वतांनीं भरलेला असल्यामुळें हीं स्थळें एकमेकापासून आठ आठ दहा दहा दिवसांच्या मजलेवर आहेत असें वाटतें पूर्वीं ह्या तिन्ही देवांचा पुजारी एक होता व तो रोज तिन्ही देवांची पूजा करीत असे अशी आख्यायिका सांगतात. हल्लीं पहाडी लोक पर्वतावरून चालण्यात जसे तरबेज आहेत तसे त्यावेळचे लोकहि बर्फावरून चालण्यात तरबेज असतील !

पांडवांनीं बांधलेले हें प्राचीन देवालय फार प्रसिद्ध आहे. ह्या देवळाचे पुजारी व व्यवस्थापक रावळ श्रीमान् नीलकंठलिंगजी हे आहेत. हे लिंगाईत जंगम आहेत. हे स्वतः येथें राहत नाहींत. ह्यांची वस्ती ऊर्वीमठ अथवा उरवीमठ येथें असते. ह्याचे एक शिष्य येथें असतात व त्याचेमार्फत केदारनाथांची पूजाअर्चा नैवेद्य वगैरे होत असतो. ह्या देवस्थानास गरहवाल, अलमोरा व नैनीताल ह्या प्रांतांतील सुमारें रु. २,००० सरकार साऱ्याचे गाव इनाम आहेत व यात्रेकरूंकडून दरवर्षी सरासरी रु. १०,००० उत्पन्न होतात. ह्या देवस्थानाची व इनामाची व्यवस्था रावळ नीलकंठ लिंगजी समाधानकारक रीतीनें चालवितात अशी त्यांची ख्याति आहे.

मंदाकिनीवरील लांकडी पूल ओलांडतांच यात्रेकरूंस पंडे घेरतात. पंडा मुरलीधर याचे भावानें आम्हांस हृषीकेश येथेंच गाठून आपले नांवाची जाहिरात आम्हांस दिली होती, व माझा भाऊ पंडा मुर्लीधर यास मी पत्र लिहितों, तो आपणांस उतरण्यास चांगली जागा दाखवील व आपली सर्व सोय करील असें सांगितलें होतें. आम्हीं त्यास बजावलें कीं आमच्याकडून त्याने कांहीं विशेष मिळण्याची अपेक्षा करूं नये. तेव्हां त्यानें आम्हांस सांगितलें होतें कीं आपण जें द्याल त्यांत माझा भाऊ खुष होईल. पंडा मुर्लीधर याला त्याच्या भावाचें पत्र आलें होतें व तो आमची चौकशी करात

होता; आमचे पूर्वी येथें पोहोंचलेल्या यात्रकरूना त्याला आम्ही रामबाऱ्यास आलों आहोंत अशी बातमी दिली होती.

पूल ओलांडून दंडींतून उतरतांच त्यानें आपल्या भावाचें पत्र दाखविलें व पंजाबकडील व्यापाऱ्याच्या मोठ्या धर्मशाळेंत घेऊन गेला. येथें दुसऱ्या मजल्यावर एका हवेशीर खोलींत पंडा मुरलीधर यानें बैठक वगैरे हातरून ठेवली होती. ह्या खोलींत मुक्काम दिला, मंदाकिनीचे घाटावर स्नान केलें व देवळा-जवळ आलों. देवळाच्या दरवाज्याबाहेर गणपतीची सुंदर मूर्ति आहे. देवळाच्या प्रथम प्रवेशास पाऊण आणा फी द्यावी लागते. दरवाज्यावर चांदीच्या बकलचा पट्टा घातलेला एक पहाडी शिपाई उभा असतो. त्याला तीन पैसे दिल्या-वर ते तो जवळच्या शिक्केबंदी पेटींत टाकतो व यात्रेकरूस आंत सोडतो.



केदारनाथ मंदिर.

एकवेळ ही फी दिल्यावर पुन्हां केव्हांही द्यावी लागत नाहीं. देवळाची दगडी जमीन व भिंती नेहमीं ओल्या थबथबीत असतात. हा दलदलीचा परिणाम असावा. देवळांत मुख्य गाभारा व त्यापुढें मोठा सभामंडप आहे. गाभाऱ्यांत डोंगरासारखें खडबडीत दगडाचें साधारण त्रिकोनी आकाराचें मोठें ओबडधोबड लिंग आहे. त्याची लांबी अदमासें चार फूट व रुंदी ३ फूट असावी. ह्या ओबडधोबड लिंगाचे भोंवतीं चौकोनी शाळुंका

आहे. शाळुंकेबाहेरची सर्व जमीन संगमरवरी दगडाची आहे. शाळुंकेपासून दोन फुटावर चार दगडी खांब आहेत. शाळुंकेचे बाहेर मोठ्या पाटावर धोतर नेसलेले, आंगात इकडे तयार होत असलेल्या कांबळीचा लांब अंगरखा घातलेले व डोक्यास भगव्या रंगाचा मोठा फेटा बांधलेले केदारनाथाचे पुजारी बसले होते. ह्यांना बरीच लांब दाढी होती. हे मध्यम वयाचे असावेत. त्यांच्या हातांत असलेली पोथी ते वाचीत होते. त्यांच्यासमोर चांदीचें पातेलें होतें, त्यांत रुपये, अधेल्या, चवल्या, आणे वगैरे व चांदी-सोन्याच्या बांगड्या, बाळ्या वगैरे दागिने दिसत होते. पेढे, बर्फी, बदाम, खारका, खडीसाखर वगैरे खाण्याच्या जिनसाहि दिसत होत्या. यात्रेकरू प्रथम केदारनाथाचे लिंगास पुष्कळ तूप चोपडतात, लिंगास आलिंगन देतात व मग ह्या पातेल्यांत त्यांच्या भावाप्रमाणे चांदीसोन्याचें नाणें अगर अंगावरील डागिना टाकतात. पूजा, एकादशणी वगैरे करणें असल्यास ती यात्रेकरूंना स्वतः करतां येते. एकादशणी ( रुद्र ) व आरती पंडा म्हणतो. केदारनाथ हें बारा जोतिर्लिंगापैकी एक लिंग आहे. लिंगाच्या डाव्या बाजूच्या भिंतींत लांबट कोनाडे आहेत. ह्या कोनाड्याचा खालचा भाग पणतीसारखा असून तो तुपानें भरलेला असतो. ह्या पणतींत चारबोट जाडीची वात जळत असते. ह्या कोनाड्याच्या वरच्या बाजूस लांबट टाकी आहे. त्रिपुरी पौर्णिमेच्या दिवशीं देऊळ बंद करतेवेळीं, इकडील रिवाजाप्रमाणें बोलणें म्हणजे " पट बंद होतो तेव्हां " ही टाकी तुपानें भरून ठेवतात. ह्या टाकींतून तूप खालीं पणतींत उतरण्यास भिंतींत बारीक भेग केलेली आहे. वातीच्या उष्णतेनें वरच्या टाकींतील तूप पणतींत हळूहळू उतरतें व त्यामुळे, अक्षय्यतृतीयेला जेव्हां भोंवतालचा बर्फ फोडून देवळाचा पट म्हणजे दरवाजा उघडतात तेव्हा, ही वात जळत असलेली दिसते असें सांगतात.

केदारनाथ पुरी ही सपाटी कार्तिक महिन्यानंतर पुढें चैत्र महिन्यापर्यंत सहा महिने बर्फानें आच्छादलेली असते. हे सहा महिने केदारनाथाची पूजा उखीमठ येथें होत असते. त्रिपुरी पौर्णिमेच्या दिवशीं पट उघडतांच ही वात जळत असलेली दिसावी म्हणून बरेच महान् महान् सत्पुरुष व साधुसंत अक्षय्यतृतीयेला केदारनाथ येथें हजर राहतां येईल अशा बेतानें हृषीकेशाहून निघतात. असें सांगतात कीं, त्यावेळीं देवळावरील, धर्मशाळा व इतर इमारतीवरील बर्फाचे ढीग कुदळ्या पावड्यांनीं फोडून काढावे लागतात.

केदारनाथ येथील लिंगासंबंधीं पद्मपुराणात अशी एक कथा आहे कीं, भीमसेनानें तप केले त्यावेळी शिवानें भीमसेनास रेड्याच्या रूपानें दर्शन दिले. भीमसेनानें ह्या रेड्याचा पाठलाग करून त्याचे पांच तुकडे केले व त्या तुकड्यापैकीं रेड्याच्या मागचा भाग म्हणजे केदारनाथाचें लिंग हा आहे.

मधला भाग, ( नाभी ) ज्याला मध्य महेश्वर म्हणतात, तो उरवीमठ ( उरवीमठ ) येथून १२ मैलांवर आहे. त्याचा रस्ता कालीमठावरून गेला आहे.

रेडाकार शिवाचे बाहू तुंगनाथ येथें आहेत. तुंगनाथ—बद्रिनाथाच्या रस्त्यावर उरवीमठपासून २१॥ मैल आहे.

रेडाकार शिवाचें मुख रुद्रनाथ येथें आहे. रुद्रनाथ मंडलचट्टीपासून ११ मैल आहे.

रेडाकार शिवाच्या जटा कल्पेश्वर येथे आहेत. कल्पेश्वर हें हेलंग· अथवा कुम्हार चट्टीपासून ५ मैलांवर अलकनंदेच्या पलीकडच्या बाजूस आहे.

केदारनाथाची पूजा, प्रदक्षिणा वगैरे उरकून गाभाऱ्यातून बाहेर आलों. येथे उजवीकडे पार्वतीची व डावीकडे लक्ष्मीची अशा दोन मूर्ति आहेत. सभामंडपांत श्रीकृष्ण, पाच पांडव, द्रौपदी व कुंती यांच्या सुंदर दगडी मूर्ति आहेत. देवळाच्या भोंवतालीं प्रदक्षिणेकरितां पडित चबुत्रा आहे देवळाच्या उजवीकडे लहान पडकें दगडी देऊळ आहे व त्यांत पाण्याचे कुंडांत असलेलें ओबडधोबड त्रिकोणाकार लिंग आहे. त्याला ईशानेश्वर म्हणतात. ह्या देवळासमोर शेवाळीनें भरलेल्या पाण्याचें कुंड आहे, त्यास हंसकुंड म्हणतात. मृताच्या हस्ती व पत्रिका ह्या कुंडांत टाकतात. ह्या कुंडापासून जरा वरच्या बाजूस एक फर्लांग चालून गेल्यावर लहान देवळांत बर्फासारख्या गार पाण्याचें कुंड आहे. त्याला रेतकुंड म्हणतात. केदारनाथाचें देऊळ वस्तीच्या अगदीं टोकाला आहे. देवळाच्या डावीकडे पुजारी वगैरेंस राहण्याकरितां तीन गाळ्यांची एकमजली चाळ आहे. ह्याचे पलीकडे वास्ति नाहीं. केदारनाथ हें हिमालयांतील ह्या बाजूचे मनुष्यवस्तीचें शेवटचें ठिकाण आहे.

देवळापासून खालीं अर्ध्या फर्लांगावर गांवाच्या बाजूला दुसरी दोन लहान देवळें आहेत. त्यांपैकीं एका देवळांत खारट पाण्याचें कुंड आहे.

येथें प्रथम प्रत्येक हातानें आचमन करून मग ओंजळीनें घोटभर पाणी पिऊन नंतर जनावराप्रमाणें पाण्याचा घोंट घेऊन मग थाळींत वाटेल ते टाकण्याचा प्रघात आहे.

ह्या कुंडाला उदरकुंड म्हणतात. दुसऱ्या देवळांत पितळेचा देवांचा मुखवटा आहे. हीं देवळें व कुंडें पाहून धर्मशाळेंत आलों. पूजा, पोथी वगैरे नित्यक्रम आटोपला व नंतर पोष्ट ऑफिसांत गेलों. पोष्ट मास्तर ठिकाणावर नव्हते. पंडा मुरलीधर यानें त्यांना शोधून आणलें. त्यांनीं पंचवीस तीस पत्रांचें पुडकें पुढें केलें व ह्यांत तुमच्या नांवाचे पत्र आहे का पहा असे हिंदींत सांगितलें. त्यांत तीन तारखेचें घरून आलेलें पत्र मिळालें व घरची खुशाली कळली. ब्यांकेकडून मनिऑर्डर येणार होती तिजबद्दल चौकशी करतां, "कालपर्यंत आली नाहीं, आज संध्याकाळीं आल्यास कळवूं" असें पोष्ट मास्तरने सांगितलें. येथे रोज संध्याकाळीं रनर टपाल घेऊन येतो. टपालाचे टप्पे दहा दहा मैलाच्या अंतरावर आहेत. संध्याकाळीं ७ चे सुमारास रनर टपाल घेऊन येतो व ९ चे सुमारास येथून खालीं जाणारे टपाल घेऊन जातो. अशी माहिती पोष्ट मास्तरकडून मिळाली.

दुपारीं लिहिलेलीं पत्रे टपालचे पेटींत टाकलीं व धर्मशाळेंत परत आलों. रात्रीं केदारनाथांची आरती पाहून खोलींत आलों. त्यावेळीं पंडा मुरलीधर यानें बातमी आणली कीं, मनिऑर्डर आली आहे, परंतु मास्तरजवळ पुरते पैसे नाहींत. उद्यां संध्याकाळपर्यंत पुरते पैसे आल्यास तिचा बटवडा होईल. ब्रँच पोष्ट असल्यामुळें येथें जास्त रक्कम जमा नसते. रात्रीं आकाश निरभ्र असल्यामुळें भोंवतालचीं हिमशृंगें स्पष्ट दिसत होतीं. थंडी बरीच पण उत्साहवर्धक होती. दंडीवाले, बोजेवाले व नोकर यांना धर्मशाळेचे व्यवस्थापकानें चार चार कामळया दिल्या. येथें दूध महाग म्हणजे ४ ते ६ आणे शेर आहे. हलवयांचीं तीन चार दुकानें आहेत. दूध घेतलें व झोपीं गेलों.

## शुक्रवार ता. १४ जुलै १९३९, दिवस ३४ वा.

देवळाच्या मागील पर्वतावर देवळापासून सुमारें दोन फर्लांग चढून गेल्यानंतर मंदाकिनी व मोरगंगा ह्या नद्यांचा संगम आहे तो पाहण्यास सकाळीं आठ वाजतां गेलों. आकाश निरभ्र असल्यामुळें भोंवतालचीं हिमशृंगें

पाहून आपण बर्फमय पर्वतांच्या कोटांत आहोंत असें वाटतें. ह्या संगमापासून पुढें एक फर्लांग गेल्यावर जिकडे तिकडे बर्फच बर्फ पसरलेलें आहे. त्यांत मंदाकिनीचा प्रवाह गडप झाल्यामुळें पुढचा रस्ता माहितगार वाटाड्या बरोबर असल्याशिवाय सांपडणें कठीण पडतें. ह्या बर्फमय प्रदेशांतून बरेंच वर



**केदारनाथाच्या वरच्या बाजूच्या हिमशृंगाचें आणि मंदाकिनी व मोरगंगा ह्या हिमनद्यांच्या उगमाचें दृश्य.**

गेलें म्हणजे भैरवझांप अथवा भृगुपतन नांवाचें ठिकाण आहे. पूर्वी कांहीं साधुसंत बाजूच्या अत्यंत उंच कड्यांवरून खालच्या बर्फमय दरींत उडी

घेत असत असें सांगतात. हल्लीं ही चाल बंद आहे. ह्या व ह्याच्या पलीकडील भागात कस्तुरीमृग, पांढरीं अस्वलें व बर्फानी बरड ( मोठ्या शिंगाचें व पांढरट रंगाचें सांबरासारखें जनावर ) बरेंच आहेत. धाडशी युरोपियन लोक कधीं कधीं माहितगार पहाडी वाटाडे बरोबर घेऊन ह्या जनावराची शिकार करतात. येथून बरेंच पुढें गेल्यावर वसुकीताल म्हणून एक मोठें स्वच्छ हिमजलाचें सरोवर आहे. ह्या सरोवरांत मोठाली निरनिराळ्या रंगांचीं कमळें आहेत. ह्या सरोवराचा मार्ग श्रावणाचे शेवटीं व भाद्रपदाचे सुरवातीपासून खुला होतो. त्यावेळीं पहाडी लोक तीं कमळें आणून देवास वाहण्याकरितां यात्रेकरूंना दोन ते चार आण्यास ३ कमळें ह्या भावानें विकतात.

बाजूच्या हिमप्रदेशांत थोडी सहल करून मंदाकिनी व मोरगंगा ह्यांच्या संगमावर तांब्यानें स्नान केलें व देवळात आलों. गणपतीची पूजा करून केदारनाथाचे लिंगावर रुद्राभिषेक केला व धर्मशाळेत आलों. पूजा, पोथी वगैरे नित्यक्रम आटोपला. थोडीशी विश्रांति घेतली व नंतर भोंवतालच्या हिमशृंगांची शोभा पाहण्याकरितां रेतकुंडाचे देवळापर्यंत गेलों. आज तेथें गर्दी नसल्यामुळें हें कुंड बारकाईनें निरीक्षण करता आलें. ह्या कुंडाचें पाणी अतिशय गार असून फारच स्वच्छ आहे. संध्याकाळीं केदारनाथाची आरती पाहिली. आरतीच्या वेळीं सुमारें पंचवीस वर्षे वयाचा जटा व दाढी वाढलेला एक संन्यासी गाभाऱ्यात एका कोपऱ्यांत उभा असलेला दृष्टीस पडला. त्याचे अंगात फक्त मळकट कफनी होती. त्याचे संबंधीं चौकशी करतां असें कळलें कीं, नारायणदासजी नांवाचे अबूच्या पहाडांतील हे संन्यासी आज पांच वर्षे येथें राहात आहेत. एका पंड्याच्या घरांतील माडीवर हे राहातात. हे महिन्यांतून एक दिवस म्हणजे द्वादशीस जेवतात. एरव्हीं त्यांचा आहार म्हणजे शेंगदाणे, कंद व मिळाल्यास फळें हा असतो. केदारनाथाचा पट बंद झाल्यावर इतरेजनाप्रमाणें हे येथून उखीमठ अगर गुप्तकाशी येथें जात नाहींत. केदारनाथाची सपाटी बर्फानें आच्छादलेली असतांहि हे साधू आपल्या राहाण्याच्या ठिकाणींच असतात.

काळीकमलीवाला ह्या संस्थेकडून व इतर कांहीं भाविक पंड्यांकडून, ह्याच्या राहाण्याच्या ठिकाणीं पट बंद होण्यापूर्वी सहा महिने पुरेल इतकी फराळाची सामुग्री ठेवली जाते. ही हकीकत पंडा मुरलीधर व इतर कांहीं लोकाकडून कळली तेव्हां उद्या पंडा मुरलीधर याचेबरोबर जाऊन ह्यांची भेट घेण्याचें ठरविलें.

देवळांतून परत येतांना पोष्ट ऑफिसांत गेलों. ऑफिस उघडें होतें. टपाल

गाली घेऊन जाणारा रनर नुकताच टपाल घेऊन निघाला होता. मास्तर ठेकाणावर नव्हते. पंडा मुरलीधर त्यांना शोधण्यास गेला व दहा मेनिटांनीं, " पुरते पैसे अद्याप आले नाहींत. " असा पोष्ट मास्तरचा नेरोप घेऊन आला. " मनिऑर्डर काल आली असून अद्याप पैसे मिळाले नाहींत ह्याबद्दल पोष्टाचे वरिष्ठ अधिकाऱ्याना देण्याकरितां लिहिलेला रेपोर्ट आपलें मार्फत पाठविणें आहे, तेव्हा आपली समक्ष भेट घ्यावयाची आहे. " असा निरोप पंडा मुरलीधर यांचेबरोबर पाठवितांच मास्तर स्वतः आले व हिंदींत म्हणाले कीं मी इकडून तिकडून पैसे जमा करून आपली रक्कम पुरी करीत आहे. हेड ऑफिस, रनरबरोबर १०० रुपयांपेक्षा जास्त रक्कम पाठवीत नाहीं व काल व आज बाहेर जाणारी एकहि मनीऑर्डर आली नाहीं. त्यामुळे इकडून तिकडून पैसे जमा करून आपल्या मनीऑर्डरच्या रकमेची भरपाई करणे भाग पडलें. पुढें बद्रीनाथ येथून परत जातांना चमोली ( लालसंगा ) येथें ह्या प्रांताचे पोष्ट ऑफिसचे इन्स्पेक्टर आम्हांस भेटले. त्यावेळीं ही हकीकत त्याना कळवितांच ते म्हणाले कीं तुम्ही केदारनाथ येथून निघालांत त्याच दिवशीं मी केदारनाथला पोहोचलों होतों व ब्रॅंच पोस्टमास्तरनें आपल्या मनिऑर्डरची हकीकत माझ्या कानावर घातली, व त्या बाबतींत गुप्तकाशी येथील हेड ऑफिसला मी पुरती रक्कम रनरबरोबर न पाठविल्याबद्दल वॉर्निंग ( ताकीद ) दिला आहे. मनिऑर्डरचे पैसे घेऊन धर्मशाळेंत परत आलों. आज दूध सहा आणे शेराचें मोठ्या पराकाष्टेनें पैदा केलें असें नोकरानें सांगितलें. दूध घेतलें व झोपीं गेलों.

## शनिवार ता. १५ जुलै १९३९, दिवस ३५ वा.

सकाळीं आठ वाजतां मंदाकिनीचे घाटावर स्नान केलें व देवळाकडे आलों. धुकें पडलें होतें त्यामुळें भोंवतालचीं हिमशृंगें धुक्यांत गडप झालीं होतीं. हवाहि बरीच गार होती. देवदर्शन करून गांवांतील पंड्याचे माडीवर राहणाऱ्या संन्याशाची भेट घेण्यास गेलों. खोलींत काळोख होता. माडीच्या दोन्ही लहान खिडक्या बंद करून हे साधु एका कोपऱ्यांत व्याघ्रासनावर ध्यानस्थ होते. आम्हीं वर आल्याची चाहूल ऐकून त्यांनीं उठून एक खिडकी अर्धी उघडली व मृगचर्म आमचे पुढें करून बसण्यास खुणेनें सांगितलें व आपणहि व्याघ्रासनावर बसले. बरोबर आणलेले दोन आण्याचे पेढे त्यांचे पुढें ठेवले. " भगवानका दर्शन किया ? " असा त्यांनीं प्रश्न केला. "होय, आतां आपल्या दर्शनास आलों आहे" असें आम्हीं उत्तर दिलें. "हमारा

दर्शन मे क्या है, हमतो आपके जैसा एक आदमी है " असे ते बोलले व पेढ्यांपैकी आमचे हातावर व पंडा मुरलीधर याचे हातावर दोन दोन पेढे त्यांनीं ठेवले. आपण बर्फ पडत असतांनाहि येथें राहतां काय असें विचारतां ते म्हणाले, " हमारा शरीर रहता है. " आपला वेळ कसा जातो म्हणून विचारतां ते म्हणाले, " भगत् नामका उच्चार " हे त्यांचे शब्द ऐकतांच तुकारामाच्या " पांडुरंग ध्यानीं । पांडुरंग मनीं " ह्या उक्तीची आठवण झाली. त्याना " नमस्ते " करून तेथून निघालों.

नंतर काळीकमलीवाल्याचे धर्मशाळेंतील आयुर्वेद औषधालय व रुग्णालय पाहिलें. ह्या धर्मशाळेंतहि बर्फाचे दिवसांत येथें राहाणारे, एक उतार वयाचे संन्यासी आहेत असें ऐकिलें. त्यांच्या बसण्याच्या जागीं गेलों तेव्हां ते समाधींत होते म्हणून पुढें गेलों नाहीं. येथील आयुर्वेदिक वैद्यांची ( डॉक्टरांची ) भेट घेतली. हे हृषीकेश येथील काळीकमलीवाल्याच्या आयुर्वेदिक पाठशाळेंतून " आयुर्वेदविशारद " ही परीक्षा पास झालेले आहेत. हे पट खुला झाल्यापासून तो बंद होईपर्यंत येथें असतात. ह्यांना सहा महिने तनखा व भोजन काळीकमलीवाला संस्थेंतून मिळतें. धर्मशाळेंत राहणारे व पंड्याच्या माडीवर राहणारे ह्या दोन्ही संन्याशां-संबधानें ह्या डॉक्टरांनीं असें सांगितलें कीं, हे दोघेहि हठयोगी आहेत. बाहेर सर्वत्र प्रदेश बर्फानें भरला असला तरी मजबूत बंद केलेल्या घरांत अगर गुहेंत राहतां येणें अशक्य नसतें. बर्फाचे भारानें घर कोसळलें तर मात्र त्या खालीं गडप होण्याची धास्ती असते. यंदा पट खुला झाला त्या वेळीं स्वामी नारायणजी सांध्याच्या दुखण्यानें आजारी पडलेले आम्हांस आढळलें. बरेच दिवस औषधोपचार केल्यावर त्यांचें सांध्याचे दुखणें बरें झालें. अशी माहिती आयुर्वेदविशारदांनीं सांगितली. नंतर मुक्कामाचे ठिकाणीं आलों.

आता आकाश निरभ्र होऊन धुकेंहि निवळलें होतें; त्यामुळें भोंवतालच्या रुपेरी पर्वताचा सुंदर देखावा पाहून त्याकडे पहात उभें रहावें असें वाटे. खोलींत आल्यावर पूजा, पोथी वगैरे नित्यक्रम आटोपून थोडी विश्रांति घेतली. दंडीवाले व बोजेवाले यांना कराराप्रमाणें तीर्थ—इनामाचे बक्षीस दिलें. त्रिजुगीनारायण हेंहि तीर्थ आहे. तेव्हां त्याचें बक्षीस पाहिजे असें दंडीवाले म्हणूं लागले; तेव्हां त्रिजुगीनारायण ह्यांचा बक्षिसाच्या चार धामांत

प्रवेश होतो किंवा कसें ह्याचा उलगडा देवप्रयाग येथील "कूली एजन्सी" ऑफिसांत करून घेऊं असें सांगून त्यांची समजूत केली. ही ब्रिटिश रियासत आहे, टेहरी रियासत नाहीं व पुढें उखीमठ येथे पोलिस ठाणे आहे हें त्यांना ठाऊक असल्यामुळें त्यानीं जास्त अडविलें नाहीं. पंडा मुरलीधर याला एकादषणीबद्दल रुपया १, ब्राह्मण-भोजनाबद्दल रु. २ व त्याचें इतर मेहनतीबद्दल बक्षीस ( दक्षिणा ) रु. २ असे रु. ५ दिले. त्याला नांवगाव, पत्ता वगैरे ( लेख ) लिहून दिला. त्यानें राजीखुषी दाखविली व पाठीवर हात थोपटून "यात्रा सुफल होवो" असा आशीर्वाद देऊन प्रसादपुष्पांची माळ वगैरे दिली. कमळें, पूजा वगैरेंचा संकल्प सोडा असें त्यानें सुचाविलें. आम्ही संकल्प न सोडतां कांहीं करणें असल्यास पत्रानें कळवूं व पैसे पाठवूं असें त्यास सांगितलें. संध्याकाळीं पावसासारखें बुरबुर बर्फ पडण्यास सुरवात झाली. ही बुरबुर कापसासारखी अंगावर पडते व हातांनीं झाडली असतां ओव्हरकोटावरून साफ निघून जाते. ओव्हरकोट चिंब भिजत नाहीं. वरचा भाग जरा ओलसर होतो. संध्याकाळीं आरती पाहिली. देवळांतून परत येतांना पुन्हां सभोंवतालच्या बर्फाच्छादित पर्वतशृंगांचें दृश्य अवलोकन करीत खोलींत परत आलों. आज दूध शेरास चार आणेप्रमाणें मिळालें. कारण यात्रेकरूंची गर्दी नव्हती. दूध घेऊन झोपीं गेलों.

## केदारनाथपासून बद्रीनाथ १०८ मैल.

### रविवार ता. १६ जुलै १९३९, दिवस ३६ वा.

सकाळीं मंदाकिनीचे घाटावर स्नान केलें. ह्या घाटापासून एक फर्लांगावर दुसरा घाट आहे. आकाश निरभ्र असल्यामुळें भोंवतालचे बर्फाच्छादित पर्वत स्पष्ट दिसत होते. आज येथून लवकर निघण्याचा बेत होता म्हणून पंडा मुरलीधर यानें पुजाऱ्यास देवळाचे दरवाजे लौकर उघडण्यास सांगितलें होतें. साडेसातचे सुमारास देवदर्शन घेऊन खोलींत आलों. पूजा, पोथी, जेवण वगैरे उरकलें व सव्वानऊ वाजतां नाथांची पुरी सोडली. फार दिवसांची मनीप्सित कामना पूर्ण झाल्याबद्दल मनास एक प्रकारचा आनंद वाटत होता. इकडे येतांना पाहिलेला बहुतेक देखावा जशाचा तसा दिसत होता. कांहीं ठिकाणच्या पर्वतांवरून येणाऱ्या हिम-नद्यांचें बर्फ वितळल्यामुळें तेथें पाणी दिसत होते. मंदाकिनींतील कांहीं बर्फाच्या शिला वितळून गेल्या होत्या.

असा हा देखावा अवलोकन करीत **गौरीकुंड** येथें सव्वा बाराला आलों. येथें अर्धा तास विश्रांति घेऊन एकचे सुमारास सोमप्रयाग येथें पोहोचलों. दरम्यान केदारनाथास पायानें जाणारे बरेच यात्रेकरू भेटत व ते आम्हांस व खाली जाणाऱ्या इतर यात्रेकरूंस पाहाताच " केदारनाथ स्वामीकी जय " असें ओरडत.

**सोमप्रयाग** येथे पाव कलाक विश्रांति घेतली व नंतर सव्वा तीनचे सुमारास **रामपूर** येथे आलों. आतांपर्यंत सुमारें बारा मैल प्रवास झाला. झुलता लोखंडी पूल ओलांडल्यानंतर त्रिजुगीनारायण, केदारनाथ व देवप्रयाग येथें जाणारे तीन रस्ते एके ठिकाणीं मिळतात तेथें आलों. आम्ही देवप्रयागचा रस्ता धरला. कारण त्या रस्त्यावर रामपूर आहे. सोमप्रयाग-पासून दोन मैल आल्यानंतर खोल दरीतून वाहाणारी मंदाकिनी एक मैल बाजूस राहते व थोड्या चढावास सुरवात होते. नंतर मंदाकिनीस मिळणारी एक लहान नदी, बांधणीच्या पुलावरून ओलांडावी लागते. सुमारे दोन मैलपर्यंत रस्त्याच्या एका बाजूला मोठ्या वृक्षांनीं भरलेले उंच पर्वत व दुसऱ्या बाजूस दाट जंगलांनीं भरलेल्या खोल दऱ्या दिसतात. नंतर जरा पुढें खोल दऱ्यांतून वाहाणारी मंदाकिनी दिसूं लागते. ११ मैल ३ फर्लांगाजवळ रस्ता रामपूर चट्टीजवळ येतो. येथें पाच सहा स्वच्छ व मोठ्या चट्ट्या, तितकींच दुकानें व दोन नळाच्या टाक्या आहेत. काळी-कमलीवाल्याची एकमजली स्वच्छ धर्मशाळा आहे. धर्मशाळेच्या मागच्या बाजूनें मंदाकिनी वाहात आहे. धर्मशाळेसमोर सुरू व इतर मोठ्या वृक्षांनीं भरलेला पर्वत आहे. येथें दूध मिळाले तें घेतलें व झोपीं गेलों.

## सोमवार ता. १७ जुलै १९३९, दिवस ३७ वा.

सकाळीं पांच वाजतां रामपूर येथून निघालों. दोन मैल खोल रस्ता दरींत वाहाणाऱ्या मंदाकिनीच्या बाजूनें उजवीकडच्या पर्वताच्या मध्यावरून गेल्या-नंतर मंदाकिनी अर्धा मैल दूर रहाते व रस्ता जंगलात शिरतो. मंदाकिनीच्या पलीकडे उंच पर्वत व त्या पर्वताच्या पलीकडे उंच हिमशृंगे दृष्टीस पडतात. नंतर एका ओढ्यावरील पक्क्या बांधणीचा पूल ओलांडल्यावर तीन मैलपर्यंत थोडीशी उतरण लागते. येथे **भद्रीपूर** नांवाची चट्टी आहे. सुमारें दोन मैल पुढें **फाटा** चट्टी येथे पावणेसात वाजतां आलों. येथें रस्त्याच्या जरा वरच्या

बाजूस पब्लिक वर्क्स खात्याचा इन्स्पेक्शन बंगला आहे. येथपासून रस्त्याच्या डावीकडे भात, कंकना ( बाजरीसारखें गरिबांचें धान्य ), राजगिरा (इकडे राजगिऱ्यास रामदाणा म्हणतात ) वगैरे पायऱ्यासारख्या शेतांनीं भरलेले पर्वत आहेत व उजवीकडे अशाच शेतांनीं भरलेल्या मोठ्या दऱ्या आहेत. ह्या रस्त्यानें दोन मैल पुढे असलेल्या **मैखंडा** चट्टी येथे आलों. मैखंडा हें पर्वताच्या माथ्यावर आहे. येथे महिषमर्दिनीचे लहानसे देऊळ असून देवळाच्या बाजूला उंच लांकडी चौकटीला बांधलेला झूला (हिंदोळा) आहे. देवळात देवीचा पितळी मुखवटा आहे.व त्याभोंवतीं पितळेची प्रभावळ आहे.आत एक पहाडी ब्राह्मण सप्तशतीचा पाठ वाचीत होता. झूल्यावर बसून तीन तरी झेपा घेऊन पुढें जावें म्हणजे पुढचा प्रवास सुरक्षित होतो अशी येथील लोकाची समजूत आहे. देवळाजवळ तीन चार लहान घरें आहेत. दोन मैल थोडया चढणी–उतरणीनंतर दुरुस्त होत असलेल्या दगडी पुलावरून **ब्यांग** चट्टी येथें आलों. येथून दोन मैलांच्या उतरणीनें **नारायणकोटी** येथें पावणे दहा वाजतां पोहोंचलों. नारायणकोटीस 'भेटा' असेंहि म्हणतात.

## नारायणकोटी

नारायणकोटी अथवा भेटा सुमारें चार फर्लोंगाखालून वाहाणारी मंदाकिनी व उंच वृक्षाच्छादित पर्वत याच्यामध्यें एका चिरोटीवर आहे. येथें चांगल्या बांधणीच्या दुमजली चट्ट्या आहेत व सुंदर बागेंत लहानसा बंगला आहे. उत्तम बांधणीचीं बरींच पुरातन देवळें आहेत. दोन मोठ्या देवळांपैकीं एकांत लक्ष्मीनारायणाची दगडी सुंदर कोरलेली मूर्ति आहे व दुसऱ्यांत शिवलिंग आहे. इतर देवळांत अशाच कांहीं मूर्ति आहेत. असें सांगतात कीं येथें व ह्या ठिकाणाच्या आजूबाजूस आद्य शंकराचार्यांच्या वेळचीं ३६४ देवळें होतीं. त्यांपैकीं बरींच हल्लीं अस्तित्वात आहेत. एका देवळाजवळ दगडी बांधणीचें पाण्याचें मोठें कुंड आहे. ह्या कुंडांत दोन दगडी गोमुखांतून सतत पाणी पडत असते. गोमुखाचे खालीं दोन मोठाले चौकोनी दगड आहेत त्यांवर बसून गोमुखाची धार अंगावर घेतां येते. कुंडांतलें पाणी इतकें स्वच्छ नाहीं. गोमुखाखालीं स्नान करून चट्टींतील मुक्कामावर आलों. पूजा, पोथी, जेवण उरकलें. थोडी विश्रांति घेऊन निघण्याचा बेत होता, परंतु पाऊस बराच पडूं लागला तेव्हां आज रात्रीचा मुक्काम येथें करावा किंवा कसें ह्या विचारांत होतों. पुढें चारचे सुमारास पाऊस थांबला तेव्हां

नारायणकोटी ( भेटा ) येथून निघालों. एका बाजूस खोल दरींतून वाहाणारी मंदाकिनी व दुसऱ्या बाजूस गुलाब व इतर रानटी फुलांच्या गुच्छांनीं भरलेल्या पर्वताच्या टेकड्या अशा सुमारें दीड मैल रस्त्यानें नाला चट्टी येथें पोहोंचलों. येथून एक रस्ता जरा खालून उरवीमठावरून बद्रीनारायणाकडे जातो व दुसरा वरच्या बाजूनें गुप्तकाशीस जातो. आम्हास प्रथम गुप्तकाशीस जावयाचें होतें म्हणून आम्ही वरचा रस्ता धरला. येथें दोन रस्ते कोणीकडे जातात ते दर्शविणारे दोन दगडी खांब आहेत. खोल दरींत वाहात असलेली मंदाकिनी; तिच्या पलीकडे उंच पर्वताच्या माथ्या वरील उरवीमठ येथील तीन, तीन चार चार मजली इमारती, पर्वताच्या पलीकडील बर्फाच्छादित पर्वतांचीं शिखरें, हिरण्यागार उतरत्या शेतांनीं भरलेल्या सभोंवतालच्या पर्वताच्या टेकड्या, असा हा देखावा एक मैल पुढें जाईपर्यंत दिसत असतो. नंतर उंचसखल सपाट्यावर असलेली गुप्तकाशी येथील तीन तीन, चार चार मजली पांढऱ्या रंगाच्या इमारती दिसूं लागतात.

## गुप्तकाशी.

**गुप्तकाशी** हें ह्या बाजूचें मोठें शहर समजलें जातें. ह्याची रचना मसूरी-सारखी आहे. येथें मोठा बाजार आहे. रस्ता बाजारांतून गेला आहे. बाजारांत व इतर उंचसखल टेकड्यांवर मजल्यांच्या मोठ्या इमारती आहेत. केदार-नाथचे पुष्कळ पंडे येथें राहतात. त्यांनीं व इतर व्यापाऱ्यांनीं यात्रेकरूंच्या सोयीकरितां मजल्यांचीं घरें बांधलीं आहेत. गांवांत पोष्ट व तार ऑफिस आहे. केदारनाथच्या बाजूचें हें शेवटचें तार ऑफिस आहे. बाजारांतील एका बनियाच्या हवाशीर माडीवर उतरलों. येथें काळीकमलीवाल्याची धर्मशाळा व सदावर्तहि आहे. गुप्तकाशीस पांचचे सुमारास पोहोंचलों. संध्याकाळीं विश्वेश्वराची आरती पाहिली. बाजारांत साधारण शहरासारखी गर्दी दिसली. दूध दोन आणे शेरप्रमाणें मिळालें. दूध घेऊन झोंपीं गेलों.

### मंगळवार ता. १८ जुलै १९३९, दिवस ३८ वा.

सकाळीं उठून विश्वेश्वराचे देवालयांत गेलों. हें देवालय बाजारांत आहे. दोहों बाजूंस दुकानें असलेल्या मोठ्या दरवाजांतून आत गेल्यावर मोठा चौक लागतो. ह्या चौकांत औरस चौरस १५ फूट परिघाचें दगडी बांधणीचें

कुंड आहे. ह्या कुंडांत पितळी गौमुख व हस्तिमुखांतून दोन मुसळधारा पडत असतात. गौमुखांतून पडणाऱ्या धारेस गंगाजी व हस्तिमुखांतून पडणाऱ्या धारेस जम्नाजी हीं नांवे आहेत. ह्या कुंडाला मणिकर्णिका कुंड म्हणतात. कुंडांत गुडघ्यावर पाणी आहे. कुंडांत स्नानास शिरतांना एक पैसा द्यावा लागतो. प्रथम गंगाजींच्या धारेखालीं स्नान करून मग जम्नाजींच्या धारेखालीं स्नान करतात. स्नान करून वर आल्यावर मर्जीप्रमाणें कुंडाच्या कांठावर बसून गुप्तदान द्यायचीं चाल आहे. हें गुप्तदान म्हणजे काशाच्या अगर पितळेच्या थाळींत तांदुळांत लपविलेल्या चांदी–सोन्याच्या दागिन्यांसह ती थाळी पंड्यास अर्पण करणें. कुंडासमोर आठ दहा पावलें अंतरावर दगडी बांधणीचें सोनेरी कळसाचें विश्वेश्वराचें देवालय आहे. देवालयांत शिरतांना एक पैसा द्यावा लागतो. आंत त्रिकोनी आकाराचें लहान दगडी लिंग आहे. त्यांचे भोंवतीं गोल शालूंका आहे. लिंगाच्या मागें नंदीवर आरूढ अशा शंकर–पार्वती यांच्या चांदीच्या मूर्ति आहेत. शंकराच्या जटांतून गंगा निघालेली दाखविली आहे. जवळच गंगेची पितळी मूर्ति आहे. विश्वेश्वराचे देवळाचे उजव्या हाताला पार्वतीचें देऊळ आहे. आंत पार्वतीची दगडी मूर्ति आहे. डाव्या हाताच्या देवळात पांच पांडव, द्रौपदी व कुंती ह्याच्या दगडी मूर्ति आहेत. विश्वेश्वराच्या देवळाच्या बाहेरील उजवीकडच्या कोनाड्यांत गरुडाची मूर्ति आहे. व डावीकडच्या कोनाड्यांत भैरवाची मूर्ति आहे. कुंडात स्नान करून देवदर्शन घेऊन मुक्कामावर आलों. पूजा, पोथी, जेवण वगैरे नित्यक्रम आटोपला व पोस्ट ऑफिसांत जाऊन घरीं लिहिलेलीं पत्रें टपालाचे खांबांत टाकलीं. पोस्ट व तार ऑफिस एका मोठ्या दुकानांत आहेत. हा दुकानदारच पोस्ट व तार मास्तरचें काम पहातो. पोस्ट ऑफिस असलेल्या दुकानापासून थोड्या अंतरावर चार पांच दोन तीन मजली घरें आहेत. व येथून एक पगदंडी (पायवाट) खालून गेलेल्या मुख्य रस्त्याला मिळते. त्या पगदंडीनें खालीं मुख्य रस्त्यावर आलों. येथून पुढें चार फर्लांग गेल्यानंतर मंदाकिनीवरील लोखंडी गर्डर्सचा झुलता पूल ओलांडला. येथून चढणीस सुरवात होते. पुढें तीन मैल असलेल्या उखीमठपर्यंत चढणीच्या रस्त्याच्या एका बाजूस खोल दरींतून वाहाणारी मंदाकिनी व दुसऱ्या बाजूस पायऱ्यांसारख्या हिरव्यागार शेतांनीं भरलेले पर्वत आहेत.

## उरवीमठ.

अकराचे सुमारास **उरवीमठ** येथें पोहोंचलों. उरवीमठ समुद्रसपाटी-पासून ४,१०० फूट उंचीवर आहे. गांवापासून पाणी जरा दूर आहे, गांवाच्या सुरवातीस सरकारी दवाखाना, पोष्ट व तार ऑफिस, पब्लिक वर्क्स इन्स्पेक्शन, बंगला, मिडल स्कूल वगैरे दगडी बांधणीच्या इमारती आहेत. सरकारी दवाखान्यांत सब-ॲसिस्टंट सर्जन असतो. पोलिस स्टेशन गांवाच्या शेवटीं उंच सपाटीवर आहे. तेथें सब-इन्स्पेक्टर व कांहीं कॉन्स्टेबल्स असतात. उरवीमठ हें केदारनाथाच्या महंताचें (रावळ) नेहमींच्या वस्तीचें ठिकाण आहे. येथील महंतास 'रावळ' ही पदवी आहे.



## उरवीमठ अथवा उर्वीमठ.

देवळाच्या चौकाबाहेर दरवाजाच्या बाजूस चार पांच मोठीं दुकानें आहेत. ह्या दुकानांत हरतऱ्हेचा माल ठेवलेला आहे. चौकांत एक बाजूस देवळांच्या इमारती आहेत व दुसऱ्या तीन बाजूंस रावळजींच्या मोठया तीन मजली वाड्यानें व्यापल्या आहेत. मुख्य देवळांत ओंकारेश्वराचें दगडी लिंग आहे. थंडीचे दिवसांत केदारनाथ बर्फाच्छादित असतें त्या वेळीं केदारनाथांची पूजा ह्या लिंगावर होते. लिंगाचे मागें राजा मंधाता याची दगडी मूर्ति आहे. दुसऱ्या देवळांत उषा व अनिरुद्ध यांच्या

दगडी मूर्ति आहेत. उषा व अनिरुद्ध यांचा विवाह येथें झाला म्हणून ह्या ठिकाणास उखीमठ ( उषामठ अगर उखीमठ ) म्हणतात असें सांगतात. ह्या देवळांत दुसऱ्या खोलीत पंचकेदारांची पांच दगडी लिंगे आहेत. पंचकेदारांच्या समोरच्या खोलीत त्रेतायुग, सत्ययुग, द्वापारयुग व कलियुग ह्या युगाचे काळ्या दगडाचे मुखवटे आहेत, व त्याचे बाजूला जगदंबेचा दगडी मुखवटा आहे रावळजींच्या वाड्याच्या एका भागात संस्कृत महाविद्यालय व त्यांतील विद्यार्थ्यांची राहण्याची जागा आहे. ह्या संस्कृत महाविद्यालयांत शिक्षण फुकट दिलें जातें. विद्यार्थ्यांच्या जेवणाखाण्याचा व शिक्षणाचा सर्व खर्च रावळजी देवालयाच्या उत्पन्नांतून चालवितात. विद्यालयांत अध्यापक व चार शास्त्री शिकविण्यास आहेत. ह्यांपैकीं अध्यापक बरेच विद्वान् असून इंग्रजी जाणणारे आहेत. वाड्याच्या दुसऱ्या भागात तळमजल्यावरील मोठ्या दिवाणखान्यात गाद्यांची बैठक आहे. मध्यें एक उंच गादी व लोड आहे. ह्या लोडाचे वरचे बाजूस, काषाय–वस्त्रपरिधान केलेली, हातांत दंड घेतलेली काळी दाढी असलेली ऑइल पेंटची मोठी तसबीर भिंतीस लावलेली आहे. ही हल्लींच्या रावळजींची ( महंतांची ) तसबीर आहे. हे वीरशैव असून त्यांनीं संन्यास घेतला आहे. ह्याचे बरेच शिष्यहि येथें राहतात. तेहि वीरशैव आहेत. रावळजीस येथें राजाप्रमाणें मानतात. सुमारें पंधरा दिवसांपूर्वी हे दक्षिणेकडे गेले आहेत असें कळलें; त्यामुळें त्यांची भेट घेतां आली नाहीं. हें दक्षिणेतील वीरशैवांच्या शिक्षण वगैरेसंबंधीं चळवळींत बराच पुढाकार घेतात असें सांगतात. वाड्याच्या दुसऱ्या भागात लहानसें वाचनालय ( Library ) आहे. वाड्याच्या मध्यभागांतील माडीवर लहानशा दिवाणखान्यात रावळजींची मुख्य गादी आहे. ह्या गादीवर व लोडावर किनखापी जरीकाठी बिछायत आहे. गादीचे उजवीकडे चांदीच्या तिवईवर जटांतून येणारी गंगा व वामांकित पार्वती अशी चांदीची सुमारें दीड फूट उंचीची शंकराची मूर्ति आहे. गादीपुढें चांदीची मोठी थाळी असून तिजमध्यें रुपये व इतर चांदीचीं नाणीं पडलेलीं दिसलीं. यात्रेकरू ह्या गादीचें दर्शन घेतात व थाळींत चांदीचें नाणें टाकतात. रावळजींच्या टोलेजंग वाड्यापासून जरा पुढें काळीकमलीवाल्याची धर्मशाळा व सदावर्त आहे. ह्या धर्मशाळेजवळून **मध्यमहेश्वर** म्हणजे पंचकेदारांपैकीं दुसरें केदार ह्या ठिकाणास पायवाट जाते. मध्यमहेश्वर येथून बारा मैल आहे. येथून अवघड पायवाटेनें जरा वर गेल्यावर **डिवरीताल** नांवाचें उत्कृष्ट सरोवर आहे. ह्या सरोवरा-

जवळच्या सपाटीवरून चौखांबी नावाचे पर्वत ज्यांच्या दरींत बद्रीनाथ वसलें आहे, ते खालपासून वरपर्यंत दिसतात. दोन वाजेपर्यंत ह्या भागांत फिरल्यानंतर येथून निघालों. येथून रस्ता तुरळक झाडी असलेल्या उंच पर्वतावर चढणीनें गेला आहे. मंदाकिनी आतां बरीच दूर रहाते. ह्या पर्वताच्या माथ्याजवळ आल्यावर तुंगेश्वरी नांवाची नदी डाव्या बाजूनें बऱ्याच उंचीवरून खालीं वाहात जातांना दिसते. ही नदी तुंगनाथ येथून उगम पावते. ह्या नदीला आकाशगंगाहि म्हणतात. साडेतीन मैलांच्या ह्या चढणीच्या रस्त्यानें ह्या पर्वताच्या माथ्यावर **गणेशचट्टी** येथें चारचे सुमारास आलों. येथून सभोंवतालचा सुंदर देखावा प्रेक्षणीय आहे. गणेश चट्टी येथें गणपतीचें लहान देऊळ आहे. नंतर पुढें दोन मैल गेल्यावर **घालावगड** चट्टी लागते. पुढें एक मैल तीन फर्लांग खड्या चढणीच्या रस्त्यानें ह्या पर्वताच्या दुसऱ्या माथ्यावर असलेल्या **देहेडा** चट्टीस पांच वाजतां पोहोंचलों. एका स्वच्छ चट्टींत मुक्काम केला. दूध मिळालें ते घेतलें व झोपीं गेलों.

## बुधवार ता. १९ जुलै १९३९, दिवस ३९ वा.

सकाळीं पांच वाजता देहेडा सोडलें. येथून चढणीचा रस्ता दाट जंगलामधून गेला आहे. ह्या रस्त्यानें दीड मैल पुढें गेल्यावर **गोकुळचट्टी** लागते. दाट जंगलांतून दोन मैल खड्या चढणीच्या रस्त्यानें ह्या पर्वताच्या माथ्याजवळ आलों. पुढें अशाच दाट जंगलांतून अडीच मैल चढणीच्या रस्त्यानें **पोथीबासा** चट्टी येथें आलो. ही चट्टी सोयीची आहे. नंतर अर्ध्या मैलावर असलेल्या **दुगलचट्टी**पर्यंत रस्ता दाट जंगलातून साधारण चढणीनें गेला आहे. अशाच रस्त्यानें सुमारें एक मैल पुढे असलेल्या **बनियाकुंड** येथें सव्वा नऊचे सुमारास पोहोंचलों. गोकुळ चट्टी सोडल्यावर पावसास सुरवात झाली व बनियाकुंड येथें येईपर्यंत पाऊस पडत होता. येथें काळीकमलीवाल्यांची मोठी धर्मशाळा सपाटीवर आहे. धर्मशाळेंत सदावर्तहि आहे. धर्मशाळेच्या बाजूस असलेल्या पर्वतावरून येणाऱ्या झऱ्याखालीं स्नान केलें. पूजा, पोथी, जेवण उरकलें व धर्मशाळेच्या पहिल्या मजल्यावरील खोलींत पाऊस थांबण्याची वाट पहात बसलों असता धर्मशाळेच्या चौकीदाराबरोबर एक मनुष्य खोलींत आला व आपला नोकर आपल्याजवळ केव्हांपासून आहे व आपणांस कोठें मिळाला असें विचारूं लागला. तूं ही चौकशी काय म्हणून करीत आहेस असें विचारतां तो म्हणाला,

मी पोलिस कॉन्स्टेबल आहे. काल रात्रीं घालीयाबगड चट्टीवर एका मारवाडी यात्रेकरूंचा खिसा कापून दोनशें रुपयांची चोरी झाल्याची खबर आम्हांस उखीमठ पोलिस स्टेशनवर आज सकाळीं त्या मारवाडी यात्रेकरूंनीं दिली. आपला नोकर त्या यात्रेकरूंबरोबर रस्त्यानें चालतांना व चिलीम पितांना दिसला होता. तेव्हां आम्हांला त्याचा संशय येत आहे." "आमचा मुक्काम काल रात्रीं घालीयाबगड येथें नसून देहेडा येथे होता व आमचा नोकर आमचे बाजूस निजलेला होता." आम्हीं उत्तर दिलें, "कसेंहि असलें तरी ज्या अर्थी बराच वेळ तो त्या यात्रेकरूबरोबर होता तेव्हां मेहेरबानी-करून मला त्याला कांहीं प्रश्न विचारून त्याचा झाडा घेऊं द्या." पोलिस कॉन्स्टेबल बोलला. "आमच्या नोकरास जे प्रश्न करण्याचे असतील ते आमच्या समक्ष करा व त्याचा झाडा घेणें असल्यास आमच्या समक्ष घ्या," असें त्या कॉन्स्टेबलास सांगितलें. कॉन्स्टेबलनें त्याचें नांव, गांव वगैरे लिहून घेतलें व त्याचा झाडा घेतला. झाड्यांत आरोप ठेवण्यासारखें कांहीं सापडलें नाहीं. कॉनूस्टेबल निघून गेला. पुढें बद्रीनाथ येथे आम्हांस असें कळलें कीं, ही चोरी नैनीताल येथील धंद्याकरितां ह्या प्रांतांत आलेल्या घोडे-वाल्यांपैकीं एकानें केली होती व तो घोडेवाला मुद्देमालासह सांपडला. इक-डच्या पहाडांतील लोक बहुतेक चोऱ्या करीत नाहींत अशी ख्याति आहे व अशा चोऱ्या करणारे लोक बहुतेक घोडेवाल्याचा व दंडी–कंडीवाहकाचा धंदा करण्याकरितां इतर प्रांतांतून आलेले असतात असें ह्या पहाडांतील लोक मोठ्या अभिमानानें सागत असतात.

पाऊस थांबल्यामुळें दोनचे सुमारास बनियाकुंड येथून निघालों. सुमारें सव्वा मैलपर्यंत रस्ता उंच उंच वृक्षांच्या दाट जंगलामधून गेला आहे, नंतर तुंगनाथ पर्वताच्या नागमोडी चढणीस सुरवात होते. ह्या चढणीचा सुरवातीचा एक मैल रस्ता मोठ्या व उंच झाडांच्या दाट जंगलांतून गेला आहे व नंतर तऱ्हतऱ्हेच्या फुलांच्या हिरव्यागार झुडपांनीं भरलेल्या वृक्षविरहित पर्वताच्या बाजूनें वर गेला आहे. रस्त्याच्या दुसऱ्या बाजूस धुक्यानें भरलेल्या खोल खोल दऱ्या दिसतात. पुन्हां पावसास सुरवात झाली होती व जिकडे तिकडे दाट धुकें पसरलें; त्यामुळें भोंवतालच्या बर्फाच्छादित पर्वतांचा व हिरव्यागार खोल दऱ्यांचा देखावा दिसेनासा झाला.

## तुंगनाथ

एक मैल नागमोडी खड्या चढणीचा परंतु चांगला बांधलेला अशा रस्त्यानें

सव्वा पांच वाजतां **तुंगनाथ** पर्वताचे माथ्यावर येऊन पोहोंचलो. येथून उगम पावणाऱ्या आकाशगंगेच्या लहान, परंतु रुंद धबधब्याच्या बाजूनें काळीकमलीवाल्यांच्या धर्मशाळेंत पहिल्या मजल्यावर एका खोलीत उतरलों. बुरबुर पाऊस व दाट धुकें असल्यामुळें तुंगनाथांचे देवळांत न जातां धर्मशाळेच्या रस्त्यावरूनच कळसाचे दर्शन घेतले. तुंगनाथ हें शिखर समुद्रसपाटीपासून १३,००० फूट उंच आहे. सर्व उत्तराखंड यात्रेतील अत्यंत उंच अशी ही जागा आहे. थंडी बरीच, परंतु उत्साहवर्धक होती. धर्मशाळेतील चौकीदारानें नोकरास व कुलींस ब्लँकेटें दिलीं होतीं. आम्हांसहि एक घुस्सा घ्या म्हणून चौकीदार म्हणत होता. परंतु आमच्याजवळ स्वतःचीं दोन रग्स व एक दुलई असल्यामुळें आम्हांस कोठेंहि धर्मशाळेतील पांघरुणें वापरण्याची जरूर पडली नाहीं. येथें दूध मिळालें तें घेतलें. उद्यां सकाळीं तरी आकाश निरभ्र होऊन भोंवतालचा सुंदर देखावा दिसावा अशी प्रार्थना करून झोपीं गेलों.

## गुरुवार ता. २० जुलै १९३९, दिवस ४० वा.

सबंध रात्रभर पाऊस पडत होता व सकाळीं सात वाजेपर्यंत दाट धुकें पसरलें होतें. नंतर पाऊस थांबला व आकाश निरभ्र होण्यास सुरुवात झाली. आकाशगंगेच्या धारेखालीं स्नान केलें. ही वरच्या साधारण चौरस खडकांतून खालीं पडते. त्या खडकास चंद्रशिला म्हणतात. स्नान करून शिखरावर असलेल्या तुंगनाथाचे देवळांत गेलों. मुख्य देऊळ चिरेबंदी दगडांनीं बांधलें आहे. वर सोनेरी कळस आहे. जवळ दुसरीं तीन चार देवळें आहेत. मुख्य देवळाचे दरवाज्यावर एके बाजूस गणपति आहे. आंत जाण्याचा दरवाजा फार ठेंगणा आहे. बरेंच वांकून आंत शिरावें लागतें. आंत जाण्यापूर्वी दरवाज्याजवळील शिक्केबंद पेटींत एक पैसा टाकावा लागतो. मुख्य गाभाऱ्यांत दोन फूट उंचीचें ओबडधोबड दगडाचें शिवलिंग आहे. पंचकेदारपैकीं तुंगनाथ तृतीय केदार आहे. येथें भीमसेनानें वधिलेल्या रेडारूपी शिवाचे बाहु आहेत अशी समजूत आहे. लिंगावर चांदीची छत्री व अभिषेकपात्र हीं टांगलेलीं आहेत. जवळच चांदीचें पंचकेदार म्हणजे चांदीचे तबकांत पांच पांच मुखवटे आहेत. बाजूला चांदीच्या चौऱ्या (चामर), अबदागीर वगैरे व इतर उपकरणीं ठेवलेलीं आहेत. तुंगनाथाचे लिंगाचे मागच्या बाजूस आद्य शंकराचार्यांची दगडी मूर्ति आहे. लिंगाची पूजा करून

बाहेर आलों व पार्वती, काळभैरव वगैरेंचीं इतर देवळें पाहिलीं. आतां म्हणजे साडे आठचे सुमारास आकाश निरभ्र होऊन ऊन पडलें असल्यामुळें भोंव-



तुंगनाथ.

तालच्या अलौकिक सृष्टिसौंदर्याचें पारलौकिक शोभेचें दृश्य स्पष्ट दिसूं लागलें. हिमालय पर्वताच्या रांगेपैकीं तुंगनाथाला लागून असलेला पर्वत हिमशृंगांनीं भरलेला आहे. आकाशास लागून दिसणाऱ्या अफाट हिमशृंगांच्या चकाकित कळसांच्या अत्युत्कृष्ट सृष्टिसौंदर्याचें असें दृश्य सर्व जगांत दुसरे कोठें नाहीं असें म्हणतात. येथे उभे असता पृथ्वीवरील सृष्टिसौंदर्याच्या प्रभाशील भव्य देव्हाऱ्यात आपण आहों असें वाटतें. तुंगनाथ हें हिमालय पर्वताच्या मध्यभागातील शिखर आहे. त्याच्या पूर्व बाजूस नंदादेवी, पाचचूली, गंधमादन आणि द्रोणाचल ह्या पर्वतांचीं बर्फाच्छादित रुपेरीं शिखरें आहेत. उत्तरेस केदारनाथ, बद्रीनाथ व गंगोत्री ह्या पवित्र पर्वतांचीं शिखरें आहेत. व दक्षिणेच्या बाजूस इतर पर्वत,पर्वतांच्या टेकड्या व त्यांचे पलीकडील दाट जंगलांनीं भरलेल्या सपाट्या दिसतात. हा सर्व अप्रतिम देखावा पाहून मनास आल्हाद होऊन हुशारी वाटतें. आतांपर्यंत झालेल्या प्रवासाचा त्रास व परिश्रम आपण विसरतों व एक प्रकारच्या स्वर्गसुखात आपण आहोंत असें वाटतें. जवळ असलेल्या गंधमादन पर्वताचे शिखरावर गंधर्वांची गुप्त वस्ती असून पर्वणींचे पवित्र दिवसांत ह्या शिखरांचे बाजूकडून सामवेदाच्या स्तोत्रांचा मधुर ध्वनि ऐकण्यांत येतो असे सांगतात.

धर्मशाळेंत परत येऊन पूजा, पोथी, जेवण वगैरे उरकलें. आकाशगंगा, देवळें वगैरे दाखविण्यास बरोबर फिरत होता त्या पंड्यास नांव, गांव, पत्ता वगैरे ( लेख ) लिहून दिला व अकरा वाजतां तुंगनाथ येथून निघालों. पावसाची बुरबुर सुरूं झाली होती. बद्रीनाथास जाणें असल्याकारणानें दुसऱ्या बाजूनेंहि खालीं जाण्याचा रस्ता आहे त्या रस्त्यानें अडीच मैलांची नागमोडी उतरण उतरून **भीमाचट्टी** येथें आलों. ह्या चट्टीस 'भीमड्यार' असेंहि म्हणतात. रस्ता खड्या उतरणीचा आहे. परंतु चांगला बांधलेला आहे. खोल दऱ्यांच्या बाजूस सुमारें दीड फूट उंचीचे दगडी बांध आहेत. नंतर थोड्या चढणी—उतरणीनें एक मैल दाट जंगलांतून रस्ता **जंगलचट्टी** येथें येतो. अशाच दाट जंगलामधून कांहीं खोल दऱ्यांच्या बाजूनें दोन मैलांनंतर **पांगरबासाचट्टी** लागते. जंगलचट्टी सोडल्यानंतर फार जोराचा पाऊस लागला होता म्हणून पांगरबासा येथें एका चट्टींत दीड पासून तीन वाजेपर्यंत विश्रांति घेतली. तीन वाजतां पांगरबासा येथून निघालों.

दाट जंगलामधून थोड्या उतरणीच्या रस्त्यानें पांचचे सुमारास **मंडळ-चट्टी** येथे पोहोंचलों. भाताच्या शेतांनी भरलेल्या रुंद खिंडींत वसलेली ही चट्टी चागली आहे. तुंगनाथ पर्वताच्या दुसऱ्या बाजूनें उगम पावलेली बाल-खिल्या अथवा बालसुती ही नदी मंडळचट्टीजवळूच वाहात जाते. येथें काळीकमलीवाल्याची धर्मशाळा, सदावर्त व दुसऱ्या काहीं चट्ट्या आहेत. नदीच्या काठीं महादेवाचे देऊळ आहे. ह्या देवळाचे महंतासहि 'रावळ' ही पदवी आहे. नदीचे पाणी अडवून त्याचे पाट आजूबाजूच्या शेतांत व मळ्यांत सोडले आहेत. जवळच ताराचा झुलता पूल आहे. नदीचा प्रवाह, तिच्या बाजूचीं हिरवींगार शेते व भाज्यांचे मळे वगैरे देखावा प्रेक्षणीय आहे. येथून दोन मैलावर अनुसूया देवीचें देऊळ आहे. ह्या देवळास येथून पायरस्ता आहे. अत्रिऋषींची पत्नी व श्रीगुरुदत्तात्रेय यांची माता सती अनुसूया हिनें येथें महान् तपश्चर्या केल्याबद्दल पुराणांत उल्लेख सांपडतो. येथून दुसऱ्या पायवाटेने अकरा मैल गेल्यावर **रुद्रनाथाचें** देऊळ लागतें. ह्या देवळांतील लिंगास चतुर्थ केदार म्हणतात. रेडारूपी शिवाचे हें तोंड आहे, असे सागतात. धर्मशाळेतील पहिल्या मजल्यावर एका खोलींत उतरलों. आजूबाजूचा सुंदर देखावा पाहून पुन्हां खोलींत आलों. दूध घेतलें व झोपीं गेलों. थंडी बरीच असल्यामुळे नोकरास व कुलींस धर्मशाळेच्या चौकीदारानें ब्लॅंकेटें दिलीं होतीं.

## शुक्रवार ता. २१ जुलै १९३९, दिवस ४१ वा.

सकाळीं साडेसहा वाजता मंडळ सोडलें. एक मैल रस्ता सरळ असून पुढचा साडे तीन मैल रस्ता पर्वताच्या बाजूनें हिरव्यागार शेतांमधून गेला आहे. दुसऱ्या बाजूच्या शेतांच्या जरा पलीकडून बालाखिया नदी रुंद दरी-मधून वाहतांना दिसते. पुढें एका मोठ्या ओढ्यावरील लोखंडी गर्डरचा पूल ओलांडल्यावर रस्ता पर्वताला वेढा घालून चढत जातो. चौथा मैल संपतांच "वैतरणेका स्नान करके आगे जाना" असें लिहिलेली पाटी लागते. येथून अर्ध्या फर्लांगाची वाट वर असलेल्या स्नानाच्या ठिकाणापर्यंत जाते. तेथें टेकडीच्या बाजूस जनावराच्या तोंडाप्रमाणें दिसणाऱ्या दगडांतून मुसळधार खालीं चौकोनी कुंडात पडत असते. धारेखालीं उभे राहण्याकरितां कुंडांत पायऱ्या आहेत. येथें स्नान करून वर आल्यावर शेजारीं दुसरें लहान कुंड आहे. तेथें पितृतर्पण करतात. ह्या सर्व विधीबद्दल कुंडाकडील पंड्यास

एक आणा दिला तरी तो खूष होतो. दहा बारा पायऱ्या वर चढून गेल्यावर तीन चार लहान दगडी बांधणीचीं देवळें लागतात. ह्या देवळांत गणपती, पार्वती, शिवलिंगें वगैरे आहेत. ह्या ठिकाणास 'वैतरणी तीर्थ' म्हणतात. येथून एक फर्लांग वर गेल्यावर खालून आलेला रस्ता लागतो. कुंडांत स्नान करून देवळें पाहून ह्या ठिकाणीं दंडींत बसलों. दोन फर्लांग पुढें असलेल्या **गोपेश्वर** येथें एका चट्टींत मुक्काम केला. ऊन कडक पडलें होतें व येथें उन्हाळा बराच भासत होता.

## गोपेश्वर

**गोपेश्वर** साधारण वस्तीचा टुमदार गाव आहे. गांवांत दोन तीन नळाच्या टाक्या आहेत. रस्ते क्षेत्रांतील रस्त्याप्रमाणें अरुंद परंतु दगडी बांधणीचे आहेत. गांवाच्या मध्यभागीं गोपेश्वराचें दगडी देऊळ आहे. देवळावर लहान सोनेरी कळस आहे. आंत ओबडधोबड दगडी शिवलिंग आहे. लिंगाच्या मागे पार्वतीची दगडी मूर्ति आहे. शिवलिंगावर व पार्वतीचे मूर्तीवर चांदीचे मुखवटे आहेत. उजवे बाजूस गरुडाची काळ्या दगडाची मोठी मूर्ति आहे. ह्या देवळाची सर्व जमीन अष्टधातूची बनविलेला आहे. देवळाचे सभोंवतीं मोठे आवार आहे. ह्या आवारात एका कोपऱ्यात दगडी चबुत्र्यावर अष्टधातूंचा मोठा त्रिशूळ आहे. ह्या त्रिशूळाचे मध्यावर मोठा परशू आहे. त्रिशूळाच्या खालच्या बाजूस पुसकट लेख आहे. त्या लेखाचीं अक्षरें ओळखतां आलीं नाहींत. ह्या त्रिशुळाचा दांडा हातानें हालविला असतां हालत नाहीं, परंतु त्याला करंगळीनें लोटला असतां त्रिशूळाचा वरचा भाग हालल्यासारखा दिसतो. त्रिशूळाच्या दांड्याच्या मध्यभागास असलेला परशू परशुरामाचे वेळचा आहे असें सांगतात. त्रिशुळाच्या पलीकडे भिंतीजवळ भीमसेनाची मोठी दगडी मूर्ति आहे. आवारांत दुसऱ्या बाजूस माडीवर देवळाच्या महंतांची गादी आहे. गादीसमोर चांदीचें तबक ठेवलेलें असतें. यात्रेकरू खुषीस वाटल्यास ह्या तबकांत चांदीचें नाणें टाकतात. टाकलेंच पाहिजे अशी कोणावर बळजबरी नसते. महंतास रावळ म्हणतात. हे मद्रासकडील वीरशैव आहेत. ह्यांना मराठी, इंग्रजी व हिंदुस्तानी चांगलें येतें. हेहि दक्षिणेंतील वीरशैवांच्या शिक्षणोन्नति वगैरे चळवळींत बराच भाग घेतात. अशी समजूत आहे कीं, वैतरणी कुंडाचें स्नान करून गोपेश्वराचें दर्शन घेतल्यावर केदारनाथाची यात्रा पूर्ण होते. येथून पुढें बद्रिनारायणापर्यंत

एकहि शिवलिंग आढळत नाहीं. येथपासून पुढें विष्णूचा प्रदेश सुरू होतो अशी समजूत आहे. हरि-हरात ( विष्णु व शिव यांत ) भेद मानणारे विष्णु थोर व शिव लहान असें मानणारे कट्टे वैष्णव चमोली ( लालसंगा ) येथून गोपेश्वराकडे न वळतां परस्पर बद्रिनाथास जातात कारण गोपेश्वरापासून केदारनाथाची ( शिवाची ) हद्द सुरू होते.

देऊळ वगैरे पाहून मुक्कामाच्या ठिकाणीं आलों. पूजा, पोथी व जेवण उरकलें. थोडीशी विश्रांति घेऊन दोनचे सुमारास गोपेश्वर सोडलें. येथून उतारास सुरवात होते. हा उतरता रस्ता हिरव्यागार शेतांनीं भरलेल्या पर्वतावरील टेकड्यांच्या बाजूनें गेला आहे. रस्त्याच्या दुसऱ्या बाजूला वाहणारी बालखिल्या दिसते. ह्या दऱ्यात व त्याचे 'पलीकडील पर्वतांचे मध्यभागापर्यंत हिरवींगार शेते आहेत. मधून मधून त्या पर्वतावरून खालीं वाहात येऊन बालखिल्या नदीस मिळणारे लहानमोठे शुभ्र पाण्याचे प्रवाह दृष्टीस पडतात. एक मैलानंतर रस्ता उजवीकडील पर्वताच्या बाजूला वळतो. येथून रस्त्याच्या डावीकडे खोल दरींतून नागमोडीने वाहणारी अलकनंदा, तिच्या पलीकडे मध्यापर्यंत हिरव्या मखमाली गालीच्यासारख्या दिसणाऱ्या शेतानीं भरलेले उंच पर्वत व त्यांचे बाजूबाजूनें जात असलेला देवप्रयाग येथून येणारा रस्ता दिसूं लागतो. पुढें थोड्या नागमोडी चढणी उतरणीनें रस्ता लालसंगा अथवा चमोली येथील लोखंडी गर्डर्सच्या २२३ फूट लांब झुलत्या पुलाजवळ येतो.

## चमोली.

**चमोली** अथवा लालसंगा, ह्या पुलाच्या पलीकडे आहे. चमोलीस लाल संगा हें नांव ह्या पुलाचा रंग पूर्वी तांबडा होता, त्यावरून पडलें. हा गांव पुलापलीकडील पर्वताच्या उतरणीवर वसला आहे. येथे डेप्युटी कलेक्टरची कचेरी, सरकारी तिजोरी, दवाखाना, पोष्ट व तार ऑफिस पोलीस, स्टेशन, धर्मशाळा, सदावर्त वगैरे आहेत. येथें पूर्वी मोठी वस्ती होती. परंतु ती १९२४ च्या आगष्ट महिन्यांत आलेल्या मोठ्या पुरानें' वाहून गेली व त्यानंतर कांहीं सरकारी इमारती, पंधरा वीस घरें, तितकींच दुकानें व तीन चार धर्मशाळा ह्यांखेरीज जास्त वस्ती वाढली नाहीं. ह्या महापुराची सविस्तर हकीकत गढ़वाल गॅझेटीअरमध्यें दिली आहे. ती मनोरंजक आहे.

चमोलीपासून पुढें साडेचार मैलांवर विरहीगंगा, अलकनंदेस मिळते. विरही-गंगा पूर्वेच्या बाजूला पंचवीस मैलांवर बदरीनाथच्या भोंवतालीं असलेल्या त्रिशूल शिखरांतून निघालेली आहे. ह्या शिखराची उंची २५,६६० फूट आहे. हा प्रदेश पहाड कोसळण्या ( Land Ships ) करितां प्रसिद्ध आहे. १९२३ च्या सप्टेंबरांत पहाड कोसळल्याच्या रिपोर्टावरून इंजिनीअरिंग सर्वे खात्याचे अधिकारी त्या ठिकाणीं गेले तेव्हां त्यांना ९०० फूट उंच, ११००० फूट बुडाशीं रुंद व वरच्या बाजूला २००० फूट रुंद अशा बांधानें विरहीगंगेला गोहना ( डुर्मी ) जवळ अडविले आहे असें आढळलें. ह्या बांधासंबंधीं मोठमोठ्या तज्ज्ञांमध्यें बरीच भवति न भवति होऊन शेवटीं ले. कर्नल पुलफोर्ड, रॉयल इंजिनीअर, यांनीं गणितावरून असें भाकित केलें कीं, १९२४ च्या ऑगस्टमध्यें बांधावर ९०० फूट पाणी चढल्यावर बांध फुटून महापूर येईल. हें भाकित खरें ठरलें. कारण तारीख २५ ऑगस्ट १९२४ रोजीं सकाळीं बांधावरून पाणी उतरूं लागले व मध्यरात्रीचे सुमारास प्रतिध्वनि करणारा भयंकर स्फोट होऊन ३९० फुटांचा बांध कोसळला व त्यांतून १०,०००,०००,००० घनफूट पाणी सहा तासांत वाहून गेलें. ह्या पुरांत चमोलीचा कांहीं भाग व श्रीनगर हा सर्व गांव वाहून गेला. गोहना येथें आतां सुंदर तलाव बनला आहे. ह्या तलावाच्या बांधावरून पाणी सहज वाहून जात असतें. ह्या बांधाची लांबी दोन मैल, रुंदी अर्धा मैल व खोली पांचशें फूट आहे व त्यानें चारशें एकर जागा व्यापिली आहे. हा तलाव नैनीतालच्या तिप्पट मोठा आहे.

पुलाच्या अलीकडून जाणारा रस्ता बद्रीनाथास जातो. येथून बद्रीनाथ ४५ मैल आहे. पूल ओलांडून पलीकडे गेलेला रस्ता चमोलीजवळून देवप्रयाग-कडे जातो. पोस्ट ऑफिसांत जाऊन घरीं पत्र लिहिलें व तें टपालांत टाकून पुलाचे अलीकडील बद्रीनाथचे रस्त्यास लागलों. हा रस्ता वृक्षरहित हिरव्या-गार वनस्पतींच्या झुडपांनीं भरलेल्या पर्वताच्या बाजूनें वर चढत गेला आहे. येथपासून रस्त्याच्या बाजूस व कोठें कोठें पर्वताच्या कड्यावरहि तारेचे खांब ( Telegraph posts ) दिसूं लागतात. रस्त्याच्या उजवीकडून साधारण खोल दरींतून अलकनंदा वाहात गेली आहे. ह्या रस्त्यानें पुढें दोन मैल असलेल्या **मठ्ठचट्टी** येथें आलों. ही सुंदर चट्टी आहे. बऱ्याच मजल्यांच्या घरांभोंवतीं लहान सुंदर बगीचे आहेत. नंतर दीड मैलाच्या नागमोडी चढ-

णीनें **छिनका** चट्टी येथें साडेपांच वाजतां आलों. येथेंहि हवाशीर चट्या आहेत. एका चट्टीच्या माडीवर उतरलों. रात्रीं दूध घेतलें व झोपीं गेलों.

## शनिवार ता. २२ जुलै १९३९, दिवस ४२ वा.

छिनका येथून सकाळीं सहा वाजतां निघालों. एक मैल पुढें आल्यावर मोठा ओढा पक्क्या बांधणीच्या पुलावरून ओलांडला. ह्या ओढ्याचें पाणी बऱ्याच खोलीवरून वाहातें. येथून रस्ता वृक्षविरहित, परंतु कांहीं ठिकाणीं हिरव्यागार झुडपांनीं व कांहीं ठिकाणीं काळ्या खडकांनीं भरलेल्या पर्वताच्या बाजूनें गेला आहे. रस्त्याचे उजवीकडे अलकनंदा खोल दरींतून वाहाते. तिच्या पलीकडे हिरव्यागार झुडपांनीं भरलेले उंच पर्वत आहेत, ह्या पर्वतांच्या मध्यापर्यंत कांहीं ठिकाणीं हिरवींगार उतरतीं शेतें आहेत. पर्वतावरून येणाऱ्या शुभ्र प्रवाहांचें पाणी ह्या शेतांतून खेळविलेलें दिसतें. येथें असलेल्या **सियासैल** चट्टीजवळ सात वाजतां आलों. सुमारें एक मैल पुढें गेल्यावर **बावला** चट्टी लागते. दरम्यान **हट्ट** म्हणून चट्टी आहे. येथून पांच फर्लांगावर पहाड कोसळला (Land Ship) होता व पहाडावरून खालीं आलेल्या मोठमोठ्या दगडांनीं व रेतीनें मूळ रस्ता बंद झाला होता. तात्पुरता तयार केलेला रस्ता ओलांडण्यास धोक्याचा असल्यामुळें दंडींतून उतरून दोन कुलींचे हात धरून ह्या रस्त्यानें जावे लागलें. येथून जरा पुढें गेल्यावर अलकनंदेचा व विरहीगंगेचा संगम दिसतो. ह्या संगमाच्या बाजूचा प्रदेश जितका रमणीय तितकाच नित्य पहाड कोसळण्या-(Land Ship) करितां कुविख्यात आहे. येथून एक फर्लांग पुढें खोल पाण्याच्या मोठ्या प्रवाहावरील पक्का पूल ओलांडून थोड्याशा उतरणीनें पुढें गेल्यावर पर्वताची सपाटी लागते. ह्या सपाटीवरील रस्त्याच्या एका बाजूला मुद्दाम लावलेली झाडी आहे व दुसऱ्या बाजूला हिरवींगार शेतें आहेत. येथून थोड्या उतरणीनें पुढें गेल्यावर रस्ता वृक्षविरहित हिरव्यागार झुडपांनी भरलेल्या पर्वताकडे वळतो. रस्त्याच्या दुसऱ्या बाजूला चारपांच पर्वतांच्या खोल खोल दऱ्यांतून नागमोडीनें वाहणारी अलकनंदा दृष्टीस पडते. ह्या उतरत्या रस्त्यानें पांच फर्लांग पुढें गेल्यावर, लहानशा ओढ्यावरील पक्क्या पुलावरून रस्ता **पीपलकोटी** येथें येतो. येथें येईपर्यंत आजूबाजूचा देखावा फारच आल्हादकारक आहे. बावला सोडल्यानंतर पावसास सुरवात झाली व हा पाऊस पीपलकोटी येथें येईपर्यंत चालू होता.

ीपलकोटी येथें साडेआठ वाजतां पोहोंचलों. गांवाच्या सुरवातीस मोठ्या पिंपळाचे वृक्षाखालीं दुर्गादेवीचें लहान देऊळ आहे. ह्या देवळाच्या मागील मैदानांत काळीकमलीवाल्यांची धर्मशाळा व सदावर्त आहे. रस्ता बाजारांतून गेला आहे. बाजारांत किराणा जिनसांचीं, शिलाजीत, कस्तुरी वगैरेंचीं व वनगाईच्या केसांच्या चौऱ्यांचीं, तशींच व्याघ्रचर्म, कस्तुरी–मृगचर्माचीं, बरींच मोठमोठीं दुकानें आहेत. बाजारांत दोन तीन नळ व त्यांच्या खालीं पाण्याच्या टाक्या आहेत. गांवाचे सुरवातीस असलेल्या एका दुकानांत पोस्ट व तार ऑफिस आहे. पोस्टाचें काम हा दुकानदार पहातो. परंतु तार ह्याला देतां येत नाहीं. चमोलीपासून ह्या दुकानांत टेलिफोन आहे. हा दुकानदार तार टेलिफोननें चमोलीस पाठवितो. पहाड कोसळून रस्ता बंद झाला आहे, असें ह्या दुकानदाराचे कानावर आल्यास ती खबरहि हा दुकानदार टेलिफोननें चमोलीस पाठवितो. बाजारांत एका चट्टीच्या माडीवर उतरलों. नळाखालीं स्नान केलें. पूजा, पोथी व जेवण उरकून पाऊस थांबण्याची वाट पहात बसलों.



## गरुडगंगा

ीनचे सुमारास पाऊस थांबला तेव्हां पीपलकोटी येथून निघालों. एका ाजूस हिरव्यागार झुडपांनीं भरलेलें उंच खडे पर्वतांचे कडे व दुसऱ्या बाजूनें ोल अरुंद दरींतून वाहणारी अलकनंदा अशा रस्त्यानें पुढें साडेचार मैल ासलेल्या **गरुडगंगा** येथें साडेचारच्या सुमारास पोहोंचलों. दरम्यान दोन

ठिकाणीं पहाडावरून रस्त्यावर दगड व रेती यांचे ढीग खालीं येऊन पडलेले आढळले. गरुडगंगेच्या अलीकडच्या बाजूस काळीकमलीवाल्यांची धर्मशाळा व सदावर्त हीं आहेत. धर्मशाळेंत बरीच गर्दी दिसली म्हणून गरुडगंगेवरील लोखंडी पूल ओलांडून गरुडगंगा गांवांत आलों. येथें बऱ्याच चट्टया व हलवायांचीं व इतर दुकानें आहेत. पूल ओलांडल्यानंतर गांवाच्या सुरवातीस नदीच्या कांठावर गरुडभगवानाचें लहानसें देऊळ आहे. येथें एका स्वच्छ चट्टींत उतरलों. उद्या सकाळीं स्नान, पूजा, पोथी, जेवण वगैरे उरकून येथून निघावयाचें असें ठरविलें. येथें आल्यावर पुन्हा पावसास सुरवात झाली व रात्रभर पाऊस पडत होता. दूध घेतलें व झोंपीं गेलों.

## रविवार ता. २३ जुलै १९३९, दिवस ४३ वा.

सकाळीं सात वाजतां गरुडगंगेवर स्नानाकरितां गेलों. स्नानाची जागा गरुडभगवानचे देवळापासून जरा खालीं आहे. येथें साधारण लहानसा घाट असून घाटासमोर दगडाचें धरण आहे. धरणाचे अलीकडे कुंड आहे. ह्या कुंडांत कंबरभर पाण्यांत उतरून गोता ( बुडी ) मारून हातांत येईल तो लहानसा दगड घेऊन स्नान करून घाटावर आल्यानंतर त्या दगडाची पूजा करून त्या दगडाला देवळांतील गरुडाचे मूर्तीचा स्पर्श करून तो दगड यात्रेकरूंस देतात. विंचू, सर्प वगैरेंचें विष हा दगड उगाळून दंशाचे ठिकाणीं लावला असतां विष उतरतें असें सांगतात. ह्या दगडाचे पूजेनंतर काशाच्या थाळींत पेढे घालून ती थाळी पंड्यास अर्पण करतात. गरुडगंगेचें पाणी इतकें स्वच्छ आहे कीं, कुंडाचे तळाशीं असलेलें लहान मोठे दगड स्पष्ट दिसतात. गरुडगंगा बरीच पुढें अलकनंदेस मिळते. कुंडांत स्नान केल्यानंतर वर सांगितलेला सर्व विधि उरकून मुक्कामाचे ठिकाणीं आलों. पूजा, पोथी, जेवण आटोपून साडेनऊ वाजतां गरुडगंगा येथून निघालों. येथून मोठमोठ्या खडकांनीं भरलेल्या पर्वताच्या बाजूनें रस्ता वर चढत गेला आहे. रस्त्याच्या डावीकडे हिरव्यागार झुडपांनीं भरलेल्या पर्वतांच्या दऱ्यांतून अलकनंदा वाहात गेली आहे. ह्या दऱ्यांत ठिकाठिकाणीं हिरवीगार शेतेंहि आहेत. सुमारें पाऊण मैलाच्या चढवानंतर पर्वताच्या माथ्यावर आलों. येथून अलकनंदा जरा पलीकडे राहते. येथें सुरूंच्या झाडांचें जंगल आहे. रस्त्याच्या दोन्ही बाजूंस रानतुळशींचीं व इतर फुलझाडांचीं झुडपें आहेत. दोन मैल सहा फर्लांग आल्यानंतर, खोल दरींतून वाहणाऱ्या लहान नदीवरील लाकडी फळ्यांचा पूल ओलांडावा

लागतो. ही नदी पलीकडे असलेल्या खोल दरींत अलकनंदेस मिळते. येथें " नया रस्ता " ( New Road ) असें लिहिलेली पाटी लागते. ह्या पाटीपासून एक फर्लांग पुढे गेल्यावर दुसरी मोठी पाटी आहे. ह्या पाटीवर पुढें दिलेल्या सूचना इंग्रजींत व हिंदींत लिहिल्या आहेत. "Danger, Beware of slips and falling boulders " " खत्तर ! खत्तर ! फत्तरके गीरनेसे खत्तरसे खबरदार रहो. " जरा पुढें गेल्यावर आणखी एक मोठी पाटी आहे व त्या पाटीवर " This road is dangerous and liable to boulders falling from above if there is rain. " असें इंग्रजींत मोठ्या अक्षरांनीं लिहिलें आहे. ह्या पाटीपासून दुसरा रस्ता पर्वताच्या माथ्यावरून गेला आहे; परंतु तो चढावाचा व लांबीचा असल्यामुळें पाऊस एकसारखा पडत असल्यास त्या रस्त्याचा उपयोग करण्यात येतो. आज सकाळपासून उघाड होती. पहाटेपासून पाऊस थांबला होता. पुढें असलेल्या पाताळगंगा येथून नव्या रस्त्याने आलेले यात्रेकरूकडून असें कळले कीं, परवांच्या पावसानें पाताळगंगेच्या अलीकडील कोसळलेला रस्ता दुरुस्त करण्याचें व त्यावरील दगडाचे व रेतीचे ढीग काढण्याचें काम चालूं आहे व तूर्त कामचलाऊ रस्ता कोसळलेल्या रस्त्याच्या बाजूने तयार केला आहे. त्या रस्त्यानें दंडी जाऊं शकेल. " आम्हीं नुकत्याच दोन दंड्या त्या रस्त्यानें जातांना पाहिल्या " असेंहि ते यात्रेकरू म्हणाले. असें कळलें तेव्हां आम्ही ह्या रस्त्यानेंच पुढें गेलों. काळ्या फत्तरानीं भरलेल्या पर्वताच्या बाजूनें दोन मैल गेल्यानंतर थोडा उतार लागतो. हा उतरणीचा रस्ता रानतुळशी, झेंडू, व इतर रंगीबेरंगी फुलझाडांच्या झुडपांनीं भरलेल्या पर्वताच्या टेकड्यामधून गेला आहे. रस्त्यानें जातांना ह्या झुडपांचा स्वाद आल्हादकारक वाटतो. तिसऱ्या मैलाचे सुरवातीस तंगणी नांवाची लहानशी चट्टी लागते. येथील भोंवतालची वनशोभा फार उत्कृष्ट आहे. बऱ्याच दूरवर दिसणारा अलकनंदेचा थोडा भाग, तिच्या बाजूच्या खोल दऱ्या, व त्यांच्या पलीकडील उंच उंच हिमशृंगें ह्यांचे दृश्य अवर्णनीय आहे. रस्त्याच्या उजवाकडील पर्वतावर तुरळक सुरूंचे वृक्ष दिसतात, परंतु अलकनंदेच्या पलीकडील पर्वतांच्या रांगा हिरव्यागार झुडपांनीं आच्छादिलेल्या असून त्या रांगांच्या पलीकडे रुपेरी हिमशृंगें दिसतात. येथून पुढचा रस्ता फक्त रेती व दगड यांनीं भरलेल्या उंच पर्वताच्या बाजूनें गेला आहे. अर्धा मैल पुढें गेल्यावर कोसळलेला

रस्ता लागला. येथें पूर्वी रस्ता होता किंवा नाहीं ह्याचीच भ्रांति पडते. फक्त रेतीचे ढीग व मोठाले दगड जिकडे तिकडे दिसले. दोन पुरुष खालीं पाताळ-गंगेचा प्रवाह दिसतो. हे ढीग व दगड बाजूस सारून तेथून रस्ता तयार करण्याचे काम चाललें होतें. व ह्या ढिगांच्या वरच्या बाजूनें एक फूट रुंदीची नागमोडी पाऊलवाट खालीं गेली होती. जरा खालीं आल्यावर बालकुची नांवाचा ओढा पक्क्या पुलावरून ओलांडला. येथून पुढचा अर्ध्या मैलाचा रस्ता सर्व कोसळला होता व तो दुरुस्त करण्याचें काम चालू होतें व जरा वरून दोन पावलांची पायवाट तात्पुरती तयार केली होती. ह्या व ह्याच्या पूर्वीच्या अरुंद पायवाटेने आमच्यासह दंडी मोठ्या शिताफीनें दंडीवाल्यांनीं पलीकडे नेली. केवळ परमेश्वरकृपेनें ह्या तुटलेल्या पहाडांतून सुरक्षित पार पडलों असें वाटलें. ह्या रेताळ दगडी पहाडाचे बाजूनें जरा खालीं आल्यावर पातळगंगेवरील लोखंडी गर्डर्सचा झुलता पूल ओलांडावा लागतो. पुलाच्या उजवीकडे पाताळगंगेचें पात्र बरेंच रुंद आहे. परंतु पुलाखालून जाण्यापूर्वी तें अरुंद होत गेलें आहे. पाताळगंगा पूर्वेकडून पांढऱ्या दगडाच्या पर्वतांतून वाहात येतें. पात्र फार खोल नाहीं. लहानमोठ्या पाढऱ्या दगडातून वाहात येत असल्यामुळें ह्या नदीचें पाणी पातळ चुन्याप्रमाणें पाढरें दिसतें. पाताळगंगाही बरीच पुढें अलकनंदेस मिळतें. येथें पुलाच्या पलीकडे दोन तीन चट्ट्या आहेत. पुलाच्या पलीकडे मोठा अश्वत्थ-वृक्ष ( पिंपळ ) आहे. ह्या वृक्षाखालीं थोडी विश्रांति घेऊन पुढच्या रस्त्याला लागलों. पुढें जातांना नगर जिल्ह्यांतील लोणी येथील दोन शेतकरी बद्रीनाथकडून परत आलेले भेटले. हे सर्व यात्रा पायांनीं करीत होते. येथून पुन्हां चढण सुरू होतें. एका बाजूस हिरव्यागार झुडपांनीं भरलेला पर्वत व दुसऱ्या बाजूस खोल दरींतून वाहाणारी अलकनंदा अशा रस्त्यानें चार फर्लांग गेल्यावर दगडांनीं पसरलेल्या पर्वताच्या बाजूनें पर्वताच्या माथ्यावर पसरलेली **गुलाबकोटी** चट्टी लागली. येथें बाराचे सुमारास आलों. गुलाबकोटी पाताळगंगेपासून साडेसहा मैल आहे. येथें दोन वाजेपर्यंत विश्रांति घेतली. पुढचा रस्ता मोठ्या दगडी कड्याच्या बाजूनें गेला आहे. उजव्या बाजूस अलकनंदा पांच सहा पुरुष खोल दरींतून वाहाते. दरीच्या बाजूला दीडदोन फुटांचा बांध घातलेला आहे. सहाव्या मैलानंतर सरळ रस्त्यास सुरवात होते. येथून अलकनंदा बरीच पलीकडे राहते. रस्त्याच्या दोन्ही बाजूंस रानतुळशी, झेंडू, दवणा, मरवा व इतर रानटी फुलझाडांचीं गर्द झुडपें असून त्यांचा गोड स्वाद येत असतो.

ह्या सरळ रस्त्यानें **कुम्हारचट्टी** अथवा हेलंग येथें अडीचचे सुमारास आलों. **हेलंग** ६००० फूट उंचीवर आहे. येथून एक पाय-रस्ता ( पगदंडी ) अलकनंदेच्या पलीकडे असलेले **कल्पेश्वर** ( पंचमकेदार ) येथें जातो. कल्पेश्वर हेलंगच्या समोर आहे. रेडारूपी शिवाच्या जटा येथें आहेत, अशी समजूत आहे. हेलंग येथून अर्धा मैल खालीं **वृद्धबद्री** ( पंचमबदरी ) हें देवस्थान आहे. तीन वाजेपर्यंत हेलंग येथें विश्रांति घेऊन पुढे जाण्यास सुरवात केली. पुढें रस्ता सरळ गेला आहे. आठव्या मैलाच्या सुरवातीस उजवीकडील दोन पर्वतांच्या दरीमधून आलेली नदी पक्क्या पुलावरून ओलांडल्यानंतर उंच पर्वताच्या कड्याच्या बाजूनें थोडा चढाव लागतो व अलकनंदा ह्या रस्त्यानें दुसऱ्या बाजूला खोल दरींतून वाहातांना दिसते. जरा पुढें गेल्यावर थोडी उतरण आहे व येथून रानतुळशी व इतर हिरव्यागार झुडपांनीं भरलेल्या पर्वतांच्या टेकड्यांमधून हेलंगपासून एक मैलावर असलेल्या **खामेटी** चट्टीवर आलों. येथून दीड मैल पुढें गेल्यावर पर्वताचे माथ्यावर चारचे सुमारास आलों. येथें **झडकुला** चट्टी आहे. ह्या ठिकाणावरून भोंवतालचा खोल दऱ्या व पर्वतांचा देखावा फारच प्रेक्षणीय आहे. येथें एका स्वच्छ चट्टींत मुक्काम केला. संध्याकाळपर्यंत आजूबाजूचा सुंदर देखावा पहात फेरफटका करून मुक्कामाचे जागीं आलों. दूध घेतलें. आकाश निरभ्र असल्यामुळें शुभ्र चांदण्यांत भोंवतालचा रम्य देखावा पुन्हां अवलोकन करून चट्टींत येऊन झोपीं गेलों.

## सोमवार ता. २४ जुलै १९३९, दिवस ४४ वा.

झडकुला येथून सकाळीं साडेपांच वाजतां निघालों. सुमारें चार फर्लांगपर्यंत रस्ता सरळ असून एके बाजूस कांहीं ठिकाणीं मोठाले खडक व कांहीं ठिकाणीं हिरवींगार झुडपें यांनीं भरलेल्या खडकाळ पर्वताच्या टेकड्या आहेत. व दुसऱ्या बाजूस अलकनंदा खोल दरींतून वाहात आहे. चौथ्या फर्लांगानंतर चढावयास सुरवात होते. येथें अलकनंदेपलीकडील उंच पर्वतावरून खालीं येणारा शुभ्र पाण्याचा मोठा प्रवाह अलकनंदेस मिळतो. पांचव्या फर्लांगापासून रस्त्याच्या एका बाजूस उंच वृक्षांनीं भरलेला पर्वत व दुसऱ्या बाजूस अलकनंदा वाहात आहे. अलकनंदेच्या पलीकडे तांबूस रंगाच्या दगडाचा पर्वत आहे. ह्या एक मैल चढणीनंतर रस्ता **स्युंगधारा** चट्टीस येतो. ही चट्टी स्युंगधारा पहाडावर बसलेली आहे. अलकनंदेच्या पलीकडे असलेला तांबूस

खडकाचा पर्वत येथून मोठ्या हत्तीची पाठ व मागच्या भागाप्रमाणें दिसतो. ह्या हत्तीप्रमाणें दिसणाऱ्या पर्वताचा सोंडेसारखा भाग पुढें विष्णुप्रयाग-जवळ आहे. ह्या पर्वतास इंद्राचा ऐरावत म्हणतात. स्युंगधारा येथील घरें व चट्ट्या रस्त्याच्या बाजूला सुमारें दोन फर्लांगपर्यंत आहेत. स्युंगधारा येथें सहाचे सुमारास आलों. येथून रस्त्याच्या दोन्ही बाजूंस रानतुळशी, झेंडू, मरवा, दवणा व इतर रानटी वनस्पतींचीं झुडपें आहेत. कांहीं ठिकाणीं कोबी, अलकोल, कॉलीफ्लावर वगैरे थंड प्रदेशांत होणाऱ्या भाजीपाल्याचे मळेहि दिसतात. ह्या मळ्यापासून एक रस्ता जरा वर असलेल्या जोशी मठ येथील पब्लिकवर्क्स इनस्पेक्शन बंगल्याकडे जातो. स्युंगधारा व जोशीमठ ह्या दोन ठिकाणामध्यें मोठा पहाड असल्यामुळें येथून जोशीमठाची वस्ती दिसत नाहीं. परंतु ह्या पहाडास वळसा घातल्यानंतर एकदम जोशीमठ दिसूं लागतें.

## जोशीमठ.

जोशीमठ पाताळगंगेपासून सुमारें सहा मैल आहे. येथें सुमारें सात वाजत आलों. समुद्रसपाटीपासून ६००० फूट उंचीवर असलेलें हें ठिकाण गंधमादन पर्वतावर आहे. येथें सुमारें २५० घरें व शिलाजीत, कस्तुरी, वनगाईचे केस,



जोशीमठ.

व्याघ्रचर्म, कस्तुरीमृगाजिन, मणी, हिमालयांतील वनौषधी वगैरेंचीं बरींच मोठमोठीं दुकानें आहेत. " कैलासकीर्ति आश्रम " नांवाचे हिमालयांतील

औषधी विकण्याचें मोठें दुकान आहे. बाजारांत पोष्ट व टेलिग्राफ ऑफिस आहे. गांवांत हिंदी प्राथमिक शाळा आहे व मिड्लस्कूल, सरकारी हॉस्पिटल व दवाखाना, पोलिस हेडक्वार्टर्स् ह्या इमारती पहाडाचें वरच्या बाजूस आहेत. अहमदाबादचे गोविंद शंकर वेनी यांनीं काळीकमलीवाला संस्थेच्यामार्फत येथें मोठी धर्मशाळा बांधून त्या धर्मशाळेंत सदावर्त ठेविलें आहे. गांवांत श्रीनृसिंह, वासुदेव; गरुडभगवान, नवदुर्गा, शाकंबरी वगैरे देवालयें आहेत. मुख्य देवळाचे भोंवतीं रावळजींचा वाडा आहे. कार्तिक पौर्णिमेपासून वैशाख शुद्ध तृतीयेपर्यंत (अक्षय्यतृतीया), म्हणजे पट बंद होऊन खुलेपर्यंत, ज्या वेळीं बद्रीनाथ व त्याच्या आजूबाजूचा प्रदेश बर्फाच्छादित असतो, त्या कालांत, बद्रीनाथाची पूजा येथील नृसिंहाचे मूर्तीवर होते. व त्या काळांत रावळजी व बद्रीनाथांची नोकर मंडळी जोशीमठ येथें राहतात. मुख्य देवळाचे चौकांत डावीकडे दोन पितळी



**जोशीमठाच्या पुढें नीतीरस्त्यावरून दिसणारें पवित्र कैलास-शिखराचें दृश्य.**

हस्तिमुखांतून मोठ्या पाण्याच्या धारा सतत वाहात असतात. ह्या धारांस दंडधारा म्हणतात. ह्या धाराखालीं स्नान करून तर्पण करतात. धारेखालीं स्नान व तर्पणाबद्दल तेथें बसलेल्या पंड्यास एक आणा दिला तरी तो खूष होतो.

जोशीमठाचे वरच्या पहाडांतून कैलास पर्वत व मानससरोवराकडे रस्ता गेला आहे. हीं ठिकाणें येथून १२५ मैल आहेत. हा रस्ता नीती खिंडीतून (Niti Pass) भूतान व तिबेटमधून गेला आहे. जोशीमठपासून ह्या रस्त्यानें थोडेसें पुढें गेलें असतां कैलास पर्वताच्या (Mount Everest) शिखराचें दर्शन होतें. येथून दुसरा रस्ता आठ मैलांवर असलेल्या **तपोवन** अथवा **भविष्यबद्री** येथें गेला आहे. गांवापासून पुढें जाणाऱ्या रस्त्याच्या डाव्या हातास पर्वताच्या टेकडीवर सुमारें एक मैल उंचीवर आद्य शंकराचार्यांनीं स्थापिलेल्या ज्योतिर्मठ येथील त्यांच्या गादीचें ठिकाण आहे. तेथें हल्लीं ज्योतेश्वर महादेव व भक्तवत्सल भगवान् अशीं दोन देवळें मात्र आहेत. एक छोटीशी धर्मशाळा व जवळ सुंदर पाण्याचा झरा आहे. भोंवतालीं दाट झाडी असून सृष्टिसौंदर्याची शोभा उत्कृष्ट आहे. चौकशीअंतीं असें कळलें कीं, हल्लींचे रावळजी ह्या ठिकाणाकडे फारसें लक्ष देत नाहींत. महिन्यांत एक दिवस म्हणजे संक्रांतीची पूजा रावळजींचा ब्राह्मण नोकर येथें येऊन करतो. असें सांगतात कीं बरेंच वर्षांपूर्वींपर्यंत आद्य शंकराचार्यांची येथील वंशपरंपरा शृंगेरी, द्वारका वगैरे पीठाप्रमाणेंच चालू होती. परंतु त्या काळीं पीठावर असलेले एक शंकराचार्य, शिष्य नेमण्यापूर्वीं मरण पावले. त्यानंतर शिष्याच्या नेमणुकीसंबंधांत बऱ्याच भानगडी होऊन दरम्यान कांहीं अनधिकारी लोकांच्या ताब्यांत ह्या पीठाची व्यवस्था गेली. त्यानंतर कांहीं कालानें दंडीस्वामी नांवाचे विरक्त पुरुषांच्या ताब्यांत हें पीठ होतें. व बदरीनाथची व्यवस्थाहि त्या काळांत ह्यांच्या मार्फत चालत असल्यामुळें टेहरी–गहरवालच्या त्या वेळच्या राजाकडून ह्यांना 'रावळ' ही पदवी मिळाली. ह्या स्वामींच्या नंतरचे रावळ पुढें बदरीनाथची व्यवस्था पाहूं लागले. पुढें म्हणजे इ. स. १८०३ मध्यें नेपाळच्या राजानें टेहरी–गहरवालवर स्वारी करून हा सर्व प्रांत काबीज केला. नंतर इ. स. १८१५ मध्यें इंग्रजांनीं नेपाळच्या राजाबरोबर लढाई करून हा प्रांत काबीज केला व त्याचे टेहरी–गहरवाल व ब्रिटिश–गहरवाल असे दोन भाग केले व त्यांपैकीं टेहरी–गहरवाल हा भाग टेहरीच्या राजाच्या स्वाधीन केला. दरम्यानच्या काळांत भोळ्याभाबड्या यात्रेकरूंकडून लक्षावधि रुपये हातीं येत असल्यामुळें व कोणी विचारणारा नसल्यामुळें हे रावळ स्वतंत्र बनले. आद्य शंकराचार्यांच्यामुळें आपणास ही स्थिति आली ही गोष्ट

ते विसरून गेले व त्यामुळें त्यांनीं हिमालयांतील शंकराचार्यांच्या ज्योति मठास बिनवारशी मत्तेसारखी हल्लींची स्थिति आणली. बदरीनाथ येथें व



विष्णुप्रयाग.

त्याच्या आजूबाजूला बर्फ पडूं लागल्यावर त्या बाजूचे सर्व पहाडी लोक जोशीमठ व जरा पुढें असलेले पंडुकेश्वर येथें येऊन राहतात. जोशीमठाच्या जरा वर गेलें असतां एके बाजूस कैलास पर्वताचें उंच शिखर व दुसऱ्या बाजूला बदरीनाथ व त्याचें जवळच असलेलें केदारनाथ, गंगोत्री, त्रिशूळ वगैरे हिमशृंगांच्या एकामागून एक लागलेल्या पर्वतांच्या रांगा पहात असतां त्या ठिकाणाहून हलूं नये असें वाटतें.

हा सर्व देखावा पाहून मुख्य देवळासमोरच्या चट्टींत उतरलों होतों तेथें परत येऊन दंडधारा तीर्थाचें स्नान केलें. देवळांतील मूर्तींचें दर्शन घेतलें. चट्टींत येऊन पूजा, पोथी, जेवण वगैरे आटोपलें व तीनचे सुमारास जोशीमठ येथून निघालों. एक मैल सहा फर्लांगाच्या नागमोडी खड्या उतरणीच्या रस्त्यानें **विष्णुप्रयाग** येथें आलों. भूतानकडून आलेली विष्णुगंगा येथें मंदाकिनीस मिळतें म्हणून ह्या ठिकाणास विष्णुप्रयाग म्हणतात. येथें विष्णुगंगेवरील लोखंडी तारांनीं बांधलेला लाकडी झुलता पूल ओलांडावा लागतो. पुलापासून वीस फूट पलीकडे विष्णुगंगा अलकनंदेस मिळते. पुलाच्या उजवीकडून येणाऱ्या विष्णुगंगेचा प्रवाह इतक्या जोराचा आहे कीं, त्यावर नजर ठरत नाहीं. पुलाच्या सुरवातीस असलेल्या मोठमोठ्या खडकांवर ह्या जोराच्या प्रवाहाचे पाणी आदळून त्याचे तुषार पुलावर येत असतात. पुलाच्या पलीकडे विष्णूचें लहानसें देऊळ आहे. जवळच एक दुकान व एक लहान चट्टी आहे. देवळाचे मागें संगमावर उतरण्याकरितां खडकांत खोदलेल्या पायऱ्यांचा लहान घाट आहे. ह्या ठिकाणीं दोनचे सुमारास आलों. डावीकडील उंच खडकाळ पर्वत हत्तीच्या सोंडेसारखा दिसतो. येथून अलकनंदा दोन उंच खडकाळ पर्वतांमधून वाहात जाते. ह्या पर्वतांपैकीं उजव्या बाजूच्या उंच कड्याच्या कडेनें रस्ता पुढें गेला आहे. दोन ठिकाणीं कड्यावरून खालीं पडणारे शुभ्र पाण्याचे प्रवाह दिसले. एक मैल पुढें गेल्यावर अलकनंदेवरील लाकडी पूल ओलांडावा लागला. पुलाच्या पलीकडे **बलदोरा** चट्टी आहे. येथें दोन दुकानें व नवीन बांधलेली काळीकमलीवाल्याची धर्मशाळा आहे. सातव्या मैलानंतर कड्याच्या बाजूचा रस्ता अरुंद असून बाजूला खोल दरींतून अलकनंदा वाहाते. चार फर्लांग पुढें उजवीकडील दोन पर्वतांमधून येणारी एक नदी अलकनंदेस मिळते. येथे डोक्यावर केसांचा झुपका असलेले मोठे वानर कड्यावर चढतांना दृष्टीस पडले. येथून पुढें रस्ता राजगिऱ्याच्या

शेताच्या बाजूनें गेला आहे. दोन फर्लांग पुढें **घाटचट्टी** आहे. येथें पांचचे सुमारास पोहोंचलों. येथून जरा पुढं गेल्यावर शुभ्र पाण्याचा धबधबा दिसला अर्धा फर्लांग पुढें दोन पर्वतांमधून आलेली नदी आहे. येथें पहाडी लोकांच्या उपयोगाकरितां तारेचे दोन पूल अलकनंदेवरून पलीकडे जाण्याकरिता केलेले आहेत. पुढच्या रस्त्याच्या दोन्ही बाजूस रानतुळशी व इतर वनस्पतींचीं झुडपें आहेत. येथें अलकनंदेचा प्रवाह इतका जोराचा आहे कीं, त्या प्रवाहाचे तुषार रस्त्यावर येत असतात. येथून पुढें येणाऱ्या पंडुकेश्वर येथील देवालयाच्या समोर असलेल्या पर्वतावरील पांडवशिला दिसूं लागते. येथून पंडुकेश्वरपर्यंत साधारण चढाव आहे. रस्त्याचा कांहीं भाग राजगिऱ्याच्या शेतांच्या बाजूनें व कांहीं भाग मोठमोठ्या खडकांच्या बाजूनें गेला आहे. बलदौरा व पंडुकेश्वर ह्यांच्या दरम्यान **लोकपाल** नांवाचे क्षेत्र आहे. हें प्राचीन कालचें महत्त्वाचें क्षेत्र पंडुकेश्वरपासून बारा मैल आहे. त्याचा रस्ता चढणीचा असून फार अवघड आहे. तेथें लक्ष्मण व वसिष्ठ यांचीं देवळें, काकभृशण्डीचा आश्रम व थोड्या गुंफा आहेत. ह्या स्थळाच्या सभोंवतीं हिमाच्छादित उंच पर्वतांचीं सात शृंगे असून त्यांमध्यें स्वच्छ आणि मधुर पाण्याचे सुंदर सरोवर आहे. ह्या सरोवराचा मध्यभाग सुंदर कमळांनीं भरलेला आहे. ह्या सरोवरा भोंवतालची अनेकरंगी प्रफुल्लित हिरवीगार झुडपें व बर्फाच्छादित अनेक ठिकाणांवरून कडाडत जाणारे शुभ्र जलप्रवाह ह्यांचें अनुपम सृष्टिसौंदर्य अवर्णनीय आहे. हिमालयांतील अलौकिक सृष्टिसौंदर्याचे लोकपाल हें तिसरे देवालय आहे. गुरु गोविंदसिंग ह्यांनीं त्यांच्या पूर्वावतारांत, मार्कंडेय पुराणांतील दुर्गा सप्तशतीचे प्रसिद्ध ऋषि मेधा ह्या स्वरूपांत, ह्या ठिकाणीं महान् तपश्चर्या केली होती असें गुरु गोविंदसिंग यांनीं स्वतः सांगितलें असल्यामुळें शीख धर्माच्या मतें लोकपाल हें ठिकाण फार महत्त्वाचें मानलें जातें.

## पंडुकेश्वर.

**पंडुकेश्वर** येथें सातचे सुमारास आलों. येथें दहापंधरा दुकानें, तीसचाळीस घरें व काळीकमलीवाल्यांची धर्मशाळा व सदावर्त आहे. पुढें जाणाऱ्या यात्रेकरूंस जरूर असल्यास ह्या धर्मशाळेचे चौकीदाराकडून ब्लँकिटें मिळतात. येथें परत आल्यावर तीं चौकीदारास परत करावीं अशी व्यवस्था आहे. एका दुकानाचे माडीवर मुक्कामास उतरलों. येथें ध्यानबदरीचें

देऊळ आहे. देवळांत श्रीविष्णूची ध्यानस्थ काळ्या दगडाची मूर्ति आहे. हें देऊळ बदरीनाथचे रावळजी यांचे ताब्यांत असून त्यांचे मार्फतीनें येथें एक तरुण नांबुद्री ब्राह्मण पुजारी असतो. शेजारीं दुसऱ्या देवळांत कृष्ण पाषाणाची लक्ष्मीची मूर्ति आहे. ध्यानबदरी ( विष्णु ) चे देवळांत चार जाड ताम्रपट आहेत. पुजाऱ्यानें असें सांगितलें कीं येथें पांच ताम्रपट होते. परंतु त्यांपैकीं एक बरेंच वर्षांपूर्वी लंडन येथील ब्रिटिश म्यूझियममध्यें सरकार मार्फत पाठविण्यांत आला. हे ताम्रपट बरेंच जाड आहेत. ह्या ताम्रपटावरील लेखांतली क ग वगैरे अक्षरें ओळखतां येतात. बाकीचीं अक्षरें कोणत्या लिपींत आहेत हें ओळखतां येत नाहीं. ह्या देवळासमोरच्या उंच पर्वतावर चौकोनी शिखर आहे. ह्या शिखरावर चौकोना दगडी शिलेचा आकार दिसतो त्या शिलेस **पांडवशिला** म्हणतात. ह्या शिलेवर पांडवांच्या वेळेचा लेख आहे असें सांगतात. पंडुकेश्वर येथें पहाडी रजपुतांची वस्ती आहे.



**पंडुकेश्वर.**

येथील पुरुष व बायकांचा रंग गोरा असून बांधणी उंच असते. बायका उंच सडपातळ, सुंदर चेहेऱ्याच्या परंतु फुगीर गालाच्या आहेत. त्यांच्या गालावर गुलाबी छटा दिसते. पुरुष दुकानदाराचा व बायका शेती वगैरे काबाडकष्टाचा धंदा करतात. अलीकडच्या दोन तीन पिढ्यांतील

बदरीनाथाच्या रावळांनीं येथील रजपूत स्त्रियांशीं शरीरसंबंध करण्यास सुरवात केल्यापासून येथील कांहीं रजपूत कुटुंबें शेतकी करणें, लाकडें वहाणें वगैरे काबाडकष्टाचे धंदे सोडून व्यापारी बनलीं आहेत. येथील रजपूत बायकांस रावळापासून झालेल्या प्रजेपैकीं कांहीं मुलगे आपल्या नांवापुढें नाबुद्री हें उपनाव लावतात असें सांगतात. पंडुकेश्वर ह्या ठिकाणासंबंधीं बदरी माहात्म्यात अशी कथा सांगितली आहे कीं द्वापारयुगांत ह्या ठिकाणी मृगरूपानें आपल्या स्त्रीशीं क्रीडा करीत असणाऱ्या एका ऋषीस पंडुराजानें शिकार करताना बाण मारून घायाळ केलें. तेव्हां त्या ऋषीनें मरते वेळीं पंडुराजास असा शाप दिला कीं तूं आपल्या स्त्रीशीं रत होशील तर त्याच-वेळीं तुला मरण येईल. हा शाप निवारणार्थ पंडूनें ह्या ठिकाणीं तपश्चर्या केली. तेव्हा विष्णु भगवानानें प्रसन्न होऊन पंडूस वर दिला कीं, तुला धर्मादि पुत्र होतील व ते सर्व पुत्र आत्मज्ञानी व सर्वशास्त्रपारंगत असे होतील. भगवान् विष्णूचा हा वर ऐकून पंडुराजानें आपणास कृतकृत्य मानून येथें विष्णूच्या मंदिराची स्थापना केली व तेव्हांपासून ह्या ठिकाणास ध्यान-बदरी हें नाव पडलें. देवळासमोरच्या पर्वतशिखरावरील पांडवशिलेसंबंधानें पुराणांत असा उल्लेख आहे कीं पांडवांनीं स्वर्गारोहणाच्या वेळीं ह्या ठिकाणीं कांहीं दिवस वस्ती केली होती व पुढें जातांना ह्या शिलेवर कांहीं लेख लिहून ठेविला आहे. देवळें, ताम्रपट व आजूबाजूची वनशोभा पाहून मुक्कामावर आलों, दूध घेतलें व झोंपीं गेलों.

## मंगळवार ता. २५ जुलै १९३९, दिवस ४५ वा.

सकाळीं दुकानाजवळ असलेल्या नळाखालीं स्नान करून योगबदरी व लक्ष्मी ह्या मूर्तींचें दर्शन घेतले. मुक्कामावर येऊन पूजा, पोथी, जेवण उरकलें व बाराचे सुमारास पंडुकेश्वर येथून निघालों. येथून चढणीस सुरवात होते. येथून पांडवशिला असलेले शिखर हुबेहुब चौकोनी बुरुजाप्रमाणें दिसतें. सुमारें एक मैलपर्यंत रस्त्याच्या दोन्ही बाजूंस राजगिऱ्याचीं व भाताचीं शेतें आहेत. नंतर रस्त्याच्या डावीकडे खडकाळ पर्वत आहे. पुढें ह्या पर्वताकडून मोठ्या पांढऱ्या दगडात वाहाणारी नदी लाकडी फळ्यांच्या पुलावरून ओलांडावी लागते. ही नदी रस्त्याच्या उजवे बाजूस अलकनंदेस मिळते. येथून जरा वरच्या बाजूस असलेल्या पंडुकेश्वर येथील पब्लिक वर्क्स इन्स्पेक्शन बंगल्यास रस्ता आहे. पुढच्या रस्त्याच्या डावीकडे हिरव्यागार झाडपानी भरलेला पर्वत व

उजवीकडे अलकनंदा आहे. एक मैल पुढें गेल्यावर मोठ्या वृक्षांचें दाट जंगल लागतें. सुमारें अर्ध्या मैलाच्या ह्या दाट जंगलातून बाहेर पडताच, बऱ्याच दूरच्या पर्वताकडून येणारी एक मोठी नदी व अलकनंदा ह्यांचा संगम आहे. दोन फर्लांग पुढे गेल्यावर रस्त्याचा डावीकडे मोठा धबधबा आहे. ह्या धब-धब्यास **शेषधारा** म्हणतात. ह्या धबधब्याचा उजवीकडे अलकनंदेस मिळ-णारा प्रवाह लाकडी फळ्यांच्या पुलावरून ओलांडल्यानंतर शेषधारा चट्टी लागते. येथून पाऊण मैलावर अलकनंदेच्या काठीं वैष्णवांचा आश्रम आहे. येथून पुन्हा दाट जंगल एक मैलपर्यंत आहे. ह्या जंगलांतून बाहेर पडतांच रेताळ दगडी पर्वताच्या बाजूनें रस्ता जातो. येथे रस्ता फारच अरुंद व अव-घड आहे व वरून रेती व देगड खाली येऊन केव्हा रस्त्यावर पडतील ह्याचा नेम नसल्यामुळे हा रस्ता फार सावधगिरीने परंतु जलद ओलाडावा लागतो. हा रस्ता नुक्ताच दुरुस्त केलेला दिसला. पुढचा एक फर्लांग रस्ता मोठमोठ्या खडकामधून गेला आहे. येथें अलकनंदा सुमारे अर्धा पुरुष उंचीच्या खडका-वरून खालीं उडी घेते व येथे पाण्याचे तुषार रस्त्यावर येऊन रस्ता पाऊस पडल्यासारखा भिजलेला असतो. नंतर हिरव्यागार वनस्पतीच्या झुडपांनीं भर-लेल्या पर्वताची नागमोडी चढण लागते. डावीकडील दोन पर्वतांमधून येऊन अलकनंदेस मिळणारी मोठी नदी येथे लाकडी फळ्यांच्या पुलावरून ओलां-डावी लागते. ही नदी ओलाडून पुलाच्या पलीकडे असलेल्या **लामबगड** चट्टीस दीडचे सुमारास आलो. चट्टीपासून धर्मशाळा जरा दूर असून अगदीं अलकनंदेच्या कांठावर आहे. चट्टया बऱ्याच आहेत. चट्टयाच्या मागचे पहा-डावर पुष्कळ ठिकाणीं बर्फाचे थर दिसतात. ह्या पहाडावरील बर्फामधून शुभ्र पाण्याचे प्रवाह खालीं येताना दिसतात. लामबगडच्या समोर देवदार (Pine) वृक्षांनीं भरलेल्या, पर्वतांच्या रांगा असून त्यांच्या पायथ्याशीं ‘ सोहं सोहं ’ आवाज करीत मंदाकिनीचा प्रवाह, मागच्या बाजूस बर्फाच्छादित पर्वताचे आकाशास लागून दिसणारे सरळ कडे व त्यांवर होत असलेली मेघगर्जना, असा हा भव्य देखावा पाहात असतां आपण सृष्टिसौंदर्याच्या गडावर असून त्या गडाजवळ तोफांची सरबत्ती चालू असावी असा भास होतो. लामबगडपासून पुढे काळ्या दगडांनीं भरलेल्या उंच पर्वतांच्या मधून रस्ता गेला आहे. ह्या पर्वतांची शिखरें बर्फाच्छादित दिसतात. अलकनंदा रस्त्याच्या बाजूनें वाहाते. येथपासून अलकनंदेच्या प्रवाहांत ठिकठिकाणीं पाढऱ्या खडकासारखे दिसणारे

बर्फाचे मोठमोठे थर(Glaciers)दिसतात. पुढे थोडें वर गेल्यानंतर रस्त्याच्या दोन्ही बाजूंला रानगुलाब, तुळशी व इतर रंगीबेरंगी फुलांच्या हिरव्यागार झुडपांनीं भरलेल्या पर्वताच्या टेकड्या आहेत. ह्या ठिकाणीं राजा युधिष्ठिरानें तपश्चर्या केली होती असें सांगतात. कैलास पर्वतांत उगम पावलेली ऋषिगंगा व अलकनंदा ह्यांचा संगम येथें आहे. ऋषिगंगेवरील लाकडी फळ्यांचा पूल ओलांडल्यानंतर रस्ता **हनुमानचट्टी** येथें येतो. पांडव अलकापुरीस जात असतांना भीमसेनास आपल्या शक्तीचा फार गर्व झाला. तेव्हां हनुमानानें आपलें पुच्छ येथें टाकून त्यांना अडविलें. भीमसेनानें तें पुच्छ उठविण्याचा प्रयत्न केला, परंतु त्याला तें दूर करतां आलें नाहीं; तेव्हां त्यानें हनुमानाची करुणा भाकिली व नंतर हनुमानानें आपलें पुच्छ उचलून पांडवांस रस्ता दिला. ह्या पुराणांतील कथेवरून ह्या ठिकाणास हनुमानचट्टी हें नांव पडलें आहे. येथें हनुमानाचें व महावीराचें अशीं दोन देवळें असून काळीकमलीवाल्याची धर्मशाळा व सदावर्त आहे. येथें पांचचे सुमारास पोहोंचलो. हनुमानचट्टीच्या वरच्या बाजूला पहाडांत **वैखानस** नांवाचें तीर्थ आहे. ह्या तीर्थाच्या आसपास अद्यापहि कधीं कधीं ज्वाळा निघतांना दिसतात. बदरीमाहात्म्यांत ह्या तीर्थाजवळ दिसणाऱ्या ज्वाळांचा उल्लेख सांपडतो. पंडा दौलतराम, ज्यानें आम्हांस हरद्वार येथेंच गांठलें होतें व माहीतगार नोकरहि पाहून दिला होता, तो आज दुपारपासून येथें येऊन आमची वाट पाहात बसला होता. आम्ही काल पंडुकेश्वर येथें आल्याची बातमी त्याला इतर यात्रेकरूंकडून कळली होती. काळीकमलीवाल्याच्या धर्मशाळेंत माडीवरच्या खोलींत मुक्काम दिला. पंडा दौलतराम यानें तेथें येऊन झेंडू व इतर रानटी फुलांची माळ गळ्यांत घालून आमचें स्वागत केलें व श्रीबदरी विशालाचे देवालयानजीक एका माडीवर स्वतंत्र खोली तुमच्याकरितां राखून ठेवली आहे असें सांगितलें. " आजची रात्र येथें काढून उद्यां नऊचे सुमारास बदरीनाथास येऊं असें त्याला सांगितल्यानंतर तो बदरीनाथ येथें परत गेला. कारण बदरीनाथ हनुमानचट्टी येथून अवघें साडेतीन मैल आहे. पंडुकेश्वरपासून थंडी बरीच भासूं लागली होती. येथें त्याहिपेक्षां अधिक थंडी होती. कुलीस व नोकरास धर्मशाळेच्या चौकीदाराकडून घुस्से ( Rugs ) मिळाली. येथेंहि आजूबाजूचा देखावा प्रेक्षणीय आहे. तो पाहून व हनुमान व महावीर ह्या मूर्तींचे दर्शन घेऊन खोलींत आलों, दूध घेतलें व झोपीं गेलों.

## बुधवार ता. २६ जुलै १९३९, दिवस ४६ वा.

सकाळीं साडेपांच वाजतां हनुमान चट्टी येथून निघालों. पुढें एक मैलपर्यंत रस्ता कांहीं ठिकाणीं गुलाब, तुळशी व इतर रानटी फुलांचीं झुडपें असलेल्या काळ्या दगडानें भरलेल्या पर्वताच्या बाजूनें जातो. डावीकडे वाहात असलेल्या अलकनंदेस तिच्या पलीकडील पर्वतावरून तिची भेट घेण्याकरितां येत असलेल्या शुभ्र बर्फाच्या नद्या ( Cataracts ) ठिकठिकाणीं दिसतात. येथें घोरसील नांवाचा लोखंडी पूल अलकनंदेवरून पलीकडे जाण्याकरितां आहे. हा पूल ओलांडल्यानंतर अलकनंदा बऱ्याच खोल दरींतून रस्त्याच्या उजवीकडून वाहाते. दरी फारच खोल असल्यामुळें रस्त्याच्या बाजूला दीड फूट उंचीचा दगडी बांध बांधलेला आहे. नंतर तिसऱ्या मैलाचे सुरवातीस राडंग नांवाच लोखंडी पूल ओलांडून रस्ता अलकनंदेच्या उजवीकडे येतो. पाऊण मैल पुढें गेल्यानंतर रस्त्याचे उजवीकडे पांढऱ्या खडकाळ पर्वतावरून येणारी कांचनगंगा लोखंडी पुलावरून ओलांडावी लागते. येथपासून पुढें चढावास सुरवात होते. येथून रस्ता रेताळ व खडकाळ पर्वताच्या बाजूनें गेला असून तो फारच अरुंद आहे. रस्त्याचे डावीकडे अलकनंदेंत शुभ्र बर्फाच्या मोठ्या शिळा (Glaciers) व मध्यें कोठें कोठें पाणी दिसतें. पर्वतावरून रेती अगर दगड रस्त्यावर केव्हां



देवदेखणी येथून दिसणारें बदरीनाथपुरीचें दृश्य.

येतील याचा नेम नसतो. नंतर वर मोठी सपाटी असलेल्या हिरव्यागार पर्वताच्या बाजूनें नागमोडी चढणीस सुरवात होते. ह्या पर्वतावर राजा मरुतानें तपश्चर्या व मोठा यज्ञ केला होता. त्या यज्ञाचे वेळीं होमांत टाकलेले अर्धवट भाजलेले जव अद्यापपावेतों ह्या पर्वताचे सपाटीवर सांपडतात असें सांगतात. येथून थोडेंसें पुढें गेल्यावर बदरीनाथपुरा व पुरीच्या जरा वरच्या बाजूला असलल्या नाथांच्या देवालयाचे सोन्याच्या पत्र्याचे वाटोळे पारवे व त्यावरील सोन्याचा उंच कळस दिसूं लागतो. म्हणून ह्या ठिकाणास **देवदेखणी** म्हणतात. लाकडांचे भारे पाठीवर घेऊन वांकलेल्या फुगरट गुलाबी गालाच्या पंडुकेश्वर येथील सशक्त सुंदर स्त्रिया बदरीनाथपुरीकडे जातांना दिसतात. सुमारें तीन फर्लांग पुढें गेल्यावर अलकनंदेवरील लोखंडी पूल ओलांडावा लागतो.

**बदरीनाथपुरा**



## बदरीनाथपुरी.

नंतर जरा पुढें गेल्यावर अलकनंदेस येथें मिळणाऱ्या ऋषिगंगेवरील लाकडी फळ्यांचा पूल ओलांडतांच बदरीनाथपुरीच्या वस्तीस सुरवात होते. येथें गळ्यांत ढोल व हातांत तुतारी घेऊन कांहीं पहाडी लोक बसलेले असतात. यात्रेकरूंना पाहातांच ते ढोल कुटण्यास व तुतारी वाजविण्यास सुरवात करतात. येथें यात्रेकरूंभोंवतीं पंड्यांचा गराडा पडतो. पुलाचे

अलीकडे पंडा दौलतराम आम्हांस भेटला होता व तो आमचेबरोबर होता, त्यामुळें आमचेजवळ दुसरे पंडे आले नाहींत. कारण यात्रेकरूंबरोबर पंडा आहे असे कळल्यावर दुसरे पंडे त्या यात्रेकरूंजवळ येत नाहीत. पुरींत शिरतांन प्रथम सरकारी हॉस्पिटल व दवाखाना, पोलीसस्टेशन वगैरे रस्त्यापासून जरा उंचीवर आहेत. पलीकडच्या उंचसखल टेकड्यावरून काहीं धर्मशाळा, पब्लिक वर्क्स इन्स्पेक्शन बंगला व दुसरे काहीं लहान खासगी बंगले, प्राथमिक शाळा वगैरे इमारती आहेत. पुढे बाजाराचे सुरवातीस पोष्ट व टेलिग्राफ ऑफीस आहे. बाजारांतील रस्ता अरुंद परंतु क्षेत्रांतील रस्त्याप्रमाणे दगडांनीं बांधून काढलेला आहे. बाजार बराच मोठा आहे. हलवायाचीं व फराळाचीं दुकानेंहि बरींच आहेत. किराणा, कापडचोपड वगैरेंचींहि दुकानें आहेत. शिलाजीत, कस्तुरी, फोटो व संस्कृत वगैरे पुस्तकांचींहि दुकाने आहेत. धर्मशाळा, सदावर्ते, अन्नछत्रेंहि बरींच आहेत. शें सव्वाशे पंड्यांची घरे आहेत. हीं बहुतेक घरें दुमजली व कांहीं तीन मजली आहेत. बाजारात व इतर गल्लीकुचींत मिळून एकंदर साठ-सत्तर दुकाने असावींत. संस्कृत पाठशाळा, आयुर्वेदिक रुग्णालय (Hospital) व औषधालय वगैरेहि असून त्यांची व्यवस्था उत्तम आहे. पुरीच्या समोर असलेल्या नरपर्वताच्या पायथ्याशीं लायक साधुपुरुषांकरितां मुद्दाम बांधलेल्या काहीं कुटी आहेत. भोंवतालच्या पर्वतांच्या मध्यभागावरहि काहीं सत्पुरुषांच्या कुटी आहेत. ह्या क्षेत्रास वैष्णवक्षेत्र म्हणतात. पंचकेदाराप्रमाणें पंचबद्रिहि आहेत.—बद्रिनाथ (विशालबद्रि), योगबद्रि (पंडुकेश्वर), भविष्यबद्रि (तपोवन, जाशिमठपासून आठ मैल), वृद्धबद्रि (अर्त्रामठ), ध्यानबद्रि (सीलाग).

बदरीनाथपुरी अलकनंदेच्या पूर्वतीरावर आहे. बदरीनाथपुरीच्या पूर्वेस नर पर्वत व पश्चिमेस नारायण पर्वत असून ह्या पर्वताच्यामध्यें सुमारें तीन मैल लांब व दीड मैल रुंद दरींतील उंचसखल अशा उतरत्या सपाटीवर बदरीनाथ वसलें आहे. समुद्रसपाटीपासून हें ठिकाण १०,५०० फूट उंचीवर आहे. येथें साडेआठचे सुमारास पोहोंचलों. हवा स्वच्छ होती व धुकें नव्हतें, त्यामुळें पुरीच्या भोंवतालच्या शुभ्र हिमशृंगाची शोभा पाहून ह्या भूवैकुंठास येऊन पोहोंचल्याबद्दल एक प्रकारची धन्यता वाटत होती. पंडा दौलतराम यानें राखून ठेवलेल्या एका घराच्या माडीवरील स्वतंत्र खोलीत मुक्कामास उतरलों बदरीनाथ येथें सुखरूप पोहोचल्याची तार तारऑफिसांत पाठविली व घरची खुशालीहि

तारेनें विचारली. नंतर तप्तकुंडांत स्नानदान वगैरे उरकले व बदरीनाथाचे दर्शनास गेलों. तप्तकुंडाची माहिती पुढे दिलेल्या देवळाच्या माहितीनंतर दिली आहे. वस्तीपासून थोड्या उंच सपाटीवर बदरीनाथाचें मंदिर आहे.

बदरी–विशाल अथवा नर–नारायण ह्या अवतारासंबंधी पुराणात अशी कथा आहे की, सहस्रकवच नावाच्या राक्षसाचा वध करण्याकरिता भगवानानें नर–नारायण हे अवतार घेऊन ते आपली माता " मूता " सह बदरिकाश्रम येथे तपश्चर्येकरिता आले सहस्रकवचास भगवानाचा हा कृतनिश्चय कळताच त्याने येथें येऊन भगवानाबरोबर युद्ध सुरू केलें. हें युद्ध सहस्र वर्षे चालल्यानंतर ह्या घनघोर युद्धात सहस्रकवचाचा वध झाला. तेव्हापासून ऋषि नर–नारायण जगाचे संरक्षण, शांतता, सौख्य व चिरायुतेप्रीत्यर्थ बदरिकाश्रमात तपश्चर्या करीत आहेत. बोरीचे किंवा दुसऱ्या कोणत्याहि जातीचे झाड तोडले असता तें पुन्हां फोफावून वाढतें. त्याप्रमाणें भगवद्भक्ति. येथे " फाफाइली " म्हणून भगवंतानी या स्थानास " बदरिकाश्रम " नाव ठेविले असें खालील दिलेल्या श्लोकावरील एकनाथाच्या टीकेत लिहिलें आहे:—

गच्छोद्धव मयाऽऽदिष्टो बदर्याख्यं ममाश्रमम् ।
तत्र मत्पादतीर्थोदे स्नानोपस्पृशनैः शुचिः ॥

श्रीमद्भागवत, एकादशस्कन्ध, अध्याय २९, श्लोक ४१

ह्या श्लोकावरील श्रीएकनाथाच्या एकनाथी भागवतांतील कांहीं ओव्या पुढें दिल्या आहेत —

त्या बदरिकाश्रमाचे महिमान । लोकसंग्रहार्थ संपूर्ण । तरावया जड मूढ जन । स्वमुखें श्रीकृष्ण सांगत ॥८१॥ तो बदरिकाश्रम माझें स्थान । तेथ नित्य माझें अनुष्ठान । तया स्थानाचें दूर दर्शन । करी निर्दळण कलिकल्मशा ॥ ८२ ॥ ......येथेही माझें पादोदक । अलकनंदा पवित्र देख । जिचेनि स्पर्शमात्रे लोक । होती अलौकिक पावन ॥ ८४ ॥......रजोगुणें स्नाविलें जन । ते जाहले भोगकर्मी प्रवीण । भोगासक्ती बुडता पूर्ण । दोरूपी मी जाण अवतरलों ॥८७॥ ......भज्यपूज्यत्वें मी नारायण । नररूपें मीचि भक्त जाण । तेथ भक्ति वैराग्य ज्ञान । म्यां आचरोन प्रकाशिलें ॥ ८९ ॥ तो बदरिकाश्रम माझे स्थान । तेथें सर्वदां मी आपण । अद्यापि करितों अनुष्ठान । भक्तिज्ञानवैराग्यें ॥ ९० ॥ नरनारायण स्थिती । मी अवतरलों जे पर्वती । तेथ तोडिले बोरी ऐसी मागुती । माझी निजभक्ती फोपाइली ॥ ९१ ॥ यालागीं बदरिकाश्रम । त्या स्थळासी

म्यां ठेविलें नाम । तेथें फिटेल भवभ्रम । यापरी परम पावन तें स्थळ ॥ ९२ ॥

असें सांगतात कीं, बदरीनाथाच्या मंदिराची स्थापना आठव्या शतकांत प्रथम आद्य शंकराचार्यांनीं केली. ते बदरिकाश्रमास असता भगवान् त्याच्या स्वप्नात आले व आद्य शंकराचार्यांस भगवानानीं सांगितले कीं, माझी कृष्ण-पाषाणाची मूर्ति तप्तकुंडाच्या पलीकडे अलकनंदेत पडली आहे ती अलकनंदेंतून काढून त्या मूर्तीची येथें स्थापना कर. तेव्हा शंकराचार्यांनीं ती मूर्ति अलक-नंदेतून काढून त्या मूर्तीची ह्या देवळांत स्थापना केली व आपल्या नांबुद्री ब्राह्मण शिष्यांपैकीं एकाची ह्या देवालयाचा पुजारी व व्यवस्थापक म्हणून नेमणूक केली. शंकराचार्यांनीं स्थापिलेल्या मूळ देवळाचा व त्यानंतर बांध-लेल्या बऱ्याच देवळाचा सभोंवतालच्या हिमप्रदेशातून आलेल्या हिमशिळा ( Glaciers ) खालीं चक्काचूर झाला असेल. प्रस्तुतच्या देवळाची बांधणी अलीकडची दिसते. चौकशीअंतीं एका वृद्ध पंड्यानें सांगितलें कीं, हल्लींचें देऊळ सुमारें पाऊणशें वर्षांपूर्वी बांधलेलें आहे.

देवळाच्या आवाराच्या मुख्य दरवाजापासून पाव फर्लांगावर दगडी पायऱ्या उतरून खालीं गेल्यावर तप्तकुंड आहे. हे कुंड १७ फूट लांब व १५ फूट रुंद आहे. बुडाशीं व चारी बाजूंला दगडांनीं बांधलेलें आहे. हत्तीच्या सोंडे-प्रमाणे वाफे भरली. संतत धार पितळी गोमुखांतून अहोरात्र कुंडांत एकसारखी पडत असते. धारेच्या पाण्याची उष्णता १२१° फ्यारन हीट असते. कुंडात पडल्यावर हें पाणी बाजूच्या हिमाशामुळें १२०° फ्यारन हीट म्हणजे आंत उतरण्याइतकें गरम होते. कुंडात उतरण्यापूर्वी यथाशक्ति, नारळातील गोटा, तांदूळ व वस्त्र, काशाच्या अगर पितळेच्या थाळींत घालून पंड्यास दान देतात. कुंडात गळाभर पाणी आहे. ह्या गळाभर पाण्यात उभे राहिले असता बाहेर निघूं नये असें वाटतें. ह्या पाण्यांत फार वेळ राहिले असतां घेरी येते. पाण्याला गंधकाचा वास येतो. प्रवासात ठिकठिकाणच्या चट्टयात व कांहीं ठिकाणीं रस्त्यांत डसणाऱ्या माशा व चिलटे याच्या अंगावर उठलेल्या. गांधी ह्या कुंडां-तील दोन-तीन स्नानाने नाहींशा होतात. मुसळधारेच्या उजवीकडे दुसरी एक उष्ण पाण्याची धार पडते असते. ह्या धारेजवळ चौरस चौरस एक फुटाचे कोनाडे असून त्याचे तीन बाजूंच्या भिंतीवर फाढऱ्या रंगाच्या अनेक लहान मूर्तींचे आकार आहेत, व वरच्या बाजूला लहान लहान त्रिकोणाकार लिंगें आहेत. कोनाड्यांचे मधल्या भिंतीवरील मूर्तींच्या आकारास नर-नारायण

म्हणतात. व बाजूच्या भिंतीवरील मूर्तींच्या आकारास तेहतीस कोटी देवता म्हणतात. वरच्या बाजूला असलेल्या त्रिकोनाकार लिंगांस कोटिधारा म्हणतात. ह्या कुंडातील पाणी रोज दोन तीन वेळ ह्या कुंडाच्या खालच्या बाजूस असलेल्या दोन–तीन फूट खोलीच्या लहान कुंडांत सोडून देतात. मोठ्या कुंडाच्या तळाशी दोन नळ आहेत. त्या नळांना दोन दट्टे बसविले आहेत. हे दट्टे काढले म्हणजे मोठ्या कुंडांतील पाणी लहान कुंडांत जातें व मोठें कुंड भरल्यावर त्या नळांना पुन्हां दट्टे बसवितात. मोठ्या कुंडावर टिनच्या पत्र्यांचे छप्पर आहे.

ह्या तप्तकुंडाच्या उत्पत्तीसंबंधीं माहिती बदरीमाहात्म्यात संपूर्ण उपलब्ध असून तिचा सारांश पुढे दिला आहे. एके काळीं व्यासादि सर्व जितेंद्रिय मुनींची सभा प्रयाग येथें गंगा, यमुना ह्यांचे संगमावर भरली होती. त्यावेळीं अग्नि देवतेनें त्या सभेत येऊन ह्या मुनींस असा प्रश्न केला की भृगुशापामुळे सर्व भक्ष भक्षण करण्याने उत्पन्न झालेलेल्या माझ्या पापापासून माझी सुटका कशी होईल ? अग्नीचा हा प्रश्न ऐकल्यावर व्यासानीं सर्व मुनींची आज्ञा घेऊन गंगेत स्नान केलें व नंतर ते अग्नीस म्हणाले, " तुझ्या पापाच्या प्रायश्चित्ता-संबंधीं एक उत्तम उपाय आहे. बदरिकाश्रमास जाऊन अलकनंदेचे स्नान केले असता व नारायणास प्रदक्षिणा करून साष्टांग नमस्कार घातला असतां सर्व पापाचा क्षय होतो. " व्यासाच्या मुखातून निघालेले हे शब्द ऐकताच अग्नि उत्तर खंडांतील गंधमादन पर्वताजवळून बदरिकाश्रमास आला व अलकनंदेचे स्नान करून त्याने नारायणास भक्तिपूर्वक नमन करून नारायणाची अनन्य भावानें स्तुति केली. सर्वांच्या हृदयात स्थित असणारा भगवान्, अग्नीनें केलेली स्तुति ऐकून प्रसन्न झाला व अग्नीस म्हणाला "तुझें कल्याण होवो. तूं केलेली स्तुति ऐकून मी प्रसन्न होऊन मी तुझ्या सन्निध आलों आहे. वर माग. " हे शब्द ऐकून अग्नीने उत्तर दिलें, "हे भगवन्, माझी मनोस्पित कामना आपण जाणतच आहात. तथापि मला आपली आज्ञा शिरसावंद्य आहे व ती मी पाळतों. माझ्या " सर्वभक्षंती " मुळें झालेल्या माझ्या पापसमूहाचें क्षालन कसें होईल ? माझ्या ह्या पातकाचें मला अत्यंत भय वाटत आहे." भगवान् म्हणाले " ह्या क्षेत्राच्या केवळ दर्शनाने प्राण्याचे पाप क्षालन होतें. मी तुला प्रसन्न झालों आहें. तेव्हां तुझें यत्किंचित्‌हि पाप राहिलें नाहीं. " त्या दिवसापासून अग्नि देवता पवित्र होऊन तिने सर्व दिशात प्रवेश केला व श्रीबदरिकाश्रम येथे आपली एक कला स्थापन करून ह्या तप्तजलाच्या रूपानें ती येथे राहिली.

कुंडानजीक असलेल्या कांहीं घरांत ह्या कुंडाचें पाणी मूळ प्रवाहांत ठिक-ठिकाणीं फाटे फोडून खेळविलें आहे. हें तप्तकुंड व बर्फाच्या शीळांतून वाहा-



श्रीबदरीनाथांचें देवालय.

णारी अलकनंदा ह्या दोहोंमध्ये सुमारें दहापाच हातांचे अंतर आहे. कुंडाकडून पाचसहा पायऱ्या चढून वर येतांना उजवीकडे महादेवाचे लहानसें देऊळ आहे. ह्या देवळात त्रिकोणी आकाराचे अर्धा फूट उंचीचे शिवलिंग आहे. गोपेश्वर सोडल्यानंतर सुरू झालेल्या ह्या "वैष्णवक्षेत्र" अशी संज्ञा असलेल्या प्रदेशात ज्योतिर्मठ येथील ज्योतिर्लिंग व ह्या देवळातील शिवलिंग अशी फक्त दोन शंकराची स्थाने आहेत. ह्या देवळापासून चार पांच पायऱ्या वर चढून आल्यावर उजव्या हातास रावळजींचा उंच वाडा आहे. येथून पंधरावीस फुटाचा रस्ता ओलांडून गेल्यावर श्रीबदरीनाथाचे देवळाच्या आवाराच्या पायऱ्या सुरू होतात. सुमारें दहा पायऱ्या वर चढून गेल्यावर मोठा लाकडी दरवाजा आहे. ह्या दरवाज्यातून आत गेल्यावर आपण देवलयाच्य आवारांत येतों. हें आवार बरेच मोठें असून त्याची जमीन फरसबंदीची आहे. दरवाज्यांतून आंत गेल्याबरोबर गरूड शिळा म्हणून एक चौकोनी जरा उंच दगड आहे. ह्या दगडावर कृष्णपाषाणाची गरुडाची मूर्ति आहे. ह्या शिलेच्या डावीकडे सात फुटांवर सुमारें पुरुषभर उंचीची हनुमानाची दगडी मूर्ति आहे. ह्या मूर्तीची स्थापना कांहीं वर्षांपूर्वी काळीकमलीवाला संस्थेमार्फत झाली. ह्या हनुमानाचे मूर्तीपासून पाच फुटाचे अंतरावर भोगमंडी म्हणून बदरीनाथांचा नैवेद्य तयार करण्याची फार मोठी हॉलसारखी पाकशाला आहे. आंत मोठाले चर बांधलेले असून त्यांत जळत असलेल्या तुळशींच्या काष्ठावर मोठया भांड्यांत नैवेद्याचे जिन्नस शिजत असतात. भात, पाण्यासारखे पातळ मुगाच्या डाळीचें वरण व केसरीभात असा नैवेद्य रोज नऊचे सुमारास तयार होतो. पूजा आटोपून दहाचे सुमारास देवास नैवेद्य दाखविल्यानंतर ह्या नैवेद्याचीं लहानमोठीं भरलेलीं भांडीं यात्रेकरूंस विकत मिळतात. आठ दहा आण्यांचे भांड्यांत दोन-तीन इसमाचें पोट भरते. भोगमंडीला लागून असलेल्या दुसऱ्या दालनात सुकलेल्या तुळशींच्या काष्ठाची वखार आहे. ह्या वखारींतील सर्व काष्ठें मुद्दाम धुवून सुकवलेलीं असतात. ह्या काष्ठांचे विस्तवावर बदरीनाथाचा नैवेद्य तयार होतो.

मुख्य देवळाच्या डावीकडे लक्ष्मीचें चिरेबंदी देऊळ आहे. आंत कृष्णपाषाणाची लक्ष्मीची मूर्ति असून तिला शृंगार केलेला म्हणजे कपडे व दागिने घातलेले असतात. लक्ष्मीचे देवळाचे बाजूस दहा फुटांचे अंतरावर राजा शिवलाल मोतीलाल यांची दुमजली धर्मशाळा आहे. मुख्य देवळाच्या पाठीमागेंहि

दुसरी दुमजली धर्मशाळा आहे. मुख्य देवालयाच्या उजवीकडे चाळीसारखी इमारत आहे. ह्या इमारतींतील खोल्यांत देवाचे कपडे, दागिने, भांडीं व धान्याची कोठी आहे. जवळच लहान देवळांत क्षेत्रपाळ काळभैरवाचा दगडी मुखवटा आहे. मुख्य देवळांत शिरल्याबरोबर प्रथम चौकोनी मोठा हाल आहे. ह्या हॉलची जमीन काळ्या पांढऱ्या संगमरवरी दगडाची आहे. तीन बाजूंस दगडी कमानी असून त्यांत लाकडी कठड्यांचे दरवाजे आहेत. ह्या दालनापलीकडे दुसरें लहान दालन असून आंत जाण्याचा दरवाजा पितळी चौकटीचा व पितळी दाराचा आहे. ह्या दालनाची जमीनहि संगमरवरी आहे. ह्या दालनांत उजव्या कोपऱ्यांत लक्ष्मी व डाव्या कोपऱ्यांत दुर्गादेवी अशा दोन मूर्ति आहेत. ह्या दालनापलीकडे मुख्य गाभारा आहे. गाभाऱ्याचा दरवाजा चांदीचा असून वर नकशी आहे. मुख्य गाभाऱ्यांत भिंतीला लागून असलेल्या ओट्यावर मधोमध कृष्ण पाषाणाची फूटभर उंचीची बदरीनाथांची ध्यानस्थ मूर्ति आहे. ह्या मूर्तीभोंवती सुवर्णाची प्रभावळ आहे. तिला सुवर्णमुगुट असून त्यात हिरवट पाचूचा मोठा हिरा आहे. मूर्तीवर सोन्याची छत्री आहे. ह्या मूर्तीच्या डावीकडे गरुडाची पितळेची मूर्ति आहे व उजवीकडे कृष्णपाषाणाची लक्ष्मीची मूर्ति आहे. जवळच दुसऱ्या दोन पितळेच्या मूर्ति आहेत. कांहीं पुस्तकांत दिलेल्या बद्रीपंचायतनांतील कुबेरजी, उद्धव, गणेश, नारायण, नर, उद्धव, नारद वगैरे कोणत्याहि मूर्ति येथें दिसत नाहींत. हें बद्रीपंचायतन केवळ काल्पनिक आहे देवळात गेलों त्यावेळीं पूजा, नैवेद्य वगैरे होऊन गेला होता. देवळांतील मूर्तींचे दर्शन घेऊन मुक्कामावर आलों. पूजा, पोथी वगैरे नित्यक्रम आटोपला. इतक्यांत घरून सर्व खुशाल आहेत अशी तार आली. केदारनाथ येथून निघाल्यापासून आज पंचवीस दिवसांनी घरची खुशाली कळली. थोडी विश्रांति घेतल्यानंतर घरीं पत्रें लिहून तीं टपालांत टाकलीं. बद्रीनाथ येथे टपाल सकाळीं नऊ वाजतां येतें व सायंकाळीं पांच वाजतां येथून जातें. येथे टपाल रनरबरोबर येतें.

सुमारे तीन वाजता ऋषिगंगेच्या वरच्या बाजूच्या पर्वताच्या टेकडीवर असलेल्या चरणपादुकाचे दर्शन घेण्याकरिता ती टेकडी चढण्यास सुरुवात केली. बरेच वर गेल्यावर एक कुटी लागली. ह्या कुटींत बचेदासजी नावाचे संन्याशी आहेत. त्याचें दर्शन घेण्यास ठेंगण्या दरवाज्यातून आत गेलों. आंत पन्नाशीच्या आतील लहानशी दाढी व जटा असलेले संन्याशी व्याघ्रचर्मावर

बसले होते. एक तरुण पंडा तुळशीदासाचें रामायण त्यांना ऐकवीत होता. आम्हास त्यांनीं बसण्यास खुणेनें दर्शविलें. जवळ दुसरे दोन यात्रेकरू बसले होते. बचेदासजी यांनीं त्या तरुण पंड्यास चहा तयार करण्यास सांगितलें. चहा तयार झाल्यावर तो सर्वांस पितळी भांड्यात देण्यात आला. बचेदासजी यांनीं आपल्या समोर जळत असलेल्या धुनींतील चिमूटभर रक्षा कमंडलूंतील चहात टाकली व नंतर तो कमंडलूंतील चहा त्यांनी प्राशन केला. चरण-पादुकांचें दर्शन अद्याप घ्यावयाचें आहे असें आमचेबरोबर असलेल्या पंडा दौलतराम यानें सुचविलें. तेव्हां बचेदासजी हिंदींत म्हणाले, " चरणपादुका, बदरीनाथांची मूर्ति वगैरे मानवी कृती आहेत. बदरिकाश्रमात वास करून त्याचें सृष्टिसौंदर्याचें दर्शनापुढें ह्या मानवी कृतीचें दर्शन व्यर्थ आहे. " हे संन्याशी पूर्वी, सहा महिने देवप्रयाग येथें व सहा महिने बदरिकाश्रम येथे असत. परंतु हल्लीं ते बदरिकाश्रम येथे राहून नंतर इतर ठिकाणीं फिरत असतात. हे दर द्वादशीला भंडारा करतात व फक्त त्या दिवशीं भोजन करतात. इतर दिवशीं मिळाल्यास फलाहार करतात. ही माहिती पंडा दौलतराम यांनीं सांगितली. दिवस बराच वर आला होता व चरणपादुका बऱ्याच वर आहेत असें कळलें तेव्हां तिकडे न जातां भोंवतालच्या सृष्टिसौंदर्याची शोभा अव-लोकन करीत मुक्कामावर आलों. आकाश निरभ्र असल्यामुळें पूर्वेच्या नर-पर्वतापलीकडील चौखांबी व पश्चिमेच्या नारायण पर्वतावरील हिमशृंग व नीलकंठ शिखर ही स्पष्ट दिसत होतीं. मुक्कामावर आल्यानंतर, वसुधारेचा व सतोपंथाचा ( सत्यपंथ ) रस्ता नुकताच जाण्यासारखा झाला आहे असें कळल्यावरून, पंडा दौलतराम यांचेमार्फत दंडीवाल्यास चार रुपये जास्त देण्याचें कबूल केलें व उद्यां वसुधारा व सतोपंथ (सत्यपंथ ) येथें जाण्याचा बेत केला. थंडी बरीच पण उत्साहवर्धक होती. पंडा दौलतराम यानें कुलीस व नोकरास चार चार कामळीं दिलीं होतीं. सभोंवतालच्या सृष्टिसौंदर्याची शोभा चांदण्यांत पुन्हां अवलोकन करून, दूध घेतलें व झोंपी गेलों. आज येथें दूध शेरास आठ आणेप्रमाणें मिळालें.

## गुरुवार ता. २७ जुलै १९३९, दिवस ४७ वा.

सकाळीं पांच वाजतां तप्तकुंडांत स्नान केलें व दूध घेऊन वसुधारेच्या रस्त्यास लागलों. बाजारांतील कोणताहि पदार्थ खावयाचा नाहीं असा नेम

असल्यामुळें नोकरानें तयार केलेले कांहीं फराळाचे जिन्नस बरोबर घेतले होते. तेथून पुढें सतोपंथ(सत्यपंथ)पर्यंत जाण्याचा बेत असल्यामुळे बरोबर हें फराळाचें सामान, बेडिंग, हरिकेन लॅटर्न वगैरे घेतले होते. कुली व नोकराकरिता पंडा दौलतराम यानें पुरेशीं कामळीं दिलीं होतीं. पुढचा रस्ता देऊळ व रावळजीचा वाडा ह्या दोहोच्या मधून गेला आहे. देवळानंतर पुढे दोनतीन धर्मशाळा आहेत. येथून जरा पुढं गेल्यावर एक रस्ता उजवीकडे असलेल्या ब्रह्मकपाला-कडे जातो. ब्रह्मकपाल हा मोठा खडक अलकनंदेला लागून आहे. दोन फर्लांग पुढें गेल्यावर रस्त्याच्या दोन्ही बाजूंस राजगिऱ्याचीं व बटाट्याचीं शेतें लागतात. शेताच्या पलीकडे फिरस्त्या भोटी व्यापाऱ्यांचे दोन तीन तंबू दिसत होते. पुढें सुमारें दोन मैल चढणीच्या रस्त्यानें अलकनंदेच्या कांठाजवळ आलों. येथें अलकनंदा कामचलाऊ लाकडी पुलावरून ओलांडल्यानंतर आणखी चढावास सुरुवात होते. ह्या पाऊण मैल चढणीच्या रस्त्यानें पुढें गेल्यावर माना गाव लागतो. माना गांव समुद्रसपाटीपासून १०,६०० फूट उंचीवर आहे. गाव रस्त्याचे डावीकडे दरडीवर वसला आहे. गांवांतील लोक सशक्त, गोरे असून त्याच्या चेहेऱ्याची ठेवण मागोलिअन म्हणजे चिनी, जपानी लोकासारखी दिसते. हे लोक भोटी लोकाबरोबर व्यापार करतात. येथे फार बर्फ पडूं लागले म्हणजे माना गावातील लोक खालीं जोशीमठ-पर्यंत जाऊन राहतात. येथील पुरुष इतर पहाडी लोकांप्रमाणें लोकरीचे पायजमे, गुडघ्यापर्यंत लांब झग्यासारखा आगरखा, त्यावर कंबरेला पट्टा अगर दोरी व डोक्यात लोकरीची टोपी वापरतात. बायका घागऱ्यासारखे लोकरी घोंगडें कमरेस गुंडाळतात. अंगांत लाब हाताची लोकरीची बंडी व डोकीस कापड बाधतात. बहुतेक घराच्या बाजूला मेंढरांकरितां आवार असतें. मेंढ-राच्या लोकरीचें टकळीवर सूत काढून हे लोक आपल्याकरितां कापड बनवि-तात. येथें प्राथमिक शाळा लोकलबोर्डामार्फत आहे. मानागांवचे वरच्या बाजूनें एक रस्ता भोट देशात माना घाटांतून गेला आहे. ह्या माना घाटाची उंची समुद्रसपाटीपासून १८, ७०० फूट आहे. माना घाटानें पुढें तीस चाळीस मैलांनंतर तिबेटची हद्द लागते. ह्या रस्त्यानेंहि कैलास, मानससरोवर वगैरे ठिकाणीं जातां येतें. मानाघाटाचे पूर्वेस नीति घाट आहे. नीति घाटानेंहि तिबेटांत व चीन देशांतहि जातात. वरच्या रस्त्यानें मानागांवापासून सुमारें एक मैल वर गेलों होतों.

तेथें एक भोटी व्यापारी उतरला होता. त्याच्या तीस–चाळीस मेंढरांचा कळप जवळच चरत होता. मेंढरांच्या पाठीवरील मालाच्या काळ्या कातड्याच्या थैल्यांचा ढीग तंबूजवळ होता. तो इकडील माल घेऊन तिबेटकडे चालला होता. वरील माहिती त्याचेकडून मिळाली. मानागावाचे डावीकडे एक लहान जुनाट देऊळ आहे. ह्या देवळास मातामूर्ति म्हणतात. आत देवीची ओबडधोबड दगडी मूर्ति आहे. येथून अर्धा मैल पुढे गेल्यावर भोटगंगा अगर सरस्वतीगंगा नांवाची नदी बऱ्याच उंचीवरून जोराने खालीं पडते. ही नदी पुढें अलकनंदेस मिळते. दोन्ही बाजूंच्या कड्यावर आडवा पडलेल्या मोठ्या दगडावरून ही सरस्वतीगंगा ओलांडावी लागते. ह्या नैसर्गिक पुलास भीमगोडा म्हणतात. ह्या दगडाखालून ह्या नदीचा जलौघ फारच म्हणजे इतका जोरानें खालीं पडत असतो कीं, त्या तुषारानें आजूबाजूचा भाग धूममय झाल्यासारखा दिसतो. सरस्वतीगंगेच्या पवित्र तीरावरील प्रदेशात वेदव्यासानीं श्रीमद्भागवतादिक अठराहि पुराणांची रचना केली असे बदरीमाहात्म्यांत लिहिलें आहे. सरस्वतीचे तीरावर जप करणारास थोड्या काळात मंत्रसिद्धि होते वगैरे वगैरे ह्या सरस्वतीगंगेचें वर्णन बदरीमाहात्म्यात दिले आहे. ह्या मोठ्या दगडावरून पलीकडे गेल्यावर एक गुंफा आहे. ह्या गुंफेचे दार औरस चौरस दोन फूट आहे. दरवाज्याचे बाहेर एक तरुण संन्याशी ढोप्यात मान घालून बसला होता. आंत एक वृद्ध संन्याशी व्याघ्रासनावर ध्यानस्थ होता. बरीच मजल झेपावयाची असल्याकारणानें येथें जास्त वेळ न गमावतां पुढच्या रस्त्यास लागलों. पुढचा साधारण चढणीचा रस्ता हिरव्यागार वनस्पतींनीं भरलेल्या पर्वताच्या टेकडीवरून गेला आहे. ह्या वनस्पतींचा गंध थोडा त्रासदायक वाटतो. वारा अतोनात असल्यामुळें कानाडोक्यावरून मफलर गुंडाळावा लागला. ह्या रस्त्याने अडीच मैल पुढे आल्यावर सुमारें पाव मैल रुंदीच्या हिमौघा ( Glacier ) वरून चढावास सुरुवात झाली. वरच्या बाजूस उजव्या हाताच्या पहाडावरून दुधासारखा पांढरा पाण्याचा प्रवाह पडतांना येथून दिसूं लागला. सर्व वातावरण बंदुकींच्या आवाजानें भरून गेलें आहे असे वाटूं लागलें. हिमौघा-( Glacier ) वरून एका हातांत दंडा (Himalayan stick ) दुसरा हात नोकराच्या खांद्यावर व मागे दोन दंडीवाले अशा रीतीनें चढत कड्यावर आलों. भोंवतीं अफाट प्रदेश आहे.

कड्यापासून **वसुधारा** पाव फर्लांगाचे अंतरावर सुमारें साडेचारशें फूट

उंचीवरून दहाबारा फूट रुंदीचा हा पाण्याचा प्रवाह खालीं पडत असतो. त्या



सत्यपंथ सरोवराचे मार्गावरून दिसणारें नालकंठ शिखर
व त्याचे पलीकडे असलेलें कामेत शिखर.

प्रवाहास **वसुधारा** म्हणतात. भयंकर वाऱ्यामुळे ह्या प्रवाहाचे सूक्ष्म तुषार भोंवतालच्या वातावरणात धुक्याप्रमाणे पसरलेले असतात. चार हात पुढे जाऊन उभे राहिलें असतां अंगावर पावसाप्रमाणे तुषार येऊन त्या तुषारांनीं स्नान होतें. येथून जरा पलीकडे कड्याचे बाजूला दोन दालनांची तीन बाजूंस भिंत व एक बाजू मोकळी अशी लहान धर्मशाळा आहे. उभ्या चढणीने जरा वर गेल्यावर कडयाचे आतल्या बाजूस एक कुटी असून तेथें एक वृद्ध व एक तरुण संन्यासी राहतात. त्यांच्याकडून असे कळलें कीं, कार्तिकात येथें बर्फ पडूं लागल्यानंतर हे जोशीमठाकडे जातात व अक्षय्यतृतीयेचे सुमारास येथें येऊन कुटींतील बर्फ काढून कुटींत राहतात. खाण्यापिण्याची काळजी भगवान् घेतो असे ते म्हणाले. ह्यांपैकीं एक साधु फारच वृद्ध आहे.

अष्टवसुदेवतांनीं ह्या ठिकाणी तीस सहस्र वर्षे अत्यंत भयानक तपश्चर्या केली व त्याना सिद्धि प्राप्त झाली. तेवढयावरून ह्या ठिकाणास वसुधारा हें नाव पडलें आहे. धारेच्या मुखात बर्फ सांचलें म्हणजे प्रवाह कांहीं मिनिटें बंद होतो व नंतर दहापांच मिनिटांनीं कांहीं वेळ बर्फाचे गोळे खालीं पडतात. वसुधारा येथें धारेच्या तुषारांत स्नान करतात. वारा जरा बंद असतां स्नान होण्याइतके तुषार येत नाहींत. पापी मनुष्यास तुषाराचें स्नान घडत नाहीं अशी समजूत आहे. आम्हीं येथें आलों त्या वेळीं वारा पुष्कळ असल्यामुळें आम्हांस पूर्ण स्नान घडलें. तुषाराचें स्नान करून, कपडे चढवून पुढचा मार्ग सुधारला. जरा पुढें गेल्यावर पश्चिमेकडे बर्फाचा मोठा तट दिसतो. ही केदारनाथ पर्वताची मागची बाजू आहे असें सांगतात. वसुधारेच्या वरचीं हिमशृंगें येथून दिसतात. ह्या शृंगापैकीं जवळच असलेलें नीलकंठ शिखर व समुद्रसपाटीपासून २५,४४३ फूट उंचीचें सर्वांत उंच कामेत शिखरहि येथून दिसतें. आसपासच्या हिमनद्यांचा ( Glaciers ) देखावा अप्रतिम आहे. येथून सुमारें दीड मैल गेल्यानंतर बर्फमय पर्वतांच्या श्रेणी जरा दूरदूर असल्याकारणानें आपण सपाटीवर आहोंत असें वाटतें. ह्या खिंडीमधील ही सपाटी पुढील बर्फमय प्रदेशात गेली आहे. अलकनंदेचें उगमस्थान ह्या सपाटीच्या बाजूस असलेल्या बर्फमय पर्वतांत आहे. ह्या सपाटीवरून पुढे थोड्या चढणीच्या मार्गानें, मधून मधून बऱ्याच हिमनद्या ( Glaciers ) ओलांडून दीडचे सुमारास **सतोपंथ** ( **सत्यपंथ** ) येथे येऊन पोहोचलों. दरम्यान डावी उजवीकडे सपाटीच्या व चढणीच्या बाजूस मिळून तीन-चार गुहा लागल्या. वेळेच्या अभावामुळें

त्या आंत जाऊन पाहणें घडलें नाहीं. येथें सुमारें दीड मैल परिघाचें साधारण त्रिकोणाकार अर्धवट गोठलेलें सुंदर सरोवर आहे. ह्या सरोवराच्या तीन टोंकांना ब्रह्मकुंड, विष्णुकुंड व महेश्वरकुंड असें म्हणतात सत्यपंथ हें सरोवर



अलकनंदेचें उगमस्थान.

म्हणजे प्रत्यक्ष सृष्टिदेवीचा आकार आहे. सभोंवतालचीं अनेक हिमशृंगें, त्यांच्या दरडीवरून वारंवार गडगडाट करीत खालीं घसरत येणाऱ्या हिमनद्या ( Glaciers ), बर्फाच्छादित खडकामधून कडाडत वाहणारे शुभ्र जलौघ व पाण्याचे स्रोत, येथील सृष्टिदेवीच्या सौंदर्यांत भर पाडतात. हिमालयांतील सृष्टिदेवीच्या सौंदर्याचें सत्यपंथ हें चौथें भव्य देवालय आहे. येथील सृष्टि-सौंदर्याचें वर्णन करणें अशक्य असल्याकारणानें वाचकांनीं त्याची कल्पना करणें अधिक चांगलें. येथून आठ नऊ मैल बर्फमय प्रदेशांतून पुढें गेल्यानंतर गौमुख लागतें. केदारनाथ येथून दहा बारा मैलांच्या अंतरावर आहे, परंतु येथून थेट केदारनाथपर्यंत बर्फमय प्रदेशांतून जावें लागतें असें सांगतात.

बदरीमाहात्म्यांत ह्या तीर्थाचा सत्यपद म्हणून उल्लेख केला असून असें म्हटलें आहे कीं, त्रैलोक्यांतील ह्या दुर्लभ तीर्थाच्या स्नानानें अधम पुरुषसुद्धां विष्णुरूप होतो. ह्या ठिकाणीं पांडवांनीं कांहीं काळ वास केला होता असें म्हणतात. येथून पुढें सतत बर्फानें भरलेली लांब खिंड असून तिच्या उत्तरेस आकाशास लागून दिसणारी एकावर एक अशा पायऱ्यांसारखीं अनेक

बर्फाच्छादित पर्वतांचीं हिमशृंगें आहेत, त्यास **स्वर्गारोहण** म्हणतात. पांडव येथून स्वर्गास गेले अशी समजूत आहे. महाभागवतात ह्या स्वर्गारोहणाचा उल्लेख आहे. वसुधारा व सत्यपंथ ह्या दोन ठिकाणांमधील सपाटीवर बदरीनाथाची स्थापना करण्याचा आद्य शंकराचार्यांचा उद्देश होता, परंतु सामान्य जनसमूहास ह्या जागीं येणे फार कष्टाचें होईल म्हणून नारायणाची मूर्ति जेथें अलकनंदेंत सांपडली त्या ठिकाणानजीक त्यानीं बदरीनाथाच्या देवळाची स्थापना केली असे वसुधारा येथील वृद्ध संन्याशानें सांगितलें.

सत्यपंथ सरोवराला प्रदक्षिणा करून तिन्ही टोंकांच्या तीर्थात स्नान केले. सरोवराचें पाणी अत्यंत गार परंतु फारच स्वच्छ होतें. ह्या पाण्यांत हॉर्लिक्स मॉल्टेड मिल्क ( दूध ) तयार करून तें घेतले, पूजा-पोथी वगैरे लौकरच उरकली, फराळ केला व तीनचे सुमारास सत्यपंथ येथून निघालों ते भोंवतालची सृष्टिसौंदर्याची शोभा अवलोकन करीत वसुधारा येथें सहाचे सुमारास येऊन पोहोंचलो.

पूर्व युगातील महान् ऋषींनीं ज्या ठिकाणीं नित्य वास करून ब्रह्मज्ञानाची प्राप्ति करून घेतली; वेद, वेदांगें, पुराणे लिहिलीं; तत्त्वज्ञान, ज्ञान व विज्ञान ह्या विषयावर वाङ्मय लिहिलें, आणि ज्या वाङ्मयाच्या भांडाराचा अभिमान फक्त भारतवर्षास वाटतो इतकेंच नसून ज्याची आज सर्व जगास अहंमन्यता वाटते आहे, अशी हीं पवित्र ठिकाणें आहेत. भारतवर्षाचे गतकालीन वैभवाच्या उत्सवाप्रीत्यर्थ, बदरिकाश्रम येथील आसपासच्या ह्या पवित्र स्थानांत आश्रम व संस्कृतिवर्धक संप्रदाय ( Cultural schools ) स्थापन करण्याची अत्यंत आवश्यकता आहे असे विचार हीं पवित्र ठिकाणें अवलोकन करताना मनात उद्भवतात.

वसुधारा येथे परत आल्यानंतर रात्रीं येथें वस्ती करून सकाळीं बदरीनाथ येथें जाण्याचें ठरविलें. दंडीवाले व बोजेवाले ह्यांनीं धर्मशाळेंत मुक्काम केला व आम्ही व नोकर साधूंच्या आमंत्रणावरून त्यांच्या कुटींत राहिलों. कुटींतील त्याच्या धुणीवर पाणी गरम करून कढत हॉर्लिक्स मॉल्टेड मिल्क ( दूध ) घेतले व रात्रीं सुमारें बारा वाजेपर्यंत वृद्ध संन्याशाबरोबर गोष्टी करीत बसलो. ह्यांनी येथें बराच काळ काढला असून आसपासच्या बर्फमय प्रदेशांत बराच प्रवास केला आहे. त्या प्रवासांतील त्याने प्रत्यक्ष अवलोकन केलेले चमत्कार व गोष्टी मनोरंजक होत्या. स्थलसंकोचास्तव त्या सर्व येथें

देणें शक्य नाहीं. सत्यपंथ व स्वर्गारोहण ह्यांच्या आसपास महात्म्यांचे आश्रम असून पर्वकाळीं त्या आश्रमातील कांहीं महात्मे सत्यपंथ सरोवरांतील कुंडांत ब्राह्ममुहूर्तावर स्नानास येत असावे, कारण आम्ही कधीं कधीं पर्वकाळीं तेथे स्नानास जातों त्या वेळीं सरोवराच्या आजूबाजूच्या बर्फमय प्रदेशांत बर्फावर अनेक पाउलें उमटलेलीं दिसतात असे ह्या वृद्ध संन्याशानें सांगितलें. " तुम्हास महात्मा कधीं भेटला होता काय ? " असें विचारता हा वृद्ध संन्यासी उद्गारला, " आमची तितकी पुण्याई नाहीं. तितकी पुण्याई घडावी म्हणून तर येथे निदान सहा महिने तरी वास करीत आहे. सतोपंथास जातांना तुम्हांस दिसलें त्या गुंफांपैकी एका गुंफेंत बरेच वर्षांपूर्वी एक जीवन्मुक्त वास करीत असत, तें आम्ही पाहिले होते. ते सतत समाधींत असत. पुढें कांहीं कालानंतर ते तेथून नाहींसे झाले. " अशा ह्या त्यांच्या मनोरंजक गोष्टी ऐकून झोपीं गेलों.

## शुक्रवार ता. २८ जुलै १९३९, दिवस ४८ वा.

सकाळीं सात वाजता वसुधारा येथून निघालों. थंडी बरीच होती. उतरण असल्यामुळें नऊचे सुमारास बदरीनाथ येथें येऊन पोहोंचलों. तप्तकुंडांत स्नान केलें व नंतर बदरीनाथाचे देवळात गेलो. नाथांची पूजा नुकतीच सुरू झाली होती. देवळाचे मुख्य गाभाऱ्याबाहेरील दोन्ही दालनात यात्रेकरूंची बरीच गर्दी होती. पंडे लोकांस यात्रेकरूबरोबर आत जाण्याची मनाई असल्यामुळें पंडा दौलतराम आत आला नाहीं. नोकरानें मुख्य गाभाऱ्याचे चांदीच्या दरवाज्याबाहेरील चबुतऱ्याजवळ उभे राहाण्यापुरती जागा केली. दरवाज्याबाहेर चांदीच्या उमरठ्याजवळ मोठी शिसवी पेटी होती. त्या पेटीनजीक पितळी तिवईवर चांदीचें मोठें तबक होतें. त्या तबकांत तादूळ, डाळ, बदाम, खिसमीस, चांदी-सोन्याचे अनेक दागिने व रुपये व कांहीं सोन्याचीं नाणीं पडलीं होतीं. हें तबक भरलें म्हणजे ह्यांतील दागिने व नाणीं जवळच्या पेटींत टाकण्याचा व इतर जिन्नस जवळच असलेल्या चांदीच्या मोठ्या टोपांत टाकण्याचा क्रम चालू होता. हें काम जवळ बसलेला एक वृद्ध पहाडी करीत होता. दरवाज्याचे उजवेकिडील चबुतऱ्यावर देवाचे मुख्य शास्त्रीजी व त्यांचे हस्तक बसले होते. हे सर्व पुरुषसूक्त, विष्णुसहस्रनाम वगैरे म्हणत होते. गाभाऱ्यांत रावळजी देवाची पूजा करण्यांत गुंतले होते त्यांचे बाजूला जरा दूर एक वृद्ध पहाडी ब्राह्मण बसला होता. हा रावळजींना पूजेचें साहित्य देत

होता. मुख्य गाभाऱ्यात रावळजी व हा वृद्ध ब्राह्मण ह्या दोघांखेरीज कोणी जात नाहींत व देवास रावळजीशिवाय इतर कोणीहि स्पर्श करीत नाहींत.

रावळजी हे सुमारें पन्नास वर्षांचे असावे. त्याना तीन चार बोटें लांब काळी-भोर दाढी असून मानेपर्यंत कापलेले काळे केस आहेत. मलबारी धोतर, अंगांत पहाडीकाबळीचा गुडघ्याखालीं येणारा लांब झग्यासारखा लॉंग कोट, कमरेला ह्या लॉंग कोटावर बांधलेला तांबडया बनातीचा पट्टा व कानाच्या भागावर केलेली बनातीची कानटोपी व खांद्यावर एक टर्किश टॉवेल असा रावळजींचा पोषाख होता.

पूजा नुकतीच सुरू झाली होती त्यामुळें देवाचें निर्मळ दर्शन होत होतें. पंचामृत-पूजा होऊन कापूरआरतीचे वेळीं देवाची मूर्ति स्पष्ट दिसली. गुळगुळीत कृष्ण पाषाणाची ध्यानस्थ बुद्धाच्या मूर्तीसारखी ही मूर्ति आहे. पंचामृत-पूजा-आरती झाल्यावर रावळजी मूर्तीवर जरीचे कपडे, मुगुट, दागिने वगैरे चढवितात निरनिराळ्या अनेक रंगाच्या पुष्पमाला चढवितात व मग देवाला भोग देण्याची सुरवात होते. भोग देणें म्हणजे नैवेद्य दाखविणें.चांदीच्या मोठमोठ्या भांडयांत भात, मुगाचें वरण व केसरीभात घालून तीं भांडीं दरवाज्याबाहेरून आंत, असलेल्या म्हाताऱ्याच्या हातात देतात व तो तीं देवापुढें ठेवतो. नंतर दहा मिनिटें चांदीचे दरवाजे बंद असतात. दरवाजे उघडल्यानंतर हीं भांडीं परत घेऊन जातात व नंतर पुन्हां आरती होते. एकावर एक अशा चार पांच पाळ्यांच्या चांदीच्या मोठ्या दिव्यांत तुपाच्या बऱ्याच वाती उजळून तो दिवा हा म्हातारा रावळजींच्या हातांत देतो व रावळजी देवास आरती ओवाळतात. शास्त्रीजी व त्याचे हस्तक आरत्या म्हणतात व मग मंत्रपुष्प होऊन पूजा समाप्त झाल्यावर देवाचें तीर्थ व आरती बाहेर आणून यात्रेकरूंस देतात. पूजा आटोपल्यानंतर रावळजी बाहेर येतात. त्यांच्यापुढें हातांत चांदीची मोठी काठी घेतलेला काठीकर ( चोपदार ) " रोको रोको " म्हणत पुढे चालत असतो. अशा थाटानें हे " बदरीनाथाच्या नांबुद्री ब्राह्मण पुजाऱ्याचे " बनलेले " रावळजी " देवळापलीकडे असलेल्या आपल्या वाड्यात जातात. हे पूजेस येतात तेव्हांहि ह्याचा हाच थाट असतो. मात्र देवळांत जातेवेळीं पायरीवर ठेवलेल्या चादीच्या झारींतील गरम पाण्यानें पाय धुऊन खांद्यावर असलेल्या टर्किश टॉवेलने पाय पुशीत हे देवळांत प्रवेश करतात.

विशेष चौकशीअंतीं असें कळलें कीं, विद्यमान रावळजी हे त्यांच्या पूर्वीचे रावळजी वासुदेव नाबुद्री यांचेबरोबर येथें आले व हे त्याचे दुय्यम म्हणून काम पहात असत. वासुदेव नाबुद्री याच्या पंडुकेश्वर येथील गौरकाय रजपूत स्त्रियांशीं उघडाउघडी होत असलेल्या व्यवहारासंबंधीं बराच बोभाटा झाला. सरकारपर्यंत तक्रारी जाऊन उघड चौकशीची वेळ येऊन ठेपली. तेव्हां त्यांनीं आपखुषीनें राजीनामा दिला व विद्यमाने रावळजीस सरकारपरवानगीने सर्व काम सोपवून आपल्या आमदानींत केलेली माया घेऊन ते मलबारकडे निघून गेले; नंतर विद्यमान रावजी कारभार पाहूं लागले. त्यांनींहि वासुदेव नाबुद्री हें नाव धारण केलें. त्यांचे पूर्वीच्या तीनचार पिढ्यातील रावळांप्रमाणें त्यांनींहि पंडुकेश्वर येथील एका रजपूत स्त्रीशीं व्यवहार सुरू केला. त्या स्त्रीस त्याचेपासून एक मुलगी जन्मली. तिच्या नातेवाइकांत बराच गडबड उडाल्यामुळे त्यांनीं रावळजीस तिच्या बरोबर विवाह लावण्यास भाग पाडलें व हल्लीं ती, त्यांची विवाहित बायको म्हणून, त्याचे जवळ राहाते. विवाहानंतर हिला त्याच्यापासून दुसरी मुलगी झाली आहे. पट खुला झाल्यानंतर पहिले तीन चार महिने बरेच बडे बडे यात्रेकरू येत असतात. त्यामुळे विद्यमान रावळजी आपलें रजपूत कुटुंब जोशीमठ येथेच ठेवतात व पुढे म्हणजे श्रावण महिन्याचे सुमारास येथें आणतात. बदरीनाथपुरीत रावळजीच्या कुटुंबाला प्रवेश होतांना ढोल, तुताऱ्या वगैरे वाजतात. विद्यमान रावळजींच्या कारभारासंबंधानें हल्लींचे रावळजी व बदरीनाथचे पंडे याचे दरम्यान अलाहाबाद हायकोर्टांत हल्लीं दावा चालू असल्याकारणानें ह्या वर्षी रावळजींनीं कुटुंबास येथें आणण्याबद्दल ब्रिटिश गढ्रवालचे डेप्युटी कमिशनर याची परवानगी मागितली होती; परंतु ती न मिळाल्यामुळें यंदा रावळजींचे कुटुंब काल रात्रीं मुकाट्यानें येथें आलें असें कळलें. आज तिसरे प्रहरीं आम्हीं रावळजीचे ऑफिसांत जात असतां उत्तम प्रकारची पाळण्यासारखी एक ऐसपैस डोली ( दंडी ) रावळजींचे वाड्याजवळ आम्हीं प्रत्यक्ष पाहिली. ही सर्व माहिती ऐकीव असल्यामुळें तिसरे प्रहरीं रावळजीची भेट घेऊन त्याना ह्यासंबंधीं कांहीं प्रश्न विचारण्याचें ठरविलें.

देवाची पूजा वगैरे पाहून खोलींत आलो. पूजा, पोथी वगैरे नित्यक्रम आटोपले. तीनचे सुमारास पंडा दौलतराम याचे बरोबर रावळजींच्या ऑफिसांत (दप्तरांत) गेलों. मुख्य रस्त्याच्या बाजूस असलेल्या वाड्याच्या तळमजल्यावरील एका हॉलमध्यें हें ऑफिस आहे. आत शिरल्याबरोबर उजव्या हाताला

भिंतीचे मधोमध एक फूट उंचीची गुलाली रंगी मखमालीची पांच फूट लांब व अर्डाच फूट रुंद अशी गादी असून वर तशाच मखमालीचा लोड आहे. गादीच्या काठास जरीची झालर लावलेली आहे. गादीच्या डावीकडे चांदीच्या चौरंगावर शंख, चक्र, गदा, कमळ हातात असलेले श्रीकृष्ण भगवानाचें चित्र चांदीच्या जाड पत्र्यावर कोरलेले आहे. गादीपासून चार हातांच्या अंतरावर दोन्ही बाजूंस कारकून लोकांच्या बसण्याच्या शुभ्र अभ्र्यांच्या गाद्या व पुढे लहान पेट्या व टेबलें आहेत. पांच सहा कारकून काम करीत बसले होते. रावळजींच्या गादीसमोर चांदीची मोठी थाळी ठेवलेली होती. रावळजी गादी-वर गद्दी भेट देतात त्या वेळीं त्यांना जी दाक्षिणा देतात ती ह्या थाळींत टाक-तात. एका मोठ्या पेटीसमोर बसलेल्या कारकुनाजवळ पंडा दौलतराम यानें आम्हांस नेले. त्या कारकुनाने एक छापील यादी आमचे हातांत दिली. यादींत अडीचशें रुपयापांसून एक रुपयापर्यंत निरनिराळ्या पूजांचीं नांवें होतीं. यादी वाचून आम्हांस उद्या सकाळीं एक रुपयाची पूजा करणे आहे व तिचा पास द्या असे आम्ही त्यास सांगितलें. आपण कोण, कोठून आलांत वगैरे विचारपूस केल्यानंतर कारकून म्हणाला, " आपण इतक्या लांबून एवढा खर्च करून आलां आहांत तेव्हां आपण रु. ५० ची तरी पूजा केली पाहिजे. "

" पूजेकरितां एक रुपयापेक्षां जास्त रक्कम खर्च करण्याची आमची इच्छा नाही. " आम्ही उत्तर दिलें.

" तुम्हाला पंड्याने शिकवून आणलेले दिसते. " कारकून म्हणाला.

" आम्ही पंड्याच्या सांगण्यानें कधींहि चालत नसून आमच्या स्वतःच्या इच्छेप्रमाणे जे करणें तें करतों. आपण मात्र यात्रेकरू मागेल त्या पूजेची रिसीट न देता देवळाच्या पंड्याचें काम करीत आहांत असें वाटतें. " आम्हीं उत्तर दिलें.

हें उत्तर ऐकतांच त्या कारकुनानें रिसीट-बुक काढलें व एक रुपया घेऊन पूजेची रिसीट आम्हांस दिली.

देवस्थानाच्या उत्पन्नाची व व्यवस्थेची त्रोटक माहिती मिळेल का असें विचारतां त्यानें दुसऱ्या एका कारकुनाकडे बोट दाखविलें. रावळजींची भेट केव्हां होईल असें विचारतां, कारकून म्हणाला, " आपणास गद्दी-भेट द्यावयाची असल्यास रावळसाहेबांना बोलावून आणतों. आम्हास फक्त हल्लीं हायकोर्टांत

चालू असलेल्या खटल्यासंबंधी व इतर कांहीं ऐकीव गोष्टींचा खुलासा करणें आहे." असें म्हणताच कारकुनानें सांगितले "आपण त्याना स्वतःला भेटा. ह्या इमारतीला लागूनच तप्तकुंडाच्या रस्त्यावर हिरवा रंग दिलेल्या कांचेच्या खिडक्या आहेत. त्या वाड्यांत ते आपणास भेटतील."

नंतर दुसऱ्या कारकुनाजवळ गेलो. त्यानें देवस्थानचें उत्पन्न वगैरेसंबंधीं पुढील माहिती दिली. अलमोरा जिल्ह्यांत ४५ संपूर्ण मालकीचीं व २६ हिश्श्याचीं खेडीं देवस्थानच्या मालकीचीं आहेत. ह्या खेड्यांचा सरकारी सारा रु. १७५० आहे. ब्रिटिश गहरवाल प्रांतांत देवस्थानच्या संपूर्ण मालकीचीं १६४ व हिश्श्याचीं १११ खेडीं आहेत. ह्या खेड्यांचा सारा रु. ५४२९ आहे. ह्याखेरीज यात्रेकरूकडून थाळी, अटका व गद्दी भेटीचें नगद उत्पन्न आहे. हें उत्पन्न सरासरी रु. १,५०,००० होतें. देवस्थानचे भंडारी ( खजिनदार )पंडुकेश्वरचे रजपूत आहेत. त्यांना व शास्त्री व इतर नोकरांस पगार मिळतो. सर्व हिशेब टेहरी दरबारकडे पाठवावा लागतो. ब्रिटिश सरकारचे ऑडिटरहि मधून मधून येऊन हिशेब तपासतात.

हा लेख लिहून झाल्यानंतर जानेवारी १९४० मध्यें अलाहाबाद हायकोर्टानें असा निकाल दिल्याचें समजतें कीं श्रीबदरीनाथ देवालयाची व्यवस्था व मालमत्ता एका कमिटीच्या स्वाधीन असावी व रावळजी यांस श्रीबदरीनाथाचे पूजारी म्हणून फक्त रु. २०० दरमहा पगारादाखल कमिटीनें देत जावें. ह्या निकालानंतर 'Associated Press' च्या ता. ९ जुलैच्या तारेमध्यें खालीं दिलेला मजकूर प्रसिद्ध झाला आहेः—

"नैनिताल ता. ९ जुलै १९४०

## श्रीबदरीनाथ देवालयाची व्यवस्था.

### संयुक्तप्रांत सरकारकडून खोट्या अफवांचा इन्कार.

श्रीबदरीनाथ देवालयाची सर्व व्यवस्था सरकारने आपल्या हातीं घेतली आहे व यापुढें देवालयाचें उत्पन्नाची विल्हेवाट तें पहाणार या अर्थाच्या अफवा हल्लीं प्रसृत झालेल्या आहेत, असें सरकारच्या नजरेस आलें आहे.

देवालयाची व्यवस्था आणि मालमत्ता ही एका कमिटीच्या स्वाधीन असून या कमिटीचा अध्यक्ष आणि दोन सभासद यांची नेमणूक सरकारने करावयाची आहे. कमिटीवरील इतर सभासदांची निवडणूक अथवा नेमणूक संयुक्त प्रांत असेंब्ली, कौन्सिल, गढवाल जिल्हा बोर्ड आणि तेहरी संस्थान यांच्याकडून व्हावयाची आहे. या कमिटीची नेमणूक लवकरच करावी यासाठीं सरकार खटपट करीत आहे, पण निवडणुकीचे नियम तयार व्हावयाचे असल्यामुळे या गोष्टीला काहीं विलंब लागणें अपरिहार्य आहे. या मध्यंतरींच्या काळांत फक्त सहा महिने मुदतीसाठीं सरकारने कायद्याच्या २७ व्या कलमाखालीं एका जादा सरकारी नोकराची नेमणूक केली असून देवालयाच्या कमिटीचें काम करण्यास कोणी तरी पाहिजे म्हणूनच त्यांची नेमणूक करण्यांत येत आहे. ''

वर दिलेली माहिती मिळविल्यानंतर अटका, म्हणजे देवाच्या नैवेद्यांतील ( भोग चढतो त्यांतील ) यात्रेकरूंना मिळणारा अंश, त्याबद्दल एक रुपया देऊन रिसीट घेतली व रावळजींचे भेटीस गेलों दरवाज्यावर काठीकर ( चोब-दार ) बसला होता त्याचेबरोबर आंत निरोप पाठविला. सुमारें दहा मिनिटानीं " मी तूर्त कामांत आहे, दोन कलाकांनीं या " असा निरोप काठीकरानें आणला. आम्ही कोणत्या खुलाशाकरितां आलों आहोत ही माहिती कचे-रींतील कारकुनाकडून रावळजीस मिळाली असावी.

नंतर खोलींत आलों. संध्याकाळीं बर्फाची बुरबुर सुरू झाली म्हणून पुन्हां रावळजींचे भेटीस जाण्याचा विचार सोडून दिला. सकाळच्या पूजेसारखाच सायंकाळच्या पूजेचा थाट असतो तो पाहिला. खोलींत येऊन दूध घेतलें व झोपीं गेलों.

## शनिवार ता० २९ जुलै १९३९, दिवस ४९ वा.

सकाळीं ६ वाजतां तप्तकुंडात स्नान केलें. खोलींत येऊन पूजा, पोथी वगैरे आटोपून बदरीनाथांचे निर्मळ दर्शनास गेलों. पूजेचा सर्व थाट काल पाहिला तसाच होता. काल एक रुपयाच्या पूजेचा पास घेतला होता म्हणून अगदीं पुढें जागा मिळाली. कापूरार्तीचे वेळीं देवाची मूर्ति स्पष्टपणें पाहतां आली. पूजा आटोपल्यावर भोगमंडीतून बारा आण्याचें भाताचें भांडे पंडा दौलतराम याचे मार्फत विकत आणून चार दंडीवाले व दोन बोजेवाले यांना बदरीप्रसाद म्हणून दिलें.नंतर साडे अकराचे सुमारास ब्रह्मकपालीवर श्राद्ध करण्यास गेलों.

## ब्रह्मकपाली.

ब्रह्मकपालीच्या उत्पत्तीसंबंधीं बदरीमाहात्म्यांत पुढें दिलेली कथा आहेः—सत्ययुगाचे आरंभीं ब्रह्मा आपल्या रूपयौवनसंपन्न कन्येवर मोहित होऊन तिच्याशीं भोग करण्यास उद्युक्त झाला. ब्रह्मा असें नीच कर्म करण्यास उद्युक्त झालेला पाहून शंकरानें ब्रह्माचें पांचवें शिर कापून टाकलें. ब्रह्महत्येच्या प्रभावानें तें शंकराच्या हातास चिकटून राहिलें. त्या हातास चिकटलेल्या शिरांसह शंकरानें ब्रह्महत्या दूर करण्याकरिता स्वर्ग, मृत्यु व पाताळांतील सर्व तीर्थांचें तपश्चर्यायुक्त पर्यटण केले, परंतु ब्रह्महत्या दूर झाली नाहीं. नंतर हातास चिकटलेल्या शिरासह शंकर वैकुंठास श्रीभगवानाजवळ जाऊन त्यानें दयासमुद्र श्रीनारायणास आपले दुःख निवेदन केले. श्रीनारायणाच्या उपदेशावरून शंकर बदरीवनात आला. बदरीवनात पोहोंचताक्षणींच ब्रह्महत्या कंपायमान होऊन गुप्त झाली व हातास चिकटलेलें ब्रह्मकपाल सुटून अलकनंदेंत पतन पावले. त्या दिवसापासून शंकर पार्वतीसह केदारलिंगरूपानें तप्तकुंडाचे वरचे बाजूस वास करीत आहेत.

ब्रह्मकपाली हा सुमारें २५ फूट लांब व १५ फूट रुंदीचा मोठा वाकडातिकडा खडक अलकनंदेच्या कांठाला आहे. ह्या खडकाच्याभोंवतीं चुन्याचा बांध असून बाजूस दोन पडव्या आहेत. तयार केलेल्या पिंडासुद्धां श्राद्धाचें सर्व सामान ह्या पडव्यात विकत मिळतें. फक्त पिंडावर टाकण्याकरितां लहानसें वस्त्र व यज्ञोपवीत ह्या वस्तु बाजारांतून न्याव्या लागतात. श्राद्धाचा विधि सांगणारे पंडे अगदीं निराळे असून त्यांची हावहि फार नसते. सव्वा रुपया दिला तर स्वतंत्र श्राद्धविधि सांगणारा मिळतो. कमी पैसे दिल्यास पांच दहा जणांचे रांगेस एकजण श्राद्धविधि सांगतो. ब्रह्मकपालावर पितरांस पिंड दिल्यास त्याना मुक्ति मिळते व ते पुन्हां मृत्युलोकांत येत नाहींत. ह्या ठिकाणीं श्राद्ध केल्यानंतर पुन्हां कोठेहि व केव्हाहि पिंडश्राद्ध करण्याची जरूर नाहीं अशी समजूत आहे. हें विष्णुक्षेत्र असल्याकारणानें येथे श्राद्धाचे पूर्वीं क्षौर करण्याची चाल नाहीं. श्राद्ध वगैरे सर्व कर्मे येथें आंगांत गरम कपडे व ओव्हरकोट चढवून केलीं तरी चालतात. पंड्यांच्याहि पायांत काबळीचे पायजमे व आंगात काबळीचे लांब आंगरखे व डोक्यांत टोप्या असतात. ब्रह्मकपालाच्या खालीं अलकनंदेंत ब्रह्मकुंड आहे. श्राद्ध आटोपल्यानंतर

श्राद्धाच्या सामानाचे विसर्जन ब्रह्मकुंडात करतात. येथेहि एक दोन पंडे बसलेले असतात. त्याना आणा अर्धा आणा दिला म्हणजे ते विसर्जनविधि सांगतात.

एका पंड्यास सव्वा रुपया देऊन श्राद्धविधि उरकला, व पिंड वगैरे श्राद्धाचे सामानाचें ब्रह्मकुंडात विसर्जन केलें व दीडचे सुमारास खोलींत परत आलों. ता. २३-२४-२५ चीं घरचीं पत्रे आज मिळालीं. त्यांचे जबाब लिहिले. तिसरे प्रहरीं रावळजींची भेट घेण्याचा विचार होता; परंतु बर्फाची बुरबुर व पाऊस सुरूं झाल्यामुळें तो बेत रहित केला. सर्व बदरीनाथपुरी धुक्यानें भरून गेली होती म्हणून संध्याकाळी आरतीसहि जाता आले नाहीं. आज दूध आठ आणे शेरप्रमाणे शिकस्तीने मिळालें. दूध घेतले व झोपी गेलों.

## रविवार ता. ३०.जुलै १९३९, दिवस ५० वा.

सकाळीं सात वाजता तप्तकुंडांत स्नान केलें व निर्मळ दर्शन व पूजा पाहिल्यानंतर **पंचशिला** व **पंचतीर्थें** पाहण्याकरिता निघालों. नारदाशिला, नृसिंहाशिला, वराहशिला, गरुडाशिला व कुबेरशिला अशीं पाच तीर्थे अलकनंदेच्या काठीं शिलारूपाने आहेत. नारदाशिला हें तीर्थ तप्तकुंडाचे उजवीकडे अलकनंदेच्या काठीं मोठ्या खडकाजवळ आहे. ह्या ठिकाणीं नारदांनीं तपश्चर्या केल्यानंतर भगवान् प्रसन्न झाले व नारदाच्या मागणीवरून भगवानानें नारदास वर दिला कीं ज्या शिलेवर तूं तप केलेस त्या ठिकाणीं माझें वास्तव्य सतत राहील. नृसिंहाशिला तप्तकुंडाचे डावीकडे आहे. नृसिंह अवताराचे वेळीं हिरण्यकश्यपूचे वधानंतर सर्व ऋषींनीं भगवंताची स्तुति केली. तेव्हां त्या ऋषींच्या इच्छेनुरूप भगवंतानें ह्या शिलेनजीक माझें सतत वास्तव्य राहील असा वर दिला. वराहाशिला, गरुडाशिला व कुबेराशिला ह्यासंबंधींहि अशाच कथा आहेत.

**पंचतीर्थें**—वह्नीतीर्थ म्हणजे तप्तकुंड. कूर्मधारा व प्रल्हादकुंड ह्या दोन खालीं असलेल्या कुंडात पडणाऱ्या गार पाण्याच्या धारा तप्तकुंडाच्या वरच्या बाजूस आहेत. नारदतीर्थ म्हणजे नारदाशिला. ऋषिगंगा अथवा लक्ष्मिधारा ही पुरीचे सुरवातीस पर्वतावरून खालीं येत असलेली हिमाशिलांनीं भरलेली लहानशी नदी आहे. ह्या सर्व तीर्थांवर मार्जन-तर्पण-करतात.

**चरणपादुकाः**—हे खडकावर उमटलेले पावलांचे आकार ऋषिगंगेच्या वरच्या बाजूस आहेत. **शेषनेत्र** हे दोन नेत्राकार खडक बदरीनाथपुरीच्या

समोरच्या पर्वताच्या पायथ्याजवळ आहेत. **वेदधारा** हा झरा शेषनेत्राजवळच आहे. भीमशिला **बदरीनाथ** येथें येतानाच लागते. **मातामूर्ति** माना गांवचे वरचे बाजूस आहे. **व्यासगुंफा** व **गणेशगुंफा** सरस्वतीगंगेच्या कांठीं पर्वताच्या वरच्या बाजूस आहेत. ह्या गुंफाच्या आसपासच मध्वाचार्य यानीं समाधि घेतली असे सागतात. श्री दत्तात्रेयाचें प्रत्यक्ष दर्शन घडलेलें, महानुभावपंथाचे संस्थापक श्रीचक्रधर स्वामी हेहि बदरिकाश्रमाच्या ह्या भागातच अदृश्य झाले असावे. ( श्रीयुत वि. ल. भावे कृत " महाराष्ट्र सारस्वत " भाग १ ला. )

हीं सर्व तीर्थाची ठिकाणें पाहून एकचे मुमारास खोलींत आलों. पूजा, पोथी, जेवण वगैरे उरकलें. पंडा दौलतराम यास दहा रुपये बिदागी देऊन त्याचा आशर्विाद घेतला. त्याला लेख ( नाव, गाव वगैरे ) लिहून दिला. आपण दिलेत त्यात मी खूष आहे असें त्यानें सागितलें. संध्याकाळीं सुक्यामेव्याचा बदरीनाथास भोग देऊन त्याचा अर्धा भाग प्रसाद म्हणून घरीं नेण्याकरिता मिळाला. उतरलों होतों त्या घरावर व इतर बहुतेक घरांवर माती असून तीत गवत उगवलेले दिसत होतें, म्हणून घरावर काय घालतात त्याची चौकशी केली, तेव्हा असे कळले कीं, येथील बहुतेक घरें भोजपात्रांनं शाकारून त्यांवर मातीचा थर देतात. बर्फाच्या दिवसात कांहीं घरें हिमशिलाच्या ( Avalanche ) तडाख्यांत सापडलीं तर त्याची दुर्दशा उडते परंतु घरांत साठविलेले कांबळ्याचे ढिगास कसर, वाळवी वगैर कधींहि लागत नाहीं. धान्यास बुरी वगैरे. कधींच येत नाहीं. आज दोन वाजल्यापासूनच हवा धुकट होऊन पुढें बर्फाची बुरबुर सुरू झाली होती. रात्रीं दूध घेतलें व झोपी गेलों.

## पुनरागमन.

## बदरीनाथपासून देवप्रयाग, १२५ मैल.

## सोमवार ता. ३१ जुलै १९३९, दिवस ५१ वा.

सकाळीं सहा वाजतां तप्तकुंडात स्नान केलें. खोलींत येऊन पूजा पोथी आटोपून बदरीनाथाचें निर्मळ दर्शन घेतले. आकाश निरभ्र व स्वच्छ असल्यामुळे तिन्ही बाजूंचीं हिमशृंगें स्पष्ट दिसत होतीं. ह्या रुपेरी हिमशृंगांच्या श्रेणीवर चकाकणारे सूर्यकिरण, पूर्वपश्चिमेच्या नरनारायण पर्वतावरून खालीं येणाऱ्या हिमनद्याचे (Glaciers) ओघ वगैरे पाहून मनाला

आल्हाद वाटत होता. ह्या भूवैकुंठांतील वास्तव्य तीन चार तासांत संपणार म्हणून मनास हुरहूर लागली होती व हिमालयांतील चारधामांच्या यात्रेची मनीप्सित कामना पूर्ण झाली ह्याबद्दल धन्यता वाटून दहा पंधरा दिवसात परमेश्वरकृपेनें मुलाबाळांत परत जाणार म्हणून मनास उत्साहहि वाटत होता. जेवण वगैरे आटोपून सुमारें साडेदहाला बदरीनाथपुरी येथून निघालों. देवदेखणीच्या जरा अलीकडेपावेतों पंडा दौलतराम बरोबर होता. तेथून तो परत फिरला. बदरीनाथांच्या देवालयावरील सुवर्ण घुमटाचे कळसाचे व भोवतालच्या हिमशृंगांच्या श्रेणींचें पुन्हा एकदा अवलोकन केले व खालच्या मार्गास लागलों. पूर्वी वर्णन केलेल्या मार्गानें सोळा मैल पुढे असलेल्या **बलदौरा** येथें साडेपांच वाजतां पोहोंचलों. दरम्यान घाटचट्टी व पंडुकेश्वर येथें थोडा पाऊस लागला. बलदौरा येथें काळीकमली वाल्याची नवीन बांधलेली धर्मशाळा आहे. ह्या धर्मशाळेत एका खोलींत मुक्काम केला. भोवतालचा देखावा अवलोकन करून रात्रीं खोलींत येऊन दूध घेतलें व झोपीं गेलों.

## मंगळवार ता. १ ऑगस्ट १९३९, दिवस ५२ वा.

बलदौरा येथून सकाळीं सहा वाजतां निघालों व **विष्णुप्रयाग** येथें सात वाजतां आलों अर्ध्या मैलवर असलेलें जोशीमठ सोडून **स्युंगधारा** येथें आठचे सुमारास पोहोचलों. येथें जरा विश्रांति घेत असतां शिलाजिताचे दुकानावर एका गृहस्थांस इंग्रजी वर्तमानपत्र वाचतांना पाहिलें. त्याच्यापासून तें वर्तमानपत्र थोड्या वेळाकरिता मागून घेतलें. हे वर्तमानपत्र ता. २५ जुलैचा मद्रास येथील "हिंदु" होतें. हृषीकेश सोडल्यानंतर एक महिना पंचवीस दिवसांनीं आज वर्तमानपत्राची गाठ पडली. पंधरा मिनिटें हे वर्तमानपत्र वाचून तें ह्या गृहस्थास परत केलें. ह्या वर्तमानपत्रावर " बदरीनाथ-जोशीमठ पुस्तकालय" असा शिक्का होता. हे गृहस्थ म्हणाले, " अर्ध्या मैलावर असलेल्या जोशीमठ येथें ह्या पुस्तकालयांत आपल्यास आणखी ताजीं वर्तमानपत्रे मिळतील. " पुढें पांच मैल असलेल्या हेलंग येथें मुक्कामास जावयाचें असल्याकारणानें त्या गृहस्थाचे आभार मानले व पुढच्या मार्गास लागलों. दहाचे सुमारास **हेलंग** ( कुम्हारचट्टी ) येथें पोंचलों. एका माडीवर मुक्काम केला. नळावर स्नान केलें. पूजा, पोथी, जेवण वगैरे उरकलें. येथपासून थंडी कमी झाली, उष्णता भासूं लागली. तीन वाजेपर्यंत विश्रांति

घेतली व त्या सुमारास हेलंग सोडलें. पातळगंगेजवळ साडे चारचे सुमारास आलों. कांहीं ठिकाणीं रस्ता तुटल्यामुळें तात्पुरती पायवाट करून रस्त्याची दुरुस्ती चालली होती. पायवाट फारच अरुंद व अवघड असल्यामुळें दंडी-वाल्यांच्या व नोकरांच्या साह्याने केवळ जगन्नियंत्याच्या कृपेने हा सुमारे दीड फर्लांगाचा अवघड रस्ता पार पडला. सहाचे सुमारास **तंगणी** येथें आलों. सकाळीं व संध्याकाळीं मिळून १९ मैलाचा प्रवास झाला. एका स्वच्छ चट्टीचे माडीवर मुक्काम केला. रात्रीं दूध घेतले व झोपीं गेलों.

## बुधवार ता. २ ऑगस्ट १९३९, दिवस ५३ वा.

तंगणी येथून सकाळीं साडेचारला निघालों व **सीयत्सेन** येथें आठ वाजता आलों. ७ मैल प्रवास झाला. एका स्वच्छ चट्टीच्या माडीवर उतरलो. पूजा, पोथी, जेवण वगैरे उरकून दोन वाजेपर्यंत विश्राति घेतली व नंतर सहा मैल पुढें असलेल्या **चमोली** ( लालसंगा ) येथें साडे चारचे सुमारास आलों. पुलाच्या अलीकडील रस्ता गोपेश्वरवरून केदारनाथकडे गेला आहे. १२० फूट लांबीचा अलकनंदेवरील लोखंडी झुलता पूल ओलांडून वस्तीचे सुरवातीस असलेल्या पोष्ट व तार ऑफिसात आलो. घरीं पत्र लिहून टपालांत टाकले. चमोली येथून पौरी ( ब्रिटिश गहरवाल प्रांताचें मुख्य ठिकाण ) येथें टपाल खेचरावर जातें व तेथून रानीखेतपर्यंत खेचरावर जाऊन रानीखेत-पासून मोटारनें पुढे जातें. पोस्ट ऑफिसांत ह्या प्रांताचे इन्स्पेक्टर ऑफ पोष्ट ऑफिसेस भेटले. कोण कोठूनचे वगैरे चौकशीनंतर त्यांनीं केदारनाथ येथे तारेची मनिऑर्डर उशिरानें मिळाल्यासंबंधानें आमच्या तक्रारीची गोष्ट काढली. ते म्हणाले कीं, गुप्तकाशीच्या पोष्टमास्तरानें पुरती रक्कम केदारनाथ येथें पाठविली नाहीं ही त्यांची चूक होती. मी त्याला त्या बाबतींत ताकीद दिली आहे. हे इन्स्पेक्टर सर्व प्रवास घोड्यावर करतात; दंडीनें प्रवास करणें त्यांना पत्करत नाहीं. कारण त्यांना फक्त चार रुपये रोजप्रमाणें कायम भत्ता मिळतो. तेवढ्यांत, घोड्याचा खर्च, घोडेवाल्याचा पगार व इतर खर्च भागवावा लागतो असें ते म्हणाले. साडेपांचला चमोली सोडली व साडेसहाला कुरेडा येथें आलों. रस्त्याच्या डावीकडे हिरव्यागार झुडपांनीं भरलेल्या पर्वताच्या टेकड्या असून उजवीकडे अलकनंदा वाहातांना दिसते. रस्ता रुंद असून चांगला बांधलेला आहे. दरम्यान पांच सहा ओढे पक्क्या बांधणीच्या पुलावरून ओलांडावे लागले. दोन ओढ्यांत डावीकडील पर्वताच्या टेकड्यांमधून खालीं

येणारे मोठे धबधबेहि दिसले. कुरेडा येथें एका स्वच्छ चट्टींत उतरलों. रात्रीं दूध घेतलें व झोपीं गेलों.

## गुरुवार ता. ३ ऑगस्ट १९३९, दिवस ५४ वा.

कुरेडा येथून सकाळीं पाच वाजता निघालों. पर्वताच्या बाजूनें नागमोडी उतरणीनें व रुंद दरींतून वाहणाऱ्या अलकनंदेच्या काठानें, **मैठा** येथें सहाचे सुमारास आलों. उंच उंच पर्वत आता मागे राहिले व बरेच खालीं आलों व त्यामुळें उष्ण वातावरणास सुरवात झाली. तीन चार ओढ्यांवरील पक्के पूल ओलांडून कुरेडापासून सात मैलावर असलेल्या **नंदप्रयाग** येथें आठचे सुमारास पोहोंचलों. नंदप्रयाग हे अलकनंदा व अलमोऱ्याकडून येणारी नंदगंगा याचे संगमावर जरा वरच्या बाजूस वसलें आहे. संगमापासून जवळच रुंद दरींत राजगिऱ्याचीं शेतें व त्याचे पलीकडे आम्र वगैरे मोठ्या वृक्षाची गर्द छाया असून त्या छायेत मोठ्या अश्वत्थाखालीं दोन शंकराचीं लहान देवळें व तीन-चार साधूंच्या कुटी आहेत. संगमावरील हे ठिकाण फारच रम्य आहे. कण्व-ऋषींचा आश्रम पूर्वीं येथेंच होता असें सागतात. राजगिऱ्याचीं शेतें व वृक्षाची गर्द छाया पाहतांना शाकुंतल नाटकातील " राजगिऱ्याचीं कणसें फुललीं... " ह्या दुष्यंतानीं केलेल्या कण्वाश्रमाचे वर्णनाची आठवण झाल्यावाचून रहात नाहीं. येथून सुमारें सात मैलांचे अंतरावर दशमौली महादेवाचें स्थान आहे. तेथें जाण्यास लहानशी पायवाट ( पगदंडी ) आहे. असें सांगतात कीं दशमौली अथवा दशौली येथें शंकरास प्रसन्न करून घेण्याकरितां रावणानें महान् तपश्चर्या केली होती. जुनी नंदप्रयागची वस्ती संगमाजवळ होती, परंतु ती वस्ती १८९४ सालीं आलेल्या गोहना महापुरात वाहून गेल्यावर हल्लीं नवीन नंदप्रयाग वरच्या बाजूस वसलें आहे. गावांत बरीच दुकानें व दुमजली घरें आहेत. पंडित मेहशा-नंद शर्मा यांचा " बदरीनाथ भक्तिरसामृत कार्यालय " नांवाचा शुद्ध शिला-जित बनविण्याचा मोठा कारखाना येथेंच आहे व हिमालयांतील इतर जिनसाचें त्यांचें दुकान बाजारांत आहे. पोष्ट व तार ऑफिसहि बाजारांतच आहेत. टेहरी सोडल्यानंतर येथें बाजारात मुसलमानाचें एक दुकान दिसलें. पौराणिक काळीं नंदराज नावाच्या राजाने येथें मोठा यज्ञ केला व विष्णूचें मंदिर बांधलें. तेवढ्या-वरून ह्या ठिकाणास नंदप्रयाग हें नांव पडलें असें सागतात. बाजारात एका दुकानाचे माडीवर उतरलों. संगमावर स्नान केलें, पूजा, पोथी, जेवण वगैरे

उरकून थोडी विश्रांति घेतली व अडीच वाजतां नंदप्रयाग येथून निघालों. पर्वतांच्या टेकड्यांच्या बाजूनें व पिंडरगंगेच्या कांठानें सुमारें दोन फर्लांग गेल्यावर लोखंडी तारांच्या झुलत्या पुलावरून नंदगंगा ओलांडल्यानंतर दोन रस्ते फुटतात. डावीकडचा रस्ता बराच पुढें पिंडरगंगेच्या कांठानें **रानीखेत अलमोराकडे** जातो व उजवीकडचा रस्ता अलकनंदेच्या कांठानें हृषीकेश हरद्वारकडे जातो. आम्ही उजवीकडच्या रस्त्याला लागलों. एक मैल पुढें असलेल्या **फोनला** चट्टी येथें तीनचे सुमारास आलों. दरम्यान थोडासा पाऊस लागला. येथून अलकनंदा जरा पलीकडे राहते व रस्ता मोठमोठ्या वृक्षांच्या छायेंतून व कांहीं फर्लांग राजगिऱ्याच्या शेतांचे बाजूनें गेला आहे. जरा पुढें गेल्यानंतर **सोनाला** चट्टी लागली. येथें पब्लिक वर्क्स इन्स्पेक्शन बंगला आहे. येथून सव्वा मैलपर्यंत थोडी चढण आहे. ही चढण संपतांच **भाटा** चट्टी लागते. नंतर सव्वा मैल पुढें गेल्यावर **लंगासू** चट्टी आहे. तेथें साडे पांचचे सुमारास पोहोंचलों. एका स्वच्छ चट्टींत मुक्काम केला. रात्रीं दूध घेतलें व झोंपी गेलों.

## शुक्रवार ता. ४ ऑगस्ट १९३९, दिवस ५५ वा.

लंगासू येथून सकाळीं पाच वाजता निघालों. एक खडकाळ पर्वत व अलकनंदा ह्या दोहोंच्या बाजूनें सव्वा मैल गेल्यावर **जैखंडी** चट्टी लागते. जैखंडी येथें येण्यापूर्वी एक मोठा ओढा सिमेंटच्या पुलावरून ओलांडावा लागतो; नंतर पुढें पाऊण मैलावर **उमेटा** चट्टी आहे. पुढें एक मैलावर आणखी एक ओढा सिमेंटच्या पुलावरून ओलांडल्यानंतर **कामलगेरी** चट्टी लागते. येथपासून रस्ता उंच पर्वताच्या बाजूनें जातो व रस्त्याच्या दुसऱ्या बाजूस अलकनंदा खालीं खोल दरींतून वाहतांना दिसते. आतांपर्यंत पांच मैलांची मजल झाली. पुढें आल्यावर अलकनंदा व कर्णगंगा (पिंडरगंगा) ह्यांच्या संगमावर असलेल्या **कर्णप्रयाग** ह्या ठिकाणीं साडेसातचे सुमारास पोहोंचलों. संगमाचे अलीकडे कर्णगंगेवरील (पिंडरगंगेवरील) लोखंडी झुलता पूल ओलांडल्यानंतर पलीकडे कर्णप्रयाग गांव आहे.

**आदिबद्री** हें ठिकाण येथून साडेआठ मैल आहे. तेथें सुमारें शंभर फुटांवरून पडणारा पाण्याचा सुंदर झोत आहे. संगमावर जाण्याकरितां दहा-पंधरा पायऱ्यांचा दगडी घाट उतरून खालीं जावें लागतें. खालीं उतरून संगमावर स्नान केलें. अलकनंदेचें बदरीनाथ येथून आलेलें शुभ्र पाणी येथें येई-

पर्यंत गढूळ झालेलें दिसतें. कर्णगंगेच्या पिवळट पाण्याच्या प्रवाहास अलकनंदेचें गढूळ पाणी अडवून पुढे जाताना स्पष्ट दिसतें. स्नान करून वर आल्यानंतर पुलाचे डावीकडे एका डोंगरावर वीसपंचवीस पायऱ्या चढून गेल्यानंतर एक सुंदर ऐसपैस सपाटी आहे. ह्या सपाटीवर तीन चार मोठे अश्वत्थवृक्ष आहेत. ह्या वृक्षांच्या गर्द छायेंत सुंदर दगडी देवालय असून आंत कर्ण, दुर्गादेवी व श्रीकृष्ण यांच्या कृष्ण पाषाणाच्या मूर्ति आहेत. राजा कर्ण यानें द्वापारयुगांत ह्या ठिकाणीं मोठा यज्ञ केला होता व सूर्यनारायणाची आराधना करून अजिंक्यत्व देणारीं कवच व कुंडलें मिळविलीं होतीं. हें ठिकाण समुद्रसपाटीपासून २३०० फूट उंचीवर आहे. कर्णप्रयागाची पंचप्रयागांत गणना होते. पंचप्रयाग म्हणजे देवप्रयाग,रुद्रप्रयाग, सोनप्रयाग, विष्णुप्रयाग व कर्णप्रयाग. ह्या रम्य सपाटीवर जरा फिरून नंतर खालीं आलों व पूल ओलांडून कर्णप्रयाग गांवांत शिरलों. गांवाचे सुरवातीस सरकारी दवाखाना व हॉस्पिटल, पोलिस स्टेशन, मिडल स्कूल वगैरे इमारती आहेत. जरा पुढें गेल्यावर मोठा बाजार आहे. पोस्ट व तार ऑफिस बाजारांत आहे. कांहीं दुकानात गंगोत्री येथील गंगाजळाचीं भांडी विक्रीस ठेवलेलीं असतात. गंगाजळ सांठविण्यासाठीं येथें मोठा गुदाम ( Godown ) बांधला आहे असें कळलें. परंतु त्यांत खरोखर गंगोत्रीचें जळ असतें किंवा कसें हें सांठविणारांस ठाऊक. येथें काळीकमलीवाल्याची मोठी धर्मशाळा आहे. दुरून ही धर्मशाळा दुमजली असावी असा भास होतो. परंतु तसें नसून हिच्या चार निराळ्या इमारती चार पठारांवर आहे. प्रत्येक इमारतीपुढें झाडें आहेत. खालचे इमारतींत दुकानें आहेत. वरच्या इमारतींत यात्रेकरूंची सोय आहे. व त्या इमारतीच्या वरच्या बाजूस घोड्यांचे तबेले आहेत. बाजारांत एका दुकानाचे बाजूस मुक्काम केला. पूजा, पोथी व जेवण उरकलें.आज सुमारें पावणेदोन महिन्यांनीं कर्णप्रयाग येथें भेंडी, वांगी, व टॉमेटो ह्या भाज्या मिळाल्या. कर्णप्रयागचे बाजारांतून गेलेला रस्ता पुढें राणीखेतकडे जातो व कर्णप्रयाग बाजूला सोडून दुसरा रस्ता हृषीकेश–हरद्वारकडे जातो. एक वाजेपर्यंत विश्रांति घेऊन कर्णप्रयाग सोडलें व हृषीकेश –हरद्वारच्या रस्त्याला लागलों. हा रस्ता पर्वताच्या बाजूनें गेला आहे. रस्त्याच्या दुसऱ्या बाजूस जरा पलीकडून अलकनंदा खोल दरींतून वाहातांना दिसते. चार मैल पुढें आल्यानंतर अलकनंदेवरील लोखंडी गर्डर्सचा पूल ओलांडून **चेतुवापीपल** चट्टीवर आलों. हें ठिकाण फार रमणीय

आहे. रस्त्याच्या दोन्ही बाजूंस अश्वत्थ ( पिंपळ ) वृक्षांची गर्द छाया आहे. कांहीं मोठ्या अश्वत्थांभोंवतीं पार बांधलेले आहेत. येथून एक मैल पुढें आल्यानंतर अलकनंदा सुमारें तीन फर्लांग पलीकडे राहते. अलकनंदेच्या पलीकडे भाताचीं व राजगिऱ्यांचीं शेतें असून त्याच्या पलीकडे उंच पर्वतांच्या रांगा आहेत. सुमारे दीडमैल पुढें आल्यानंतर रस्ता औरस चौरस दोन मैलांच्या मोठ्या मैदानांतून गेला आहे. ह्या मैदानास **गौचर** म्हणतात. कांहीं वर्षांपूर्वी अस्तित्वांत असलेल्या हिमालयन ट्रॅन्स्पोर्ट ॲण्ड सर्व्हे कंपनीचीं आकाशयानें ( Aeroplanes ) अथवा विमानें हरद्वारपासून गोचरपर्यंत यात्रेकरूस घेऊन येत असत, व येथून पुढें कंपनीच्या दंड्यांतून यात्रेकरू दोन तीन दिवसांत बदरीनाथ येथें जात असत. परंतु ह्या कंपनीनें आपले व्यवहार आतां आटोपते घेतले आहेत ( Voluntary liquidation ) व हल्लीं येथें कंपनीची फक्त एक मोठी हॉटेलसारखी इमारत शिल्लक आहे. कंपनी चालू असतांना येथें कंपनीच्या दंड्या व बरेच कूली असत. ह्या मैदानांतून जरा पुढें गेल्यावर गौचर गांव लागतो. गांवांत भोंवतालीं बगीच्या असलेलें कांहीं बंगले आहेत. गौचर येथें साडेचार वाजतां आलों. जरा पुढें गेल्यावर एक मोठी नदी पक्क्या दगडी पुलावरून ओलांडल्यानंतर रस्ता दाट जंगलांतून गेला आहे. सुमारें दोन मैल पुढें आल्यानंतर रस्ता अलकनंदेच्या कांठानें गेला आहे. एक मैल पुढें गेल्यावर **कामेरा** चट्टी आहे. येथें सहाचे सुमारास पोहोंचलों. आज दुपारीं एकंदर आठ मैल प्रवास झाला. येथें जोशी ब्रदर्स नांवाचें मोठें दुकान असून दुकानाचे बाजूस व वर हवाशीर उतरण्याच्या जागा आहेत. दुकानाचे माडीवर मुक्काम केला. रात्रीं दूध घेतलें व झोपीं गेलों.

## शनिवार ता. ५ ऑगस्ट १९३९, दिवस ५६ वा.

सकाळीं पांच वाजतां कामेरा सोडलें. एक मैल रस्ता पर्वताच्या टेकडीच्या बाजूनें व खोल दरींतून वाहाणाऱ्या अलकनंदेच्या कांठानें गेला आहे. नंतर पुढें शेतांनीं भरलेली विस्तीर्ण खिंड लागते. ह्या खिंडींत **नागासू** चट्टी व पब्लिक वर्क्स खात्याचा इन्स्पेक्शन बंगला आहे. येथपासून अलकनंदा ह्या विस्तीर्ण खिंडीमधून वाहातांना दिसते. चार मैल पुढें गेल्यावर सुरूंच्या दाट जंगलामधून रस्ता **शिवनंदी** चट्टी येथें येतो. येथें साडेसहाचे सुमारास आलों. ह्या चट्टीच्या खालच्या बाजूस लहानशा मैदा-

नांत देवदाराच्या व सुरूच्या तुळयांच्या उंच उंच ढिगांच्या रांगा लागल्या होत्या. अलकनंदेस पूर आला म्हणजे ह्या तुळया अलकनंदेंत टाकतात व त्या हरद्वारपर्यंत वाहून गेल्यावर तेथें ह्या तुळया काढून घेतात. पुढच्या एक मैल रस्त्याच्या बाजूस उंच उंच काटे निवडुंगाचा बेटें असून त्यांच्यामध्यें ठिकठिकाणीं शेतें आहेत. पुढें गोढरगड नांवाचा मोठ्या ओढ्यावरील पक्का पूल ओलांडल्यानंतर **गोढरगड** चट्टी लागते. येथें येईपर्यंत सातचा सुमार झाला होता. ह्या चट्टीसमोर हिरव्यागार शेतांनीं भरलेली सपाटी असून त्या सपाटीपलीकडून अलकनंदा वाहतांना दिसते. दोन फर्लांग पुढें गेल्यावर सोमापूर नांवाचा पूल ओढ्यावरून ओलांडावा लागतो. येथून अलकनंदेचें पात्र अरुंद झालें आहे व ती खडकाळ पर्वतामधील अरुंद व खोल दऱ्यांतून वाहतांना दिसते. एक मैल पुढें गेल्यानंतर अलकनंदेच्या पलीकडे काळ्या खडकाळ पर्वताच्या पायथ्याशीं कोटेश्वर महादेव नांवाचें दगडी सुंदर देवालय आहे. देवालयाचे नजीक मोठ्या वृक्षांच्या छायेंत धर्मशाळा आहे. जवळच एक गुंफा आहे. ह्या गुंफेचा प्रवेशमार्ग चौरसचौरस सुमारें तीन फूट आहे. परंतु आंत गेल्यानंतर तिची उंची साधारण पुरुषभर असून आंत सुमारें पन्नास माणसें बसतील अशी ऐसपैस जागा आहे. आंत बारीक दगडाचीं शिवलिंगें असून त्या लिंगांवर वरून सतत पाणी झिरपत असतें ! ह्या लिंगांची संख्या एक कोटी आहे असें सांगतात. दीड मैल पुढें आल्यानंतर अलकनंदेवरील लोखंडी झुलत्या पुलावरून एक रस्ता रुद्रप्रयागवरून परस्पर केदारनाथला जातो. हा रस्ता पुढें मंदाकिनीच्या बाजूनें गेला आहे. पुलांच्या अलीकडचा रस्ता रुद्रप्रयागवरून हृषीकेश-हरद्वारकडे जातो. आम्ही पुलाच्या अलीकडच्या रस्त्यानें **रुद्रप्रयाग** येथें साडेदहा वाजतां पोहोंचलों.

## रुद्रप्रयाग.

अलकनंदेवरील लोखंडी झुलता पूल ओलांडल्यानंतर रुद्रप्रयागची वस्ती लागते. पुलाच्या अलीकडे उजव्या बाजूचा रस्ता अलकनंदेच्या काठानें काळीकमलीवाल्याच्या धर्मशाळेकडे गेला आहे. ही धर्मशाळा पुलापासून एक फर्लांगावर अलकनंदेच्या कांठाला लागूनच आहे. अलकनंदेच्या पलीकडच्या बाजूला चारपांच पुरुष उंचीची काळ्या फत्तराची लांब पर्वताची रांग आहे. धर्मशाळेच्या पुढच्या खालच्या मजल्यावर दुकानें असून माडी-

वर यात्रेकरूंच्या उतरण्याची सोय आहे. धर्मशाळेजवळ दंड्या मिळण्याचें ठिकाण व कूली एजन्सी आहे. धर्मशाळेंत माडीवर अलकनंदेच्या बाजूच्या एका दालनांत मुक्काम दिला. व धर्मशाळेपासून एक फर्लांगावर असलेल्या अलकनंदा व मंदाकिनी यांच्या संगमावर स्नानास गेलों. संगमावर वरचे बाजूस गंगेचें चिरेबंदी सुरेख देऊळ असून ह्या देवळाचे बाजूनें खालीं संगमावर उतरण्यास उत्तम घाट बांधला आहे. पायऱ्यांच्या बाजूस लोखंडाचा मोठा साखळदंड लोखंडी खांबांना बांधला आहे.



## रुद्रप्रयाग.

सुमारें वीस पायऱ्या उतरून खालीं गेल्यावर मोठ्या जोरानें वाहात येणारें अलकनंदेचें गढूळ पांढरट पाणी थोड्या मंद गतीनें वाहात येणाऱ्या मंदाकिनीच्या हिरवट पाण्यास अडवून धरतांना दिसतें. दोन्ही वाहात्या प्रवाहांचा लढा चाललेला असतो, त्यामुळें संगमावर उंच उंच फेसाभरल्या लाटा उसळत असतात. त्यामुळें गुडघाभर पाण्यांतहि उतरणें अशक्य असतें. साखळदंडास धरून, पायरीवर बसून, तांब्यानें पाणी घेऊन स्नान करणेंच सुरक्षितपणाचें वाटतें. येथें स्नान करून वर आलों. गंगेचे देवळापासून दहा पंधरा पाउलाचे अंतरावर एका उंच टेकडीवर रुद्रेश्वर महादेवाचें देवालय आहे. वर जाण्यास मोठमोठ्या दगडी पायऱ्या बांधल्या आहेत. ह्या पायऱ्या चढून वर गेलें म्हणजे मोठी सपाटी आहे. ह्या सपाटीवर

रुद्रेश्वर महादेवाचें देऊळ असून बाजूस तीन चार उत्तम धर्मशाळा आहेत. धर्मशाळांच्या बाजूस पाण्याचा मोठा खजिना बांधला असून त्यांतील पाणी नळानें धर्मशाळांत व देवळासभोंवतील बगीच्यांत खेळविलें आहे. देवळासमोर दोनतीन रुद्राक्षांचीं झाडें आहेत. येथें सच्चिदानंद स्वामी नांवाचे एक जन्मांध सत्पुरुष राहतात. हे जरी जन्मांध आहेत तरी फार विद्वान् आहेत. मुंबई, कलकत्ता, नागपूर वगैरे मोठमोठ्या ठिकाणीं ह्यांचा शिष्य-संप्रदाय आहे.

येथील धर्मशाळा, गंगेचें देऊळ व घाट ह्यांनींच बांधविला. ह्यांनीं बराच प्रयत्न करून रुद्रप्रयाग येथें संस्कृत महाविद्यालय व दोन आयुर्वेदिक रुग्णालयें ( Hospitals ) बांधलीं आहेत. ह्या रुग्णालयास सरकारकडून मदतीदाखल ( grant-in aid ) दरसाल रु. ३००० मिळतात. स्वामी सच्चिदानंद यांनीं ही माहिती दिली. " आपण दृष्टि नसतां अध्ययन कसे केलेंत " असें विचारतां, हे म्हणाले, " परमेश्वरानें चर्मचक्षु दिले नाहींत तरी अध्ययनाची शक्ति दिली आहे. व त्याच्या कृपेनें सर्व ठीक चालत आहे. " "तुम्ही यात्रा पायानें करीत आहांत काय ? " स्वामीनीं विचारलें, " नाहीं. माझी दंडी आहे. ह्या वयांत उत्तरखंड-हिमालयांतील ही चार धामांची खडतर यात्रा माझ्यानें पायानें करणें अशक्य झालें असतें. " आम्हीं उत्तर दिलें. स्वामी म्हणाले, " फार उत्तम. तुम्ही दंडींतून प्रवास करीत आहांत, बरोबर नोकर व दोन बोजेवाले व चार दंडीवाले आहेत. आज तुमच्याकडून चार दंडीवाले, दोन बोजेवाले व नोकर अशा सात इसमांस व त्यांच्या कुटुंबास अन्न मिळत आहे, हें कांहीं थोडें नाहीं. पायानेंच यात्रा करून यात्रा घडतें असें नाहीं. " नंतर स्वामींनीं हिमालयांतील चार धामांच्या यात्रेसंबंधीं कांहीं संस्कृत श्लोक बोलून त्यांचा हिंदींत अर्थ सांगितला. स्वामीजवळ पाऊणतास काढून नंतर धर्मशाळेंत आलों. पूजा, पोथी व जेवण उरकलें. चार वाजेपर्यंत विश्रांति घेतली. व नंतर येथून निघून अलकनंदेवरील लोखंडी झुलता पूल ओलांडून रुद्रप्रयाग गांवांत शिरलों. गांवाचे सुरुवातीस पोष्ट व तार ऑफिस आहे. जवळच प्राथमिक शाळा असून पलीकडे बाजार व गांवाची वस्ती आहे. तिकडे न जातां गांवाच्या बाजूनें हृषीकेश-हरद्वारचा रस्ता आहे त्या रस्त्याला लागलों. सुमारें अर्ध्या मैलावर पक्क्या पुलावरून एक ओढा ओलांडल्यानंतर **गुलाबराय** चट्टी आहे. नंतर नागमोडी चढणीनें सुमारें

चार मैल आल्यानंतर रस्ता दाट जंगलामधून पर्वतांच्या माथ्यावर येतो. येथून पुढें सुमारें अडीच मैल उतरणीचें रस्त्यानें गेल्यानंतर **नारकोटा** चट्टी आहे. ही लहान चट्टी आहे. येथें साडेसहा वाजतां पोहोंचलों. नारकोटा येथें येण्यापूर्वी लोखंडी गर्डर्सच्या पुलावरून एक मोठा ओढा ओलांडावा लागतो. हा ओढा नारकोटा चट्टीच्या बाजूनें गेला आहे. अलकनंदा आतां बरीच मागें रहाते. आजची रात्र नारकोटा येथें रहाण्याचें ठरविलें. आजू-बाजूची वनशोभा पाहून चट्टींत आलों, दूध घेतलें व झोंपीं गेलों.

**रविवार ता. ६ ऑगस्ट १९३९, दिवस ५७ वा.**

नारकोटा सकाळीं पांच वाजतां सोडलें. पुढें दोन मैल रस्ता पर्वताच्या बाजूनें चढत गेला आहे. येथून अलकनंदा हिरव्यागार शेतांनीं व दाट जंगलांनीं आच्छादलेल्या पर्वताच्या खोल दऱ्यांमधून वाहातांना दिसते. तिसऱ्या मैलाच्या सुरुवातीस रस्ता पर्वताच्या माथ्यावर येतो व नंतर ह्या माथ्यावरील टेकड्यांमधून मुद्दाम खोदून केलेल्या मार्गानें जातो. ह्या ठिकाणास "**नारकोटकी चढाई**" म्हणतात. नंतर पुढें दीड मैल रस्ता उतरणीनें गेला आहे. येथें रस्त्याच्या बाजूस व पलीकडेहि बेलाचीं लहान-मोठीं झाडें आहेत. पुढचा रस्ता सुरूच्या जंगलामधून गेला आहे. कांहीं ठिकाणीं शेतेंहि आहेत. ओढ्यावरील पक्का पूल ओलांडल्यानंतर **खांखरा** चट्टी आहे. येथून पुन्हां दाट जंगलानें आच्छादित पर्वताच्या बाजूनें चढणीस सुरुवात होते. ह्या चढणीनें ह्या पर्वताच्या माथ्यावर आल्यानंतर पुढें रस्ता ह्या पर्वताच्या माथ्यावरील टेकड्यांमधून मुद्दाम खोदून पुढे नेला आहे. येथेंहि जंगल बरेंच दाट आहे.

सुमारें एक मैलपर्यंत येथें रस्ता सरळ आहे. येथून भोंवतालच्या पर्वतांचा व त्यांच्या खोल दऱ्यांतून नागमोडीनें वाहाणाऱ्या अलकनंदेचा भव्य देखावा पाहात राहावेंसें वाटतें. येथें सरकारी कूली एजन्सी व पब्लिक वर्क्स खात्याचा इन्स्पेक्शन बंगला आहे. येथून दोन फर्लांग पुढें रस्ता दाट जंगलांत उतरतो. येथून पुढें दोन मैल नागमोडी उतरण आहे. हा बहुतेक पर्वत सुरूच्या जंगलांनीं भरलेला आहे. अर्धा मैल पुढें गेल्यावर खिंडींतून वाहाणाऱ्या नदीच्या काठावर वसलेली **भाटीसेरा** चट्टी आहे. येथे आठ वाजता पोहोंचलों. चट्टीच्या बाजूला नदी आहे. ह्या नदींत स्नान केलें. पूजा, पोथी, जेवण वगैरे उरकून दोन वाजेपर्यंत येथें

विश्रांति घेऊन येथून निघालों. नदीवरील पक्का पूल ओलांडल्यानंतर सुमारें पाऊण मैल पुढें उतरणीनें गेल्यावर रस्ता सपाटीवरून जातो. ह्या सपाटीवर सुरूचीं झाडें व कांहीं ठिकाणीं शेतें आहेत. शेताच्या पलीकडे अलकनंदा खोल दरींतून वाहातांना दिसते. एक मैल पुढें आल्यावर एक नदी फरसाणा नावाच्या पुलावरून ओलांडावी लागते. येथून पुढें थोडी उतरण लागते. तीन मैल पुढें गेल्यावर **साक्रोता** चट्टी आहे. येथून रस्ता पुन्हां पर्वताच्या बाजूनें जातो. दुसऱ्या बाजूस अलकनंदा दरींतून वाहातांना दिसते. एक मैल पुढें गेल्यावर रस्ता रुंद खिंडीमधून जातो. ह्या खिंडींत निवडुंगाचीं बेटें व मधून मधून शेतें आहेत. एक मैल पुढे नुसत्या पांढऱ्या गोट्यांनीं भरलेली नदी पक्क्या पुलावरून ओलांडावी लागते. येथून पुढें रस्ता अलकनंदेच्या कांठानें गेला आहे. येथून पुढें अलकनंदेचें पात्र बरेंच रुंद आहे.

## श्रीनगर.

दोन मैल पुढें गेल्यानंतर रस्ता श्रीनगर गांवांतून जातो. श्रीनगर येथें साडेपाचला पोहोंचलों. ब्रिटिश गहरवाल प्रांताचें मुख्य ठाणें पौरी ह्या गांवाच्या खालोखाल, श्रीनगर हें आहे. येथील जुनी वस्ती गोहनापुरांत सर्व वाहून गेल्यानंतर हल्लींची नवीन वस्ती वसली आहे. गांवांत आपल्याकडील शहराप्रमाणें रुंद रस्ते व रस्त्यांच्या दोन्ही बाजूंस रुंद फूटपाथ बांधलेले आहेत. येथें म्युनिसिपालिटी आहे. एका मोठ्या चौकांत लहानसा म्युनिसिपालिटीचा बगीचा असून त्यांत कारंजा आहे. ह्या बगीच्याच्या चार बाजूंनीं चार मोठे रस्ते चार बाजुस जातात. चौकांत पोस्ट व तार ऑफिस आहे. चारहि रस्त्यांना मोठमोठीं दुकानें आहेत. गांवाच्या वरच्या बाजूस पर्वताच्या टेकडीवर सरकारी हायस्कूल व बोर्डिंग, संस्कृत पाठशाळा व पोलिस स्टेशन वगैरे सरकारी इमारती आहेत. गांवांत विजेचे दिवे आहेत. सिनेमा आहे. बाजारांत लक्ष्मीनारायणाचें देऊळ आहे. पूर्वींची वस्ती हल्लीं नवीन वसलेल्या वस्तीपासून दोन मैल पुढें होती. तेथें हल्लीं फक्त कमळेश्वर महादेवाचें देऊळ आहे. असें सांगतात कीं, पूर्वींची वस्ती पुरांत वाहून गेली त्या वेळीं हें देऊळ फक्त शिल्लक राहिलें होते. टेहेरीच्या महाराजांची कुलदेवता महालक्ष्मी हिचें देवालय येथून पांच मैलांवर आहे. गांवांत शिरतांना सुरवातीसच काळीकमलीवाल्याची मोठी धर्मशाळा आहे. ह्या धर्मशाळेंत माडीवर एका मोठ्या दालनांत मुक्काम केला. कमळेश्वर महादेवाचें देवालय उद्यां सकाळीं पाहावयाचे ठरविलें. बाजा-

रांत व गांवांतील इतर ठिकाणीं फिरल्यानंतर धर्मशाळेंत परत आलों. आज डेप्युटी कमिशनर यांचा मुक्काम येथें दौऱ्यावर आला होता त्यामुळें गांवांत बरीच गडबड होती. रात्रीं दूध घेतलें व झोपीं गेलों.

## सोमवार ता. ७ ऑगस्ट १९३९, दिवस ५८ वा.

सकाळीं पांच वाजतां अलकनंदेत स्नान केलें. अलकनंदा, धर्मशाळेच्या मागें एक फर्लांग दूर आहे. श्रीनगर येथून सहा वाजतां निघालों. गांवाच्या शेवटास सरकारी हॉस्पिटल व दवाखाना आहे. एक मैल पुढें गेल्यावर दोन रस्ते फुटतात. एक रस्ता येथून आठ मैल असलेल्या पौरीकडे जातो. व दुसरा जुन्या वाहून गेलेल्या वस्तींतून हृषीकेश–हरद्वारकडे जातो. ह्या रस्त्यानें एक मैल पुढें गेल्यावर कमळेश्वर महादेवाचें देऊळ आहे. येथें गुळगुळीत दगडाचें पाऊण फूट उंचीचें शिवलिंग मोठ्या दगडी शाळुंकेंत आहे. भोंवतीं दोन दोन हातांचे अंतरावर कृष्णपाषाणाचे आठ स्तंभ असून त्यांवर वाटोळा कृष्णपाषाणाचा घुमट आहे. १८९४ सालच्या गोहनमहापुरात ज्या वेळीं येथील श्रीनगर गांवाची वस्ती वाहून गेली त्या वेळीं फक्त हें देऊळ व ह्याच्या आसपासचे दोन तीन चबुत्रे मात्र शिल्लक राहिले असें सांगतात. देवळाच्या उजवीकडे एका माडीवर आद्य शंकराचार्यांची गादी आहे ही गादी मोठ्या दालनांत आहे. ह्या दालनापलीकडे दुसऱ्या खोलींत वीतभर लांबी रुंदीचे दोन ताम्रपट आहेत. ह्या ताम्रपटावर श्रीचक्र आहे. दुसरे दोन स्फटिकेचे पाव फूट परिघाचे व एक इंच जाडीचे दगड आहेत. ह्या दगडांवरहि श्रीचक्र आहे. हे ताम्रपट व स्फटिकेचे दगड दोन निराळ्या चौरंगांवर मांडले आहेत. हे आद्य शंकराचार्यांच्या वेळचे आहेत असें सांगतात. हे आम्हीं पाहिले त्या वेळीं चार पहाडी ब्राह्मण येथें पूजा व जप करीत होते. कमळेश्वराचे देवळापासून पंधरा वीस पावलांवर चौकोनी दगडाचा मोठा चबुत्रा आहे. व त्याजवर दगडाच्या पादुकांचा आकार आहे. कपिल महामुनि ह्यांनीं येथें तपश्चर्या केली असें सांगतात. ह्या चबुतऱ्यासमोर दुसऱ्या चबुतऱ्यावर चार दगडी स्तंभांचें देऊळ असून आंत शिवलिंग आहे. कमळेश्वर महादेवास बेल वाहून हीं ठिकाणें पाहिलीं व पुढचे मार्गास लागलों. प्रथम एक मोठी आंबराई लागते व नंतर उंच उंच निवडुंगाच्या बेटामधून दीड मैल पुढें गेल्यावर **सिटलोर्टी** चट्टी आहे. नंतर थोड्या चढणीस सुरवात होते. येथून रस्ता पर्वताच्या बाजूनें गेला असून रस्त्याच्या उजवीकडे खोल दरींतून

अलकनंदा वाहतांना दिसते. अलकनंदेपलीकडे कीर्तिनगरच्या तीन तीन चार चार मजली सफेत रंगाच्या इमारती दिसतात. तीन मैल पुढे गेल्यावर **भिल-केदार** अथवा भिलप्रयाग नांवाचें क्षेत्र आहे. तेथें दहा वाजतां पोहोंचलों. येथें दोन तीन चट्ट्या व एक दुकान आहे. चट्टीपासून पंधरा वीस कदमांवर जरा उंच टेकडीचे सपाटीवर भिलेश्वर महादेवाचें लहानसें देऊळ आहे. देवळांत शिवलिंग आहे. देवळाच्या डावीकडे चौकोनी दगडावर दोन अडीच फूट लांबीचें व दीड वीत रुंदीचें उजवें पाऊल उठलेलें दिसतें. हें अर्जुनाचें पाऊल आहे असें सांगतात. येथें अर्जुनाची भिल्लाच्या वेषांत असलेल्या शंकराशीं लढाई झाली. लढाईंत अर्जुनाचें शौर्य पाहून शंकर प्रसन्न झाले व त्यांनीं अर्जुनास प्रत्यक्ष दर्शन दिलें. तेव्हांपासून हें शिवलिंग व अर्जुनाचे दगडावर उमटलेलें उजवें पाऊल येथें आहे असें म्हणतात. देवळासमोर पितळेचा नंदी आहे. जवळच मोठ्या अश्वत्थाखालीं पार्वती, गणपति व दुसऱ्या दोन तीन दगडी मूर्ति आहेत. ह्या टेकडीवरील सपाटीच्या बाजूनें गांडीवगंगा नांवाची नदी वरून वाहात येऊन चट्टीच्या जरा खालीं अलकनंदेस मिळते; म्हणून ह्या ठिकाणास भिलप्रयाग अथवा भिलकेदार म्हणतात. संगमावर स्नान केलें, पूजा, पोथी, जेवण आटोपलें व थोडी विश्रांति घेऊन चारचे सुमारास भिलकेदार येथून निघालों. चट्टीपासून जरा पुढें असलेला गांडीवगंगेवरील लोखंडी पूल ओलांडल्यानंतर रस्त्याच्या बाजूस मोठालीं निवडुंगाचीं बेटें आहेत व पुढें आंबराई असून पलीकडे रस्त्याच्या दोन्ही बाजूंस शेतें आहेत. उजवीकडून वाहाणाऱ्या अलकनंदेच्या पलीकडेहि बरींच शेतें दिसतात. पुढें चार मैल ,रस्ता सरळ गेला आहे. पांचव्या मैलापासून पर्वताच्या बाजूनें चढणीस सुरवात होते. उजवीकडे अलकनंदा हिरव्यागार शेतांनीं भरलेल्या रुंद खिंडीमधून वाहात जाते. नंतर रस्ता पर्वताच्या माथ्यावरील हिरव्यागार झुडपानीं भरलेल्या टेकड्यामधून पुढें गेला आहे. येथून सुमारें एक मैल पुढें गेल्यावर थोड्या उतरणीनंतर रस्ता रुंद खिंडीमधून गेला आहे. रस्त्याच्या दोन्ही बाजूंनीं वनस्पतींचीं बरींच झुडपें व मोठालीं झाडें आहेत. पुढें अर्ध्या मैलावर एक कोरडी पडलेली नदी लोखंडी पुलावरून ओलांडावी लागते. नंतर पुढच्या अर्ध्या मैलावर दगडी पक्का पूल ओलांडावा लागतो. हा पूल ओलांडल्यानंतर लागलीच **रामपूर** चट्टी आहे. येथे चार पांच चट्ट्या व दोन दुकानें आहेत. येथें सात वाजतां

पोहोंचलों. वर जाणाऱ्या यात्रेकरूंची येथे बरीच गर्दी होती. रात्रीं दूध घेतलें व झोपीं गेलों.

## मंगळवार ता. ८ ऑगस्ट १९३९, दिवस ५९ वा.

रामपूर येथून सकाळीं पांच वाजतां निघालों. रस्ता पर्वताच्या बाजूनें गेला आहे. उजवीकडे हिरव्यागार दरींतून अलकनंदा वाहातांना दिसते. एक मैलानंतर 'बोवारी' नांवाचा दगडी पक्का पूल ओलांडावा लागतो. अर्धा मैल पुढें **कोल्टा** चट्टी आहे. येथे पब्लिक वर्क्स खात्याचा इन्स्पेक्शन बंगला आहे. बसमती नांवाच्या उत्तम सुगंधी तांदुळाच्या जातीबद्दल कोल्टा हें फार प्रसिद्ध आहे. बसमती तांदुळासारखा गोड सुगंधी व लांबट तांदूळ सर्व हिंदुस्थानांत दुसरीकडे कोठेंहि होत नाही, अशी ह्या तांदुळाची ख्याति आहे. एक मैल पुढें **राणीबाग** चट्टी आहे. ही बरीच मोठी चट्टी आहे. राणीबाग चट्टीच्या बाजूनें अलकनंदा खोल दरींतून वाहाते. पुढें थोडी उतरण लागते. येथून अलकनंदेच्या पलीकडे, देवप्रयागपासून कीर्तिनगर-पर्यंत नवीन तयार झालेला मोटारचा रस्ता दिसतो. हा मोटारचा रस्ता रुद्रप्रयागपर्यंत नेण्याची टेहेरी दरबारनें योजना केली आहे. ही योजना फलद्रूप झाली तर हृषीकेशपासून रुद्रप्रयागपर्यंत यात्रेकरूंस मोटारनें जातां येईल व तेथून तीन चार दिवसांत बदरीनाथ येथें जातां येईल. तीन मैल पुढें गेल्यावर हिरव्यागार झुडपांनीं भरलेल्या सुंदर खिंडीमधून रस्ता गेला आहे. ह्या खिंडीच्या सभोंवतीं हिरव्यागार दाट रानांनीं भरलेले पर्वत आहेत. पुढें एक मैलाच्या उतरणीनंतर रस्ता अलकनंदेच्या अगदीं कांठानें गेला आहे. येथें पलीकडच्या बाजूस जाण्याकरितां जुन्या तऱ्हेचा शिंक्याचा पूल आहे. हा पूल म्हणजे दोन कांठावरील दोन उंच व मजबूत लांकडी खांबांना जाड लोखंडी तार बांधलेली असते. खांबाच्या खालच्या बाजूस काथ्याच्या बळकट दोरांची सुमारें सहा सात फूट रुंदीची जाळी बांधलेली असते. एका लहान खाटेला चार बाजूंस दोर बांधून ती खाट लोखंडी तारेस टांगलेली असते. ह्या खाटेस दोन बाजूंस दोन लांब दोर बांधलेले असतात. ज्या किनाऱ्यास जावयाचें असेल त्या किनाऱ्याच्या बाजूचा दोर किनाऱ्यावरील माणसें ओढतात व खाट त्या किनाऱ्यास जाते. खाटेवर एका वेळीं दोहोंपेक्षां जास्त मनुष्यें बसत नाहींत. ह्या खाटेस 'शिंकें' म्हणतात. दोन पहाडी बसलेली खाट पलीकडे ओढून नेत असतांना

आम्हांस प्रत्यक्ष दिसली. पुढें सरस्वती नदी कोलसन नावाच्या पक्क्या पुलावरून ओलांडल्यानंतर **कोलसन** चट्टी आहे. ही लहानशी चट्टी असून येथें एक दुकान आहे. येथें आठचे सुमारास पोहोंचलों. चट्टींत उतरलों. सरस्वती नदींत स्नान केले. पूजा, पोथी व जेवण उरकलें व दोन वाजता कोलसन सोडलें. दीड मैल पुढें **सीताकोटी** चट्टी आहे. चट्टीच्या खालच्या बाजूस अलकनंदेच्या कांठावर रामाचें जुने देऊळ आहे. एक मैल पुढे रस्त्याच्या वरच्या बाजूस आम्रवृक्षाच्या व अश्वत्थाच्या गर्द छायेखालीं लहानशा बगीच्यांत सत्यनारायणाचे देऊळ आहे. देवळाजवळ प्रेमदास नांवाच्या साधूची पर्णकुटी आहे. ह्या ठिकाणास गंगादेवी घाट असें म्हणतात. एक मैल पुढें गेल्यानंतर देवप्रयाग येथील वस्तीस सुरवात होते.

## देवप्रयाग.

येथें चार वाजता पोहोंचलों. सुरवातीसच काळीकमलीवाल्याची मोठी धर्मशाळा आहे. अलकनंदेच्या कांठावरील धर्मशाळेच्या एका अलग इमारतीच्या माडीवर मुक्कामास उतरलों. धर्मशाळेपासून जरा वरचे बाजूस टपाल व तार ऑफिस आहे. तेथें जाऊन घरची आलेलीं पत्रें घेतलीं. धर्मशाळा, पोष्ट व तार ऑफिस व इतर कांहीं घरें व दुकानें वगैरे अलकनंदेच्या ह्या किनाऱ्यावर वसलेली वस्ती ब्रिटिश हद्दींत येते व अलकनंदेवरील लोखंडी झुलता पूल ओलांडून गेल्यावर पलीकडच्या किनाऱ्यावरील दोन दोन तीन तीन मजल्यांचीं पंडे लोकांचीं घरें व अलकनंदेच्या कांठचा मोठा बाजारहि टेहेरी संस्थानचे हद्दींत आहेत. देवप्रयागच्या दुसऱ्या बाजूनें गंगोत्री येथून येणारी भागीरथी व बदरीनाथ येथून येणारी ही अलकनंदा ह्यांचा येथें संगम झाला आहे व येथून पुढे हृषीकेश-हरद्वारकडे गेलेल्या भागीरथीस गंगा म्हणतात. केदारनाथकडून येणारी मंदाकिनी रुद्रप्रयाग येथें अलकनंदेस मिळते व अलकनंदा देवप्रयाग येथें भागीरथीस मिळते. पुलाचे अलीकडील बाजारांत व इतर ठिकाणीं फिरलों व नंतर धर्मशाळेंत आलों. रात्रीं दूध घेतले व झोपीं गेलों.

### बुधवार तारीख ९ ऑगस्ट १९३९. दिवस ६० वा.

सकाळीं सहा वाजता उठून अलकनंदेवरील लोखंडी झुलता पूल ओलांडून देवप्रयागच्या पलीकडील वस्तींत गेलों. ही वस्ती भागीरथी व अलकनंदा ह्यांच्या

संगमापासून जरा वरच्या बाजूला बसली आहे. येथून भागीरथीच्या बाजूनें एक रस्ता टेहेरीवरून यम्नोत्तरीस गेला आहे व दुसरा अलकनंदेच्या बाजूनें थेट बदरीनाथला गेला आहे. देवप्रयाग हें बदरीनाथच्या पंड्यांचें मुख्य ठिकाण आहे. येथें पंडे लोकांनीं आपापल्या धनिक यजमानांकडून दोन दोन, तीन तीन मजली इमारती बांधून घेतल्या आहेत. येथें रघुनाथ–कीर्ति–महाविद्यालय म्हणून संस्कृत महाविद्यालय आहे. इंग्रजी–संस्कृत हायस्कूल आहे. इंग्रजी–हिंदी मिडल स्कूल आहे. टेहेरी दरबारची कूली एजन्सी ह्या वस्तींत आहे व ब्रिटिश सरकारची कूली एजन्सी पुलाच्या अलीकडील ब्रिटिश हद्दींत आहे. येथें दंड्याहि मिळतात. कांहीं यात्रेकरू हृषीकेशपासून येथें मोटारनें येतात व येथून पुढें जाण्यास दंडी ठरवितात. अलकनंदेचे



**देवप्रयाग.**

पुलापलीकडे अलकनंदेंत उतरण्याकरितां मोठा घाट बांधलेला आहे. संगमावरहि मोठा घाट आहे. घाटावर पायऱ्यांच्या बाजूस लोखंडी साखळदंड आहे. ह्या घाटावर अलकनंदा व मंदाकिनी यांच्या जोराच्या प्रवाहांचा लढा चाललेला असतो व त्यामुळें संगमावर मोठमोठ्या लाटा उसळतांना दिसतात. गंगोत्रीकडून येणाऱ्या भागीरथीचा प्रचंड प्रवाह अलकनंदेच्या जोरानें वाहणाऱ्या प्रवाहास अडवून पुढें जातांना दिसतो. संगमाच्या भोंवतीं दोन तीन पुरुष उंचीचे प्रचंड खडक आहेत. ह्या खडकांत मोठाल्या गुंफा

आहेत. त्यांपैकीं दोन तीन गुंफांमध्यें तीस चाळीस मनुष्यें मावतील इतकी जागा आहे. संगमाचें पाणी कमी होऊन ह्या गुंफा कोरड्या झाल्यानंतर कांहीं संन्याशी त्यामध्यें राहातात. भागीरथीच्या पलीकडच्या बाजूस दशरथाचल नांवाचा उंच पर्वत आहे. ह्या पर्वतावर राजा दशरथानें तपश्चर्या केली होती असें सांगतात. ह्या पर्वताचे माथ्यावर राजा दशरथाची दगडी मूर्ति आहे. ह्या पर्वताचे वरच्या बाजूनें येणारी शांता नांवाची नदी खालीं भागीरथीस संगमापासून अर्धा फर्लांग अलीकडे मिळते. संगमाचे घाटावरून सुमारें १०० पायऱ्यांवर चढून गेल्यावर रघुनाथाचें मोठें देऊळ आहे. त्याच्या बाजूंस शंकराचें, गरुडाचें वगैरे देवळें आहेत. संगमावर स्नान केलें व देवळें पाहून धर्मशाळेंत परत आलों. पूजा, पोथी, जेवण वगैरे आटोपून जरा विश्रांति घेतली.

एका दंडीवाल्यानें यम्नोत्री येथें दहा रुपये जास्त मागितले व ते देण्याचे नाकारल्यामुळें तो यम्नोत्रीस आम्हांस अडचणींत सोडून खालीं निघून गेला वगैरे बाबतींत आम्ही गुप्तकाशी येथून टेहेरीचे इन्स्पेक्टर जनरल ऑफ पोलिस यांस पत्र पाठविलें होतें. तेवढ्यावरून देवप्रयाग येथील पटवारी ( पोलिस पाटील ) ह्या बाबतीची चौकशी करण्याकरितां दुपारीं आमचेकडे आला. त्यानें दंडीवाल्यास बोलावून आणलें. व जो दंडीवाला यम्नोत्री येथें रु. १० जास्त मागत होता. त्याला म्हणाला कीं, तूं बाबूजींना यम्नोत्री येथें अडविलेंस त्याबद्दल बाबूजींजवळून तक्रार अर्ज घेऊन तुला गिरफदार करून तहसीलांत पाठविण्याबद्दल मला हुकूम झाला आहे. हें ऐकिल्यावर तो दंडीवाला आमची माफी मागूं लागला. तो म्हणाला, " मला दहा रुपये जास्त देऊं नका व मी कराराप्रमाणें हृषीकेशपर्यंतहि येण्यास तयार आहे. " बाकीचे दंडीवालेहि वठणीवर आले व म्हणाले, " त्रिजुगीनारायण व तुंगनाथ ह्या क्षेत्राबद्दल जादा बक्षीस मागत होतों तें आम्हांस नको. आम्ही कराराप्रमाणें हृषीकेशपर्यंत येण्यास तयार आहोंत. तुम्ही येथून मोटारनें हृषीकेशला जाणार असल्यास येथून हृषीकेशपर्यंतचे ४४ मैलांचे मैलास चार आणेप्रमाणें, आमचे पैसे कापून घेऊन आमचा हिशेब दिलात तरी आम्हांस कबूल आहे." दंडीनें येथून हृषीकेशला जाण्यास आणखी पांच दिवस लागले असते व मोटारनें हृषीकेशला तीन तासांत जातां येतें. एकसारखा दोन महिने झालेल्या दंडीच्या प्रवासाचा आम्हांसहि कंटाळा

आला होता. तेव्हां आम्ही मोटारनें हृषीकेशला जाण्याचें ठरविलें व कराराप्रमाणें रु. १९० मधून मैलास चार आणेप्रमाणें ४४ मैलांचे पैसे व दंडीवाल्यास वेळोवेळीं वाटेत दिलेले पैसे बाद करून बाकीचे पैसे पटवारी याचे समक्ष दंडीवाल्यांस देऊन त्यांचे आंगठे रिसीटवर घेतले व बिथरलेल्या दंडीवाल्यानें झालेल्या तकसीराबद्दल माफी मागितली आहे तेव्हां त्या संबंधानें आम्ही पुढें जाऊं इच्छित नाहीं असा पटवारी याजकडे चौकशीकरितां आलेल्या प्रकरणावर शेरा दिला. संध्याकाळीं देवप्रयाग येथील बाजारांत जरा फिरलों. येथें बाजाराचे जरा पलीकडे दरबारचें हॉस्पिटल व पोलिस स्टेशन व तहसील कचेरी आहे. देव नांवाच्या ऋषीनें ह्या ठिकाणीं तपश्चर्या केली होती तेवढ्यावरून त्या ठिकाणास देवप्रयाग म्हणतात असें कळलें. रात्रीं दूध घेतलें व झोपीं गेलों.

## गुरुवार ता. १० ऑगस्ट १९३९, दिवस ६१ वा.

सकाळीं संगमावर स्नान केलें. पूजा, पोथी व जेवण उरकलें. उद्यां सकाळीं सर्व्हिस मोटारनें हृषीकेश येथें जाण्याचें ठरविलें. सामानहि मोटारनें नेण्याचें ठरविलें. बोजेवाले सामान हृषीकेशपर्यंत नेण्यास तयार होते, परंतु नोकरहि आमचे बरोबर मोटारनें येणार होता. तेव्हां सामान बोजेवाल्यावर विसंबणें योग्य वाटलें नाहीं. करितां त्यांनीं पहाडी रस्त्यानें येऊन तिसरे दिवशीं हृषीकेश येथें आम्हांस भेटावें असें ठरविलें. येथें दंड्या फारच पाडून विकत घेतात असें कळलें. तेव्हां आम्ही आमची दंडी काळीकमलीवाला क्षेत्राचे येथील व्यवस्थापक यांचे ताब्यांत क्षेत्रास बक्षिस म्हणून दिली. "धर्मशाळेंत एखादा यात्रेकरू बेमार झाल्यास त्याला हॉस्पिटलमध्यें नेण्यास या दंडीचा आम्हांस फार उपयोग होईल." असें ते व्यवस्थापक म्हणाले. उद्यां सकाळीं निघण्याची तयारी केली. रात्रीं दूध घेतलें व झोपी गेलों.

## शुक्रवार ता. ११ ऑगस्ट १९३९, दिवस ६२ वा.

देवप्रयाग येथून सर्व्हिस मोटारनें सकाळीं सात वाजतां निघालों. येथून हृषीकेश मोटार–रस्त्यानें ४८ मैल आहे. भाडें प्रत्येक मनुष्यास रु. ४ पडतें. रस्ता बराच रुंद असून चांगला बांधलेला आहे. भागीरथीवरील लोखंडी झुलता पूल ओलांडल्यानंतर हा रस्ता सुरू होतो. रस्ता नागमोडीनें भागीरथीच्या बाजूनें गेला आहे. हृषीकेश येथें पोहोंचेपर्यंत चार लोखंडी पूल

लहान लहान नद्यांवरून ओलांडावे लागतात. दोन तीन ठिकाणीं रस्त्यावर पहाडावरील दगड येऊन एखादे वेळीं रस्ता अडला जातो. परंतु ह्या ठिकाणी दरबारनें कूलींच्या चौक्या ठेवल्या असल्यामुळें ते कूली लागलीच रस्ता मोकळा करतात. भागीरथीच्या बाजूस रस्त्याला तीन फूट उंचीचा पक्का बांध बांधला आहे. मोटार ड्रायव्हर्स मोटार फारच हुशारीनें व सावधगिरीनें चालवितात. त्यामुळें अद्यापपावेतों केंव्हांहि अपघात झाल्याचें ऐकिवात नाहीं. रस्त्यानें भोंवतालच्या पहाडांचा सुंदर देखावा दिसत असतो. हृषीकेश येथें दहा वाजतां पोहोंचलों. काळीकमलीवाले यांचे क्षेत्रांत अधिक श्रावण मासामुळें बरीच गर्दी होती. तथापि आम्हांस एका धर्मशाळेच्या तिसऱ्या मजल्यावर चांगली जागा मिळाली. मोठा हॉल, स्वयंपाकाची खोली व पुढें गच्ची अशी जागा होती तेथें मुक्काम केला. पोष्ट ऑफिसांत जाऊन टपाल घेतलें. गंगेवर जाऊन स्नान केले. पूजा, पोथी, जेवण वगैरे उरकलें. उद्यांचा दिवस येथें विश्रांति घेऊन परवां रविवारीं सकाळीं येथून निघण्याचा बेत केला. संध्याकाळपर्यंत विश्रांति घेतली. संध्याकाळीं गंगेवर व बाजारांत फिरलों. दूध घेतलें व झोपी गेलों.

## शनिवार ता. १२ ऑगस्ट १९३९, दिवस ६३ वा.

सकाळीं गंगेंत स्नान केलें. पूजा, पोथी व जेवण उरकलें. थोडी विश्रांति घेऊन टपाल लिहिलें. बोजेवाले तिसरे प्रहरीं येथें येऊन पोहोचले. त्यांचा हिशेब चुकता करून त्याचे आंगठे पावतीवर घेतले. आज दुपारपासून येथें पाऊस लागला होता. संध्याकाळीं हवा स्वच्छ झाली. गंगेवर व बाजारांत जरा फेरफटका करून दूध घेतलें व झोपी गेलों.

## रविवार ता. १३ ऑगस्ट १९३९, दिवस ६४ वा.

हृषीकेश येथून सकाळीं ९ वाजतां मोटारनें निघालों. हरद्वार येथें १० वाजतां पोहोंचलों. अधिक श्रावण मासामुळें येथील सर्व धर्मशाळा भरल्या होत्या व जिकडे तिकडे फारच गडबड होती. पंडा कुंभकर्ण यानें आपल्या ऑफिसांत उतरण्याची सोय केली. हरी–की–पायरीवर गंगेचें स्नान केलें. पूजा, पोथी वगैरे आटोपून पंडा कुंभकर्ण यांचे येथें जेवण घेतलें. नोकराचा हिशेब चुकता करून त्याची पावती घेतली. थोडी विश्राति घेऊन संध्याकाळीं हरद्वार स्टेशनवर आलों. रात्रीं साडे आठचे गाडीनें निघून

दोन वाजतां अंबाला येथें आलों व २–२५ च्या गाडीला तेथून निघून ३–५ ला कुरुक्षेत्र येथे आलो. स्टेशनाचे पलीकडे कलकत्तेवाल्याची धर्मशाळा आहे. तेथे एका खोलीत सामान ठेवून चौकांत तेथील चौकीदाराने दिलेल्या खाटेवर झोंपीं गेलों.

## सोमवार तारीख १४ ऑगस्ट १९३९, दिवस ६१ वा.

सकाळीं दूध घेऊन पंडा राजाराम नावाच्या कुरुक्षेत्र येथिल पंड्याबरोबर टांग्यानें प्रथम स्टेशनपासून दोन मैलांवर असलेल्या सूर्यकुंडाजवळ आलों. स्टेशनापासून कुरुक्षेत्र येथील ह्या निरनिराळ्या कुंडाना चागला रस्ता गेला आहे. सूर्यग्रहणात कुरुक्षेत्र येथें फार मोठी यात्रा भरते. सूर्यग्रहणांत ह्या ठिकाणी सुवर्णदानाचें फार महत्त्व आहे, अशी समजूत आहे. हे सर्व रस्ते त्या यात्रेकरिता केले आहेत. रस्त्याचे सुरवातिसच "Way to the sacred Tanks" ( पवित्र तीर्थांचा रस्ता ) म्हणून पाटी आहे. सूर्यकुंड हें बरेंच मोठें बाधलेले तळें आहे. पाणी स्वच्छ असून ह्याच्या मध्यभागात सुंदर तांबडीं पाढरी कमळे आहेत.

सूर्यकुंडापासून जरा वरच्या बाजूस लक्ष्मीनारायणाचें देऊळ आहे. देवळापासून थोड्या अंतरावर काळीकमलीवाला संस्थेचे संस्कृत विद्यालय व धर्मशाळा आहेत. सूर्यकुंडांत स्नान केले व नंतर बरेंच पुढें गेल्यावर कुरुक्षेत्र कुंड नावाचा चार मैल परिघाचा मोठा तलाव लागला. ह्या तलावाच्या बाजूनें तीन मैल पुढें गेल्यावर बाणगंगा नावाचें धनुष्याकाराचें कुंड आहे. ह्या कुंडाचें पाणी फारच स्वच्छ असून आत वीत दीड वीत लांबीचे काळे मासे आहेत. भीष्म शरपंजरीं पडले असता त्यांच्याकरितां अर्जुनानें जमिनींत बाण मारून गंगा आणली. ते हें कुंड आहे असें सांगत. कुंडाचे जरा वरच्या बाजूस एक सपाटी आहे. त्या सपाटीवर भीष्म शरपंजरीं पडले होते असें म्हणतात. हल्लीं ह्या सपाटीवर देवळांत भीष्म शरपंजरीं पडलेले, बाजूस पांडव, कौरव उभे आहेत अशीं मातीचीं चित्रें आहेत. तेथून दोन मैल पुढें गेल्यावर एका लहान सपाटीवर श्रवणनाथाचें देऊळ आहे. ह्या ठिकाणीं संजयानें धृतराष्ट्रास कृष्णार्जुनांचा गीतेंतील संवाद कथन केला असें सांगतात. श्रवणनाथाचे देवळापासून वीसपंचवीस कदमांवर गीताभुवन म्हणून सुंदर दगडी इमारत आहे. हें गीताभुवन रेवाच्या माजी महाराजानीं बांधलें आहे. गीताभुवनात भगवत्गीतेचीं निरनिराळ्या

अठरा भाषेंत झालेलीं भाषांतरें; संस्कृत वाङ्मयांवरील जुने ग्रंथ व ताडपत्रें वगैरे आहेत. दोन तीन विद्वान् शास्त्री व्यवस्थापक म्हणून ठेविले आहेत. येथून पाव मैल पुढें एका सपाटीवर जेथें अर्जुनाचा रथ उभा होता व जेथें श्रीकृष्ण व अर्जुन यांचा गीतेंत सांगितलेला संवाद झाला तें ठिकाण आहे. ह्या ठिकाणीं मोठमोठे वटवृक्ष, अश्वत्थ व आम्रवृक्ष आहेत. ह्या वृक्षांच्या छायेंत गीतेचें लहानसें सुंदर देवालय आहे.

ह्या देवालयाच्या कोनशिलेवर " हें देवालय इ. स. १९२४ सालीं अंबाला प्रांताचे कमिशनर दिवाण टेकचंद यांनीं उघडलें " असें लिहिलें आहे. ह्या सपाटीच्या बाजूस जोतेश्वरकुंड नांवाचा स्वच्छ पाण्याचा तलाव आहे व तलावाच्या डावीकडे जोतेश्वर महादेवाचें देऊळ आहे. येथून दोन मैलांवर दुसऱ्या बाजूस थानेश्वर महादेवाचें देऊळ व सरस्वतीकुंड आहे. ह्या देवळांतील शिवलिंगाचें दर्शन घेऊन नंतर कौरवपांडवांनीं व त्यांच्या सैन्यातील इतर योद्धयांनीं महायुद्धास सुरवात केली असे सांगतात. ह्या देवालयाच्या चार भिंतींवर महाभारतातील कांहीं रंगविलेलीं चित्रें आहेत येथें शंकराचार्यांची गादी व दंडीस्वामी यांचा मठ आहे. दंडीस्वामींच्या हल्लींच्या शिष्यानें येथें संस्कृत विद्यालय काढलें असून ह्या विद्यालयात विद्यार्थ्यांची जेवणाची सोय आहे. येथून अर्ध्या मैलावर पार्वतीचें देऊळ आहे व ह्या देवळासमोर एक विहीर आहे. दक्षकन्या पार्वती शंकरासह आपल्या भगिनीच्या विवाहाकरितां आली असता तेथें शंकराचा झालेला अपमान पार्वतीस सहन न झाल्यावरून ती रागानें पृथ्वीचा नाश करण्याच्या हेतूनें निघाली असतां शंकर तिला अडविण्याकरितां तिच्या पुढें आडवे पडले. पार्वती त्यांना लाथाडून पलीकडे जात असतां तिनें शंकरास ओळखलें व तिला पश्चात्ताप झाला. त्यावेळीं तिनें आपले पाय ह्या विहिरींत सोडले. व त्यामुळें पृथ्वीचा बचाव झाला. पार्वता शंकरास लाथाडून जात आहे असें मातीचें चित्र देवळांत आहे. राजा दक्ष याची मूर्तीहि देवळांत आहे. हीं सर्व ठिकाणें पाहून ठाणेश्वर ( कुरुक्षेत्र ) गांवांत आलों व तेथून धर्मशाळेंत बाराचे सुमारास आलों. चार वाजेपर्यंत विश्रांति घेऊन कुरुक्षेत्र स्टेशनवर आलों. दुपारीं चारचे गाडीनें तेथून निघून रात्रीं आठ वाजतां दिल्ली येथें आलों. दुसरे दिवशीं म्हणजे मंगळवार ता. १५ ला दिल्लीहून निघालों व ता. १६ ला म्हणजे घरून निघाल्यापासून दोन महिने आठ दिवसांनीं परमेश्वरकृपेनें घरीं सुखरूप पोहोंचलों.

## परिशिष्ट अ.

# मानस सरोवर व कैलास यात्रा.

खालीं दिलेली मानस सरोवर व कैलास पर्वतासंबंधीं माहिती काळी-कमलीवाला क्षेत्राचे मुख्य आचार्य बाबा मणीराम यांनीं व ब्रह्मचारी चक्रधर शर्मा यांनीं प्रसिद्ध केलेल्या पुस्तकांमधून घेतलीं आहे.

मानस सरोवर व कैलास पर्वत ( Mount Everest ) ह्या ठिकाणास एक रस्ता माना खिंडी ( Mana pass ) मधून जातो व दुसरा रस्ता लिपुलेखवरून जातो. हिमालयापलीकडे जाणाऱ्या ह्या दोन्ही मार्गांपैकीं लिपुलेख खिंडीमधून जाणारा रस्ता सर्वांत जवळचा आहे. लिपुलेखवरून जाणें असल्यास, बरोबर तंबू, बंदुकी व खाण्यास, पांघरण्यास वगैरे लागणारें जरूरीचें सामान बरोबर घेऊन, जून महिन्याच्या दुसऱ्या आठवड्यांत.



दारची येथून दिसणारें कैलास पर्वताचें दृश्य.

भोटिया व्यापारी अगर वाटाड्या घेऊन अलमोरा येथून निघावें. हा मार्ग खरोखर त्याची अवघडपणाबद्दल जितकी ख्याति आहे तितका अवघड नाहीं. माना खिंडीमधून जाणारा मार्ग बराच लांबीचा आहे. पांच अगर सात दिवस कंटाळवाण्या व धोक्याच्या रस्त्यानें प्रवास करून आपण तिबेटांतील डब्बा नांवाच्या खेड्यांत येतो. येथून पुढें रस्ता सुखावह

असून येथें बैलगाड्याहि मिळतात. येथून पुढें दोन दिवसांच्या प्रवासानंतर आपण डमपम नांवाच्या खेड्यांत येतो. आणखी दोन दिवसांच्या प्रवासानंतर शिवाचीलिंग येथें पोहोंचतो. ज्यानिमा मंडी शिवाचीलिंग येथून पुढें दोन दिवसांच्या प्रवासावर आहे. ज्यानिमा मंडी येथें मोठा बाजार आहे. येथें सर्व तऱ्हेच्या वस्तु मिळतात. ज्यानिमा मंडी येथून तीर्थपुरी येथें जाण्यास आणखी दोन दिवस लागतात. तीर्थपुरीपासून चार दिवसांच्या रस्त्यावर श्रीगौरीशंकरांचें पवित्र स्थान कैलास पर्वत आहे. कैलास पर्वताची प्रदक्षिणा सुमारें पंचवीस ते एकुणतीस मैलांची आहे. कैलास पर्वत देवालयासारखा दिसतो. कैलास पर्वताच्या प्रदक्षिणेस दोन तीन दिवस लागतात.

मानस सरोवर कैलास पर्वतापासून तीस मैलांवर पूर्व दिशेस आहे. तिबटांतील लामांच्या म्हणण्याप्रमाणें मानस सरोवराची प्रदक्षिणा ७० मैलांची



**पवित्र मानस सरोवर.**

आहे. परंतु आंग्ल संशोधकांच्या म्हणण्याप्रमाणें ही प्रदक्षिणा फक्त ४५ मैलांची आहे. मानस सरोवर हें स्वच्छ परंतु अथांग पाण्याचें सुंदर सरोवर आहे. मानस सरोवर पाहून बहुतेक यात्रेकरू लालकाकाट लिपुलेख खिंडींतून अलमोरा येथें परत येतात.

अलमोरा येथून कैलास २३८ मैल आहे. परंतु ह्या मार्गानें एकसारखें चढत जावें लागतें. माना खिंडीमधून पुढें फारशी चढण नाहीं. कारण बदरीनाथपर्यंत आपण ११००० फूट चढणीवर आलेलोंच असतों. अलमोरा मार्गानें जातांना पुढें दिलेलीं मुक्कामाचीं स्थळें आहेत.

अलमोरा उंची ५००० फूट. येथून निघतांना गमनास शुभ असा दिवस पाहून निघावें. पुढें ८ मैल बारिचिना, उंची ६००० फूट. येथें डाक बंगला आहे. धौळेचिना ६ मैल. येथें पोस्ट ऑफिस आहे. कनरीचिना ४ मैल, डाक बंगला. शेराघाट ६ मैल. गणाई ६ मैल, डाक बंगला. झालतोला ६ मैल. प्रवास सुखदायक व आल्हादकारक. बेरीआंग ६ मैल, उंची ७००० फूट. पोस्ट ऑफिस व डाक बंगला. थळ १० मैल, उंची ३००० फूट. पोस्ट ऑफिस. डीडीहाट ८ मैल, उंची ५५०० फूट. डाक बंगला. असकोट ९ मैल, उंची ५००० फूट. डाक बंगला. पोष्ट ऑफिस. बालवाकोट १२ मैल, उंची ३००० फूट. प्रवास आल्हादकारक. धरचुला ११ मैल, उंची ३००० फूट. प्रवास आल्हादकारक, खेला १० मैल. उंची ५५०० फूट, पोष्ट ऑफिस. चौदस ८ मैल, उंची ९००० फूट, खडी चढण गाल्लागड, ११ मैल, उंची ८००० फूट. येथें अर्धी मजल संपते. मलपा ६ मैल, उंची ७२०० फूट. रस्ता खडबडीत. बुदी ७ मैल, उंची ९५०० फूट. गरब्याग ६ मैल, उंची १०,५०० फूट. डाक बंगला; पोष्ट ऑफिस. येथें कुली बदलावे व नाणीं बदलून घ्यावीं. कालापाणी १० मैल, रस्ता खडबडीत व अवघड. सॉनचॅम ६ मैल, उंची १५००० फूट. येथे सर्वत्र बर्फमय असून आश्रय करण्यास झाडें वगैरे नाहींत. तंबू देण्याची जागा आहे. लिपुलेख खिंड ६ मैल, उंची १६,७५० फूट, येथून हिंदुस्थानची हद्द ओलांडून आपण पलीकडे येतो. येथें मुक्कामासारखी जागा नाहीं. सकाळीं लौकर उठून ही हद्द अकराच्या पूर्वी ओलांडावी म्हणजे भोंवतालचा भव्य देखावा चांगल्या तऱ्हेनें पाहाण्यास मिळतो. तक्लाकोट मंडी. ६ मैल, उंची १३,००० फूट; दिनचर्येच्या कांहीं वस्तु संपल्या असल्यास येथें घ्याव्या, व पुढच्या उदात्त प्रवासास सज्ज व्हावें. रनगन ८ मैल, उंची १४,४०० फूट; आश्रयास जागा नाहीं. गुरला खिंड.१० मैल, उंची १६,२०० फूट. येथून पुढें भव्य कैलास पर्वत ( Mount Everest ) दिसूं लागतो. फार प्राचीन काळापासून युगायुगीं प्रसिद्ध असलेलें मानस सरोवर, १०मैल, उंची १४,९०० फूट. जुगुंबा गुहा व बरखा ८ मैल, उंची १५,००० फूट; मार्ग सरळ व आल्हाददायक. दारची ( देवालय ) ६ मैल, उंची १५,००० फूट; रस्ता सरळ व आल्हादकारक. येथे रस्ता कैलास पर्वताच्या पायथ्याजवळ येतो व कैलास पर्वताची २९ मैलांची प्रदक्षिणा येथून सुरूं होते, लांडीगुंवा ( देवालय ) मैल, उंची १५ ००० फूट. दुर्फू ( देवालय ) ८ मैल, उंची १५,००० फूट. लांडीगुंवा व दुर्फू ह्या दोन्ही ठिकाणांवरून सृष्टिसौंदर्याच्या भव्य देवालयाचें ( कैलास पर्वताचें ) उदात्त दर्शन होतें. गौरीकुंड कैलास २ मैल, उंची १८,६०० फूट. कैलास पर्वताची यात्रा येथें संपूर्ण होते. ह्या पवित्र कुंडांत बुडी मारून सर्वेश्वर शिवाची पूजा करावी व परत हिंदुस्थानाकडे वळावें.

---

## परिशिष्ट ब.

# यात्रेस झालेल्या खर्चांचा तपशील.

| | रु. आ. पै. |
|---|---|
| ( १ ) रेल्वे भाडें, मोटार, टांगा, कूली वगैरे. | ३९–६–० |
| ( २ ) भोजनखर्च ता. ९ जून ते ता १४ ऑगष्टपर्यंत स्वतः व नोकर; दोन माणसांस सरासरी रोज १२ आणे-प्रमाणें. | ५६–०–३ |
| ( ३ ) तीर्थांच्या ठिकाणीं दानधर्म, पूजा–अर्चा, श्राद्ध, पंड्याची संभावना वगैरे. | ५२–६–० |
| ( ४ ) प्रवासांत लागणाऱ्या जरूरीच्या वस्तू, पेटंट औषधें वगैरे. | ४९–२–३ |
| ( ५ ) टपालखर्च, तारा वगैरे. | ६–८–० |
| ( ६ ) दंडीची खरेदी. | १८–०–० |
| ( ७ ) दंडी वाहून नेणारे ४ कूली. | १९०-०-० |
| रोज २ आणेप्रमाणें दंडीवाल्यास ६० दिवसांचा छबिना. | ७–८–० |
| प्रत्येक मुख्य तीर्थास रु. ४ प्रमाणे. चार तीर्थांचें बक्षीस व खिचडी. | १६–०–० |
| ( ८ ) दोन बोजेवाले. | ११८-०-० |
| रोज १ आणा प्रमाणें बोजेवाल्यांस ६० दिवसांचा छबिना | ३–१२–० |
| प्रत्येक मुख्य तीर्थास रु. २ प्रमाणें चार तीथांचें बक्षीस | ८–०–० |
| ( ९ ) दंडीवाल्यांस व बोजेवाल्यांस जादा बक्षीस. | ५–०–० |
| ( १० ) नोकराचा दोन महिने ५ दिवसांचा पगार व जादा बक्षीस. | रु ४०–०–० |
| एकंदर खर्च | रु. ६०९–१०–६ |

## परिशिष्ट क.

# प्रवासाची तारीखवार रोजनिशी.

ता. ११ जून १९३९ हृषीकेश येथून दुपारीं तीन वाजतां निघालों नरेंद्र नगर ५ मैल रात्रीं ८ वाजतां.

ता. १२–६–३९ नरेंद्रनगर सकाळीं ५ वाजता सोडलें.

फकोट ११ मैल ९ वाजतां पोहोंचलों नागुनी १६ मैल

ता. १३–६–३९ टेहेरी १४ मैल.

ता. १४–६–३९ वस्ती टेहेरी येथें.

ता. १५–६–३९ भलडियाना १४ मैल.

ता. १६–६–३९ छाम ५ मैल.
नागूना ५ मैल

ता. १७–६–३९ धारासू ५ मैल.
गेनूला ९ मैल

ता. १८–६–३९ सिलकियारी ५ मैल.
गंगणाणी ११ मैल.

ता. १९–६–३९ जम्नाचट्टी ५ मैल.
ओन्झी २ मैल

ता. २०–६–३९ हनुमानचट्टी ६½ मैल यम्नोत्री ८ मैल. संध्याकाळीं ७ वा.

ता. २१–६–३९ वस्ती यम्नोत्री यथें

ता. २२–६–३९ भीपा ४ मैल

ता. २२–६–३९ हनुमान चट्टी ८½ मैल

ता. २३–६–३९ जम्नाचट्टी ८ मैल

ता. २३–६–३९ गंगणाणी ८ मैल

ता. २४–६–३९ सिंगोट ९½ मैल

ता. २५–६–३९ उत्तर काशी ९½ मैल

ता. २५–६–३९ वस्ती उत्तर काशी येथें.

ता. २६–६–३९ दोंडीताल, मगेरी २६ मैल.

ता. २७–६–३९ कुम्हाली ४ मैल

ता. २७–६–३९ भटवारी ४ मैल

ता. २८–६–३९ गंगणाणी ९ मैल

ता. २८–६–३९ लोहरी नाग ४ मैल

ता. २९–६–३९ सुखी ५ मैल

ता. २९–६–३९ हरसील ५½ मैल

ता. ३०–६–३९ धराली २½ मैल

ता. ३०–६–३९ भैरवघाटी २½ मैल

ता. १ जुलै १९३९ गंगोत्री ६½ मैल वस्ती

ता. २–७–३९ वस्ती गंगोत्री येथें दुपारपर्यंत

ता. ३–७–३९ धराली १२ मैल

ता. ३–७–३९ गंगणाणी १६ मैल

ता. ४–७–३९ भटवारी ९ मैल

ता. ४–७–३९ मल्ला २ मैल

ता. ५–७–३९ फयाल्ू ६ मैल

ता. ५–७–३९ छुन्ना ३ मैल

ता. ६–७–३९ बेलक ४ मैल

ता. ६–७–३९ झाला ९ मैल

ता. ७–७–३९ बुढाकेदार ५ मैल

ता. ७–७–३९ टोलचट्टी ४ मैल

ता. ८–७–३९ भौंटा चट्टी ५ मैल

ता. ८–७–३९ गुट्ट चट्टी ८ मैल

ता. ९–७–३९ घुपंडा चट्टी ६ मैल

ता. ९–७–३९ पंवाली ३ मैल

ता. १०–७–३९ मग्गु–की–मंडा वस्त

ता. ११–७–३९ त्रिजुगीनारायण १ मैल, वस्ती

ता. १२–७–३९ गौरीकुंड ६½ मैल
ता. १२–७–३९ रामबारा ४ मैल
ता. १३–७–३९ केदारनाथ ३ मैल वस्ती
ता. १४–७–३९
ता. १५–७–३९ वस्ती केदारनाथ येथे
ता. १६–७–३९ रामपूर १०½ मैल
ता. १७–७–३९ नारायणकोटी १० मैल
गुप्तकाशी ५ मैल, वस्ती
ता. १८–७–३९ घालाबगड ८ मैल
ता. १९–७–३९ बानियाकुंड ५ मैल,
तुंगनाथ ५¼ मैल. वस्ती
ता. २०–७–३९ मंडळ ८ मैल
ता. २१–७–३९ गोपेश्वर ४½ मैल
चिकना ६ मैल
ता. २२–७–३९ पीपलकोटी ६ मैल
गरूडगंगा ६ मैल वस्ती
ता. २३–७–३९ हेलंग ८ मैल
ता. २४–७–३९ जोशीमठ ६ मैल
ता. २४–७–३९ घाटचट्टी ६ मैल
पंडुकेश्वर ८½ मैल, वस्ती
ता. २५–७–३९ हनुमान चट्टी ७ मैल
ता. २६–७–३९ बदरीनाथ, ३½ मैल
वस्ती.
ता. २७–७–३९ वसुधारा व सत्यपंथ
(सतोपंथ)
ता. २८–७–३९ ते बदरीनाथ येथें
ता. ३१–७–३९ वस्ती

ता. ३१–७–३९ बलदौरा १६ मैल
ता. १–८–३९ हेलंग ९ मैल
ता. १–८–३९ तुंगनी ७ मैल
ता. २–८–३९ सियासेन, ७ मैल
ता. २–८–३९ कुरेडा ८ मैल
ता. ३–८–३९ नंदप्रयाग ७ मैल
ता. ३–८–३९ नागासू ६ मैल
ता. ४–८–३९ कर्णप्रयाग ६½ मैल
ता. ४–८–३९ कामेरा ८ मैल
ता. ५–८–३९ रुद्रप्रयाग ११½ मैल
ता. ५–८–३९ नारकोटा ७ मैल
ता. ६–८–३९ भाट्टेसेरा ७ मैल
ता. ६–८–३९ श्रीनगर ७ मैल वस्ती
ता. ७–८–३९ भिलकेदार ३ मैल
ता. ७–८–३९ रामपूर ५ मैल
ता. ८–८–३९ कोलासू ४½ मैल,
देवप्रयाग ७ मैल
ता. ९–८–३९
ता. १०–८–३९ वस्ती देवप्रयाग येथें
ता. ११–८–३९ हृषीकेश ४० मैल
ता. १२–८–३९ वस्ती हृषीकेश येथें
ता. १३–८–३९ हरद्वार
ता. १४–८–३९ कुरुक्षेत्र
ता. १५–८–३९ दिल्ली
ता. १६–८–३९ लाखेरी ( घरीं परत )

—

## परिशिष्ट ड.

## टप्पे, चट्ट्या व मधील अंतर

| अ. नं. | चट्टीचें नाव | मागील चट्टीपासून अंतर | हृषीकेशपासून अंतर | विशेष माहिती |
|---|---|---|---|---|
| १ | **हृषीकेशपासून लछमनझूला** | | ३ मैल | |
| | मुनिकीरिटी | १½ मैल | | |
| | लछमनजीचें देऊळ | १½ मैल | | |
| | ध्रुवकुंड व सूर्यकुंड | ¼ मैल | | |
| २ | **लछमनझूलापासून महादेवसेन** | ८½ मैल | ११ मैल | |
| | गरुड चट्टी | २ मैल | | |
| | फुलवारी चट्टी | २ मैल | | |
| | गुलार चट्टी | ३ मैल | | |
| | माहादेवसेन | १½ मैल | | |
| ३ | **माहादेवसेनपासून नेओरखाल** | ६ मैल | १७½ मैल | |
| | नैमुहना | ½ मैल | | |
| | बिजनी | २½ मैल | | |
| | नेओरखाल | ३ मैल | | |
| ४ | **नेओरखालपासून बंदरचट्टी** | ६ मैल | २३½ मैल | |
| | कुंड चट्टी | ३ मैल | | |
| | बंदरचट्टी | ३ मैल | | |
| ५ | **बंदर चट्टीपासून ओखलघाट** | ५½ मैल | २९ मैल | |
| | माहादेव चट्टी | ३ मैल | | |
| | ओखलघाट | २½ मैल | | |
| ६ | **ओखलघाटपासून कंडीचट्टी** | ४ मैल | ३३ मैल | |

| क्र. नं. | चट्टीचें नांव | मागील चट्टीपासून अंतर | हृषीकेशपासून अंतर | विशेष माहिती |
|---|---|---|---|---|
| | संभाल | १ मैल | | |
| | खंडा | २ मैल | | |
| | कंडीचट्टी | १ मैल | | |
| ७ | **कंडीचट्टीपासून व्यासघाट** | | | |
| | | ३ मैल | ३६ मैल | |
| | भैरवखाल | १ मैल | | |
| | व्यासघाट | २ मैल | | |
| ८ | **व्यासघाटपासून देवप्रयाग** | | | |
| | | ९ मैल | ४५ मैल | देवप्रयाग येथून गंगोत्री व जमनोत्रीला टेहेरी (३३ मैल) व धरासू (२५ मैल) ह्या ठिकाणाहून दोन निरनिराळे घोडी जातील असे रस्ते आहेत. |
| | छालरी | ३½ मैल | | |
| | उमरासू | २ मैल | | |
| | सांडर | २ मैल | | |
| | देवप्रयाग | १½ मैल | | |
| ९ | **देवप्रयागपासून श्रीनगर** | | | |
| | | २० मैल | ६५ मैल | |
| | विद्याकोटी | ३ मैल | | |
| | सिताकोटी | ३ मैल | | |
| | राणीबाग | ३ मैल | | |
| | रामपूर | ३ मैल | | |
| | डिगोली | ३ मैल | | |
| | भिलकेदार | २ मैल | | |
| | कमळेश्वर व लक्ष्मीनारायण देऊळ | २ मैल | | |
| | श्रीनगर | १ मैल | | |
| १० | **श्रीनगरपासून रुद्रप्रयाग** | | | |
| | | १९ मैल | ८४ मैल | |
| | सुकाटा | ४ मैल | | |
| | भाटीसेरा | ३½ मैल | | |

| अ. नं. | चट्टीचें नांव | मागील चट्टी-पासून अंतर | हृषीकेशपासून अंतर | विशेष माहिती |
|---|---|---|---|---|
| | खांखरा | २ मैल | | |
| | पंच भाईयों की धार | ३½ मैल | | |
| | गुलाबराय चट्टी | २½ मैल | | |
| | रुद्रप्रयाग | २ मैल | | येथून बदरीनाथला रस्ता वळतो. |
| **११** | **रुद्रप्रयागपासून अगस्ति मुनि** | १०½ मैल | ९४½ मैल | |
| | छातोली | ४½ मैल | | |
| | मठचट्टी | १½ मैल | | |
| | रामपूर | १ मैल | | |
| | अगस्ति मुनि | ३½ मैल | | |
| **१२** | **अगस्तिमुनीपासून गुप्तकाशी** | १३ मैल | १०७ मैल | |
| | छोटा नारायण देऊळ | ½ मैल | | |
| | चंद्रपुरी | ३½ मैल | | |
| | भीरी | ३ मैल | | |
| | कुंड | ३ मैल | | |
| | गुप्तकाशी | ३ मैल | | |
| **१३** | **गुप्तकाशीपासून फाटाचट्टी** | ७ मैल | ११४½ मैल | |
| | नालाचट्टी | १ मैल | | |
| | मातादेवी | १ मैल | | |
| | नारायणकोटी व ब्यॉग | २ मैल | | |
| | माईगा झूला अथवा शक्ति देऊळ | २ मैल | | |
| | फाटा चट्टी | १ मैल | | |
| **१४** | **फाटाचट्टीपासून रामपूर** | ५ मैल | ११९½ मैल | |
| | बादलचट्टी | ३ मैल | | |

| अ. नं. | चट्टीचें नांव | मागील चट्टीपासून अंतर | हृषीकेशपासून अंतर | विशेष माहिती |
|---|---|---|---|---|
| | रामपूर | २ मैल | | |
| **१५** | **रामपूरपासून त्रिजुगीनारायण** | | | |
| | | ५ मैल | १२४½ मैल | |
| | पाटगर | १½ मैल | | गंगोत्रीचा रस्ता |
| | त्रिजुगी–नारायण | ३½ मैल | | येथें येऊन मिळतो. |
| **१६** | **त्रिजुगी--नारायणपासून गौरीकुंड** | | | |
| | | ५½ मैल | १३० मैल | |
| | सोनप्रयाग | २½ मैल | | |
| | मुंड--कट्टा--गणेश | १ मैल | | |
| | गौरीकुंड | २ मैल | | |
| **१७** | **गौरीकुंडपासून रामबारा** | | | |
| | | ४½ मैल | १३४½ मैल | |
| | चिरपट्याभैरव | १ मैल | | |
| | भीमशीला | १ मैल | | |
| | रामबारा | २½ मैल | | |
| **१८** | **रामबारापासून केदारनाथ** | | | |
| | | ३½ मैल | १३८ मैल | |
| | देवदेखणी | २ मैल | | |
| | श्रीकेदारनाथ | १½ मैल | | |

## केदारनाथ येथून परत नालाचट्टीपासून बदरीनाथ अंतर ११२ मैल.

| अ. नं. | चट्टीचें नांव | मागील चट्टीपासून अंतर | हृषीकेशपासून अंतर | विशेष माहिती |
|---|---|---|---|---|
| **१९** | **केदारनाथपासून सोनप्रयाग** | | | |
| | | ११ मैल | ११९ मैल | |
| | अनुक्रम नंबर १८ व १७ मध्यें दर्शविलेल्या मार्गानें परत. | | | |
| **२०** | **सोनप्रयागपासून नालाचट्टी** | | | |
| | | १२ मैल | १६१ मैल | |
| | रामपूर | २ मैल | | |

| अ. नं. | चट्टीचें नांव | मागील चट्टीपासून अंतर | हृषीकेशपासून अंतर | विशेष माहिती |
|---|---|---|---|---|
| | बादलचट्टी | २ मैल | | |
| | फाटाचट्टी | ३ मैल | | |
| | नारायणकोटी व ब्यॉंग | ३ मैल | | |
| | मातादेवी | १ मैल | | |
| | नाला चट्टी | १ मैल | | |
| २१ | **नालाचट्टीपासून उरवीमठ** | ३ मैल | १६४ मैल | |
| | मंदाकिनी पूल | १½ मैल | | |
| | उरवीमठची चढण | १½ मैल | | |
| २२ | **उरवीमठपासून पोथीबासा** | १३ मैल | ११७ मैल | |
| | ब्रह्मचट्टी | ३ मैल | | |
| | उतरण | २ मैल | | |
| | दुर्गाचट्टी | २ मैल | | |
| | पोथीबासा | ६ मैल | | |
| २३ | **पोथीबासापासून तुंगनाथ** | ९ मैल | १८६ मैल | |
| | बनियाकुंड | ३ मैल | | |
| | चौपटा | ३ मैल | | |
| | तुंगनाथ | ३ मैल | | |
| २४ | **तुंगनाथपासून मंडळचट्टी** | १० मैल | १९६ मैल. | |
| | जंगलचट्टी ( भीमोद्धार ) | ३ मैल | | |
| | पांगरबासा | ३ मैल | | |
| | मंडळचट्टी | ४ मैल | | |
| २५ | **मंडळचट्टीपासून चमोली** | ७ मैल | २०३ मैल | |
| | सिंघनाचट्टी | २ मैल | | |

| अ. नं. | चट्टीचें नांव | मागलि चट्टीपासून अंतर | हृषीकेशपासून अंतर | विशेष माहिती |
|---|---|---|---|---|
| | गोपेश्वर | २½ मैल | | वैतरणा-स्नान व परशूचें दर्शन |
| | चमोली ( लालसंगा ) | २½ मैल | | |

( केदारनाथच्या रस्त्याला चमोली रुद्रप्रयागपासून ११९ मैल व थेटच्या रस्त्यानें ३७½ मैल पडते. )

**२६ चमोलीपासून पीपलकोटी**

| | | ९ मैल | २१२ मैल | |
|---|---|---|---|---|
| | मलचट्टी | २ मैल | | |
| | छिनकाचट्टी | १ मैल | | |
| | बावला | १ मैल | | |
| | सीयाचट्टी | १ मैल | | |
| | पीपलकोटी | २ मैल | | |

**२७ पीपलकोटीपासून गरुडगंगा**

| | | ४ मैल | मैल २१६ | |
|---|---|---|---|---|

**२८ गरुडगंगापासून कुमहारचट्टी**

| | | ८ मैल | २२४ मैल | |
|---|---|---|---|---|
| | तंगणीचट्टी | २ मैल | | |
| | पाताळगंगा | २ मैल | | |
| | गुलाबकोटी | २ मैल | | |
| | कुमहारचट्टी (हेलंग) | २ मैल | | |

**२९ कुमहारचट्टीपासून जोशीमठ**

| | | ६ मैल | २३० मैल | |
|---|---|---|---|---|
| | खानोटीचट्टी | २ मैल | | |
| | झडकूला | १ मैल | | |
| | ह्युंगधार | २ मैल | | |
| | जोशीमठ | २ मैल | | |

**३० जोशीमठपासून पंडुकेश्वर**

| | | ९ मैल | २३९ मैल | |
|---|---|---|---|---|
| | विष्णुप्रयागची उतरण | २ मैल | | |

| अ. नं. | चट्टीचें नांव | मागील चट्टीपासून अंतर | हृषीकेशपासून अंतर | विशेष माहिती |
|---|---|---|---|---|
| | बलदौरा | १ मैल | | |
| | घाट | ४ मैल | | |
| | पंडुकेश्वर | २ मैल | | |
| ३१ | **पंडुकेश्वरपासून लामबगर** | | | |
| | | ३ मैल | २४२ मैल | |
| | शेषधारा | १ मैल | | |
| | बिनीख | १ मैल | | |
| | लामबगर | १ मैल | | |
| ३२ | **लामबगरपासून हनुमानचट्टी** | | | |
| | | ३ मैल | | |
| | दायापूल | १/४ मैल | | |
| | हनुमानचट्टी | २ ३/४ मैल | | |
| ३३ | **हनुमानचट्टीपासून बदरीनाथ** | | | |
| | | ५ मैल | २५० मैल | |
| | घोरसील पूल | १ मैल | | |
| | राडग पूल | १ मैल | | |
| | काचनगंगा | १ मैल | | |
| | देवदेखणी | १ मैल | | |
| | बदरीनाथपुरी | १ मैल | | |

## बदरीनाथपासून परत

| अ. नं. | चट्टीचें नांव | मागील चट्टीपासून अंतर | हृषीकेशपासून अंतर | विशेष माहिती |
|---|---|---|---|---|
| ३४ | **बदरीनाथपासून चमोली** | | | |
| | | ४७ मैल | २९७ मैल | |
| | ( मार्ग वर दिल्याप्रमाणें ) | | | |
| ३५ | **चमोलीपासून नंदप्रयाग** | | | |
| | | ७ १/२ मैल | ३०४ मैल | |
| | कुहेर गडणा | २ १/२ मैल | | |
| | मैठाणा | २ मैल | | |

| अ. नं. | चट्टीचें नांव | मागील चट्टीपासून अंतर | हृषीकेशपासून अंतर | विशेष माहिती |
|---|---|---|---|---|
| | नंदप्रयाग | ३ मैल | | |
| ३६ | नंदप्रयागपासून कर्णप्रयाग | १२ मैल | ३१६½ मैल | |
| | सोनलाचट्टी | ३ मैल | | |
| | हाडाकोटी | १½ मैल | | |
| | लंगासू | १½ मैल | | |
| | जैखंडी | २ मैल | | |
| | उमट्टा | २ मैल | | |
| | कर्णप्रयाग | २ मैल | | |

( येथून एक रस्ता रामनगरला जातो व दुसरा रुद्रप्रयागवरून हृषीकेशच्या रस्त्याला मिळतो. मागें अ. नं. १० पहा. )

## हृषीकेश—( १०२ मैल ) चा मार्ग.

| अ. नं. | चट्टीचें नांव | मागील चट्टीपासून अंतर | हृषीकेशपासून अंतर |
|---|---|---|---|
| ३७ | कर्णप्रयागपासून रुद्रप्रयाग | १८ मैल | ३३४½ मैल |
| | चंदूवापीपल | ४ मैल | |
| | शिवनंदी | ८ मैल | |
| | रुद्रप्रयाग | ६ मैल | |
| ३८ | रुद्रप्रयागपासून हृषीकेश | ८ मैल | ४८½ मैल |

## रामनगर—( ९६ मैल ) चा मार्ग.

| अ. नं. | चट्टीचें नांव | मागील चट्टीपासून अंतर | हृषीकेशपासून अंतर |
|---|---|---|---|
| ३९ | कर्णप्रयागपासून दिवाळी खळ | ६ मैल | ३३२ मैल |
| | सेमली | ३½ मैल | |
| | भाटोळी | १½ मैल | |
| | आदिबदरी | ४½ मैल | |
| | जोंकपाणी | ४½ मैल | |
| | दिवाळी खळ | २ मैल | |

| अ. नं. | चट्टीचें नाव | मागील चट्टीपासून अंतर | हृषीकेशपासून अंतर | विशेष माहिती. |
|---|---|---|---|---|
| **४०** | **दिवाळी खळपासून मेलचौरी** | | | |
| | | १०½ मैल | ३४३ मैल | |
| | कालीचट्टी | १ मैल | | |
| | गवारचट्टी | ३ मैल | | |
| | धुनारघाट | १½ मैल | | |
| | मैलचौरी | ५ मैल | | |
| **४१** | **मेलचौरीपासून मासी** | | | |
| | | १६½ मैल | ३५९½ मैल | |
| | चौखुटिया | ८ मैल | | |
| | भाटकोट | २ मैल | | |
| | भागोटीचट्टी | १ मैल | | |
| | गणेशचट्टी | १ मैल | | |
| | नर्मदेश्वर महादेवाचें देऊळ | ½ मैल | | |
| | मासी | ४ मैल | | |
| **४२** | **मासीपासून भिक्यासेन** | | | |
| | | ११ मैल | ३७० मैल | |
| | बुऱ्याकेदार | ४ मैल | | |
| | नौलचट्टी | ५ मैल | | |
| | भिक्यासेन | २ मैल | | |
| **४३** | **भिक्यासेनपासून गज्जरघट्टी** | | | |
| | | १० मैल | ३८० ½ मैल | |
| | शेरकोट | २ मैल | | |
| | बासकोट | २ मैल | | |
| | गवालीकाना | ३ मैल | | |
| | गज्जरघट्टी | ३ मैल | | |
| **४४** | **गज्जरघट्टीपासून तुटाआम** | | | |
| | | १३ मैल | ३९३ | |
| | कापूरनौली | २½ मैल | | |

| अ. नं. | चट्टीचें नांव | मागील चट्टी पासून अंतर | हृषीकेशपासून अंतर | विशेष माहिती |
|---|---|---|---|---|
| | देवखाना | २½ मैल | | |
| | गोडीचट्टी | २ मैल | | |
| | तुटाआम | ६ मैल | | |
| **४५** | **तुटाआमपासून रामनगर** | | | |
| | | १९ मैल | ४१२ मैल | |
| | सौराल | २ मैल | | |
| | कुमरीया | ८ मैल | | |
| | मोहनचट्टी | ३ मैल | | |
| | गरज्या | ४ मैल | | |
| | ढिकली | २ मैल | | |
| | रामनगर | ४ मैल | | |

## हृषीकेशपासून जम्नोत्री व गंगोत्री

हृषीकेश येथून निघणारा, नरेंद्र नगर, फकोट, जाजल व छम्मा-वरून जाणारा दुसरा मार्ग गंगोत्री-जम्नोत्रीच्या रस्त्यास भलडियाना येथें मिळतो.

### ( डेहराडून येथून )

| अ. नं. | चट्टीचें नांव | मागील चट्टी पासून अंतर | हृषीकेशपासून अंतर | विशेष माहिती |
|---|---|---|---|---|
| **४६** | **हृषीकेशपासून डेहराडून** | | | |
| | | २५ मैल | | |
| | राणीपोकरी | ७ मैल | | |
| | डोईवाला | ६ मैल | | |
| | डेहराडून | १२ मैल | | |

( हृषीकेश येथून डेहराडूनला आगगाडीनेंहि जातां येतें. )

| अ. नं. | चट्टीचें नांव | मागील चट्टी पासून अंतर | हृषीकेशपासून अंतर | विशेष माहिती |
|---|---|---|---|---|
| **४७** | **डेहराडूनपासून मसूरी** | | | |
| | | १४ मैल | ३९ मैल | डेहराडून येथून मसुरीला मोटार सर्व्हिस आहे. |
| | राजपूर | ७ मैल | | |
| | मसूरी | ७ मैल | | |

अ. नं. | चट्टीचें नांव | मागील चट्टीपासून अंतर | हृषीकेशपासून अंतर | विशेष माहिती.

**४८ मसूरीपासून धनलोटी**

१५ मैल    ८४ मैल

सुराऱ्होली    ६ मैल

येथून दोन निराळ्या जवळच्या पायवाटा मोलधार व मालामारारावरून धारासूला जातात.

झ्यालकी    १ मैल

धनलोटी    ८ मैल

**४९ धनलोटीपासून कंटल**

८ मैल    ६२ मैल

**५० कंटलपासून भलडियाना**

९ मैल    ७१ मैल

टेहेरीचा रस्ता सुटतो    १ मैल

येथून टेहेरी १४ मैल पलीकडे आहे.

बंडवल गाव    ४ मैल

भलडियाना    ४ मैल

**५१ भलडियानापासून धरासु**

१४ मैल    ८५ मैल

छांम    ६ मैल

नागुन    ३ मैल

धरासु    ५ मैल

येथून रस्त्यास दोन फाटे फुटतात. पुढे अ. नं. ५८ पहा. एक फाटा येथून ७३ मैल असलेल्या गंगोत्रीस जातो व दुसरा फाटा येथून ४७ मैल असलेल्या जम्नोत्रीस जातो.

## जम्नोत्रीचा रस्ता.

**५२ धरासूपासून सिलक्यारा**

११ मैल    ९६ मैल

कल्याणी    ३ मैल

| अ. नं. | चट्टीचें नांव | मागील चट्टीपासून अंतर | हृषीकेशपासून अंतर | विशेष माहिती. |
|---|---|---|---|---|
| | कुमरारा | ५ मैल | | |
| | सिलक्यारा | ३ मैल | | |
| ५३ | **सिलक्यारापासून गंगणाणी** | | | |
| | | १२ मैल | १०८ मैल | |
| | रादीका दंडा | ४ मैल | | |
| | येथून एक रस्ता बारकोटला व दुसरा रस्ता उत्तर काशीस जातो. | | | |
| | गंगणाणी | ८ मैल | | |
| ५४ | **गंगणाणीपासून हनुमानचट्टी** | | | |
| | | १६ मैल | १२४ मैल | |
| | जम्नाचट्टी | ६ मैल | | |
| | ओन्झी | ४ मैल | | |
| | राणा | ३ मैल | | |
| | हनुमानचट्टी | ३ मैल | | |
| ५५ | **हनुमानचट्टीपासून जम्नोत्री** | | | |
| | | ८ मैल | १३२ मैल | |
| | खरसाळी | ४ मैल | | |
| | जम्नोत्री | ४ मैल | | |

## गंगोत्रीचा रस्ता.

| अ. नं. | चट्टीचें नांव | मागील चट्टीपासून अंतर | हृषीकेशपासून अंतर | विशेष माहिती. |
|---|---|---|---|---|
| ५६ | जम्नोत्रीपासून गंगणाणीपर्यंत परत यावें लागतें ( अ. नं. ५३ पहा ) | | | |
| | | २४ मैल | १५६ मैल | |
| ५७ | **गंगणाणीपासून नाकोरी** | | | |
| | | १५ मैल | १७१ मैल | |
| | सिंघोट | ८ मैल | | |
| | धरासूपासून दुंडावरून येणारा गंगोत्रीचा रस्ता येथे ह्या रस्त्यास मिळतो. | | | |
| | नाकोरी ( दूधगंगा ) | ७ मैल | | |
| ५८ | **नाकोरीपासून उत्तरकाशी** | | | |
| | | ५ मैल | १७६ मैल | |
| | वर्णा | २½ मैल | | |

| अ. नं. | चट्टीचें नांव | मागील चट्टीपासून अंतर | हृषीकेशपासून अंतर | विशेष माहिती |
|---|---|---|---|---|
| | उत्तरकाशी | २½ मैल | | |
| **५९** | **धरासूपासून उत्तरकाशी** | १८ मैल | १०३ मैल | जम्नोत्रीच्या प्रवासाचें अंतर सोडून |
| | दुंडा | ९ मैल | | |
| | नाकोरी ( दूधगंगा ) | ४ मैल | | |
| | वर्णा | २½ मैल | | |
| | उत्तरकाशी | २½ मैल | | |
| **६०** | **उत्तरकाशीपासून मणेरी** | ९ मैल | १८५ मैल | जम्नोत्रीच्या प्रवासाचें अंतर धरून |
| | अस्सीसंगम | २½ मैल | | |
| | मणेरी | ६½ मैल | | |
| **६१** | **मणेरीपासून भटवारी** | ९ मैल | १९४ मैल | केदारनाथला येथून रस्ता वळतो |
| **६२** | **भटवारीपासून गंगणाणी** | १० मैल | २०४ मैल | |
| | गंगेवरील झुलता पूल | ६ मैल | | |
| | गंगणाणी | ४ मैल | | |
| **६३** | **गंगणाणीपासून सुखी** | ६½ मैल | २१०½ मैल | |
| | लोहरीनाग | २½ मैल | | |
| | सुखी | ४ मैल | | |
| **६४** | **सुखीपासून धराली** | ७½ मैल | २१८ मैल | |
| | झाला | २½ मैल | | |
| | हरसिल | ३ मैल | | |
| | धराली | २ मैल | | |
| **६५** | **धरालीपासून गंगोत्री** | १३ मैल | २३१ मैल | |
| | जंगला | ३ मैल | | |
| | भैरवघाटी | ३ मैल | | |
| | भैरवाचें देऊळ | १ मैल | | |
| | गौरीकुंड | ५ मैल | | |

अ. नं. चट्टीचें नांव | मागील चट्टीपासून अंतर | हृषीकेशपासून अंतर | विशेष माहिती

गंगोत्री १ मैल

( गोमुख गंगोत्रीपासून १८ मैल आहे. )

६६ गंगोत्री येथून परतल्यानंतर, थेट केदारनाथला जावयाचें असल्यास, येथून ३७ मैल असलेल्या भटवारीपर्यंत परत यावें व तेथून वळण घेऊन $1\frac{1}{2}$ पुढें असलेल्या मल्लागाव येथें येऊन, तेथून केदारनाथचे रस्त्यास लागावें.

**६७ मल्लागांवपासून सिन्याली**

$9\frac{1}{2}$ मैल — २७९ मैल

मल्लापूल व भागीरथी आणि पीलंगनदी याचा संगम $1\frac{1}{2}$ मैल

सिन्याली ९ मैल

**६८ सिन्यालीपासून बुढाकेदार**

१२ मैल — २९१ मैल

छुन्नाचट्टी ६ मैल

बुढाकेदार ६ मैल

**६९ बुढाकेदारपासून गुट्टु**

१५ मैल — ३०६ मैल

चढण ६ मैल

जंगलचट्टी ४ मैल

गुट्टु ( ५ मैलांच्या उतरणीनंतर ) ५ मैल

**७० गट्टुपासून पंवाली**

९ मैल — ३१५ मैल

**७१ पंवालीपासून त्रिजुगी-नारायण**

१५ मैल — ३३० मैल

मंगुका-मंडा १० मैल

त्रिजुगी-नारायण ५ मैल

( हृषीकेश-केदारनाथ रस्ता येथें मिळतो. )

( वर अ. नं. १५ पहा. )

# परिशिष्ट ई

## टपाल व तार ऑफिसें.

### हृषीकेश-देवप्रयाग मार्ग

| टपाल ऑफिस | तार ऑफिस |
|---|---|
| व्यासघाट, देवप्रयाग | |

### देवप्रयाग-टेहरी मार्ग.

| टपाल ऑफिस | तार ऑफिस |
|---|---|
| टेहरी | टेहरी |

### टेहरी-धरासू-जम्नोत्री मार्ग

| टपाल ऑफिस | तार ऑफिस |
|---|---|
| उत्तरकाशी, धरासू | |

### जम्नोत्री-सिमली-गंगोत्री मार्ग

| टपाल ऑफिस | तार ऑफिस |
|---|---|
| उत्तरकाशी | |

### गंगोत्री-केदारनाथ मार्ग

| टपाल ऑफिस | तार ऑफिस |
|---|---|
| केदारनाथ | |

### केदारनाथ-बद्रीनाथ मार्ग

| टपाल ऑफिस | तार ऑफिस |
|---|---|
| गुप्तकाशी | गुप्तकाशी |
| चमोली | चमोली |
| जोशीमठ | जोशीमठ |
| बद्रीनाथ | बद्रीनाथ |
| श्रीनगर | श्रीनगर |
| रुद्रप्रयाग | रुद्रप्रयाग |
| कर्णप्रयाग | कर्णप्रयाग |
| देवप्रयाग | देवप्रयाग |

# परिशिष्ट फ

टेहरी दरबारनें मंजूर केलेल्या नियमान्वयें दंडीवाल्यांची मजुरी प्रत्येक मजुरास दर मैलास चार आणे आहे. व बोजेवाल्यांची मजुरी प्रत्येक मैलास दर मणास २ आणे आहे.

| प्रवास | मैल | दंडीवाल प्रत्येक मैलास ०—४—० प्रमाणें | बोजेवाले * प्र. मैलास दर म. ०—२—० प्रमाणें |
|---|---|---|---|
| हृषीकेशपासून देवप्रयाग | ४४ | ११-०-० | ६-०-० |
| देवप्रयागपासून बदरीनाथ व परत मैलचौरी | २२१ | ५५-०-० | २८-०-० |
| देवप्रयागपासून बदरीनाथ व परत देवप्रयाग | २५० | ६३-०-० | ३१-०-० |
| हृषीकेशपासून बदरीनाथ व मैलचौरी | २६५ | ६६-०-० | ३३-०-० |
| हृषीकेशपासून बदरीनाथ व परत देवप्रयाग | २९४ | ७४-०-० | ३७-०-० |
| देवप्रयागपासून केदारनाथ व बदरीनाथ व परत मेलचौरी | २९५½ | ७४-०-० | ३८-०-० |
| देवप्रयागपासून केदारनाथ, बदरीनाथ व परत देवप्रयाग | ३२४½ | ८१-०-० | ४१-०-० |
| हृशीकेशपासून केदारनाथ, बदरीनाथ व परत मेलचौरी | ३३९½ | ८५-०-० | ४३-०-० |
| हृषीकेशपासून बदरीनाथ व परत हृषीकेश | ३३८ | ८५-०-० | ४३-०-० |
| हृषीकेशपासून बदरीनाथ, केदारनाथ व परत देवप्रयाग | ३६८ | ९२-०-० | ४६-०-० |
| हृषीकेशपासून केदारनाथ, बदरीनाथ व परत हृषीकेश | ४१२ | १०४-०-० | ५१-०-० |
| देवप्रयागपासून यम्नोत्री, गंगोत्री, केदारनाथ व परत मेलचौरी | ५३२ | १३३-०-० | ६७-०-० |
| देवप्रयागपासून यम्नोत्री, गंगोत्री, केदारनाथ, बदरीनाथ, व परत देवप्रयाग | ५६१ | १४१-०-० | ७०-०-० |
| हृषीकेशपासून यम्नोत्री, गंगोत्री, बदरीनाथ, केदारनाथ व परत मेलचौरी | ६७६ | १४४-०-० | ७२-०-० |
| हृषीकेशपासून यम्नोत्री, गंगोत्री, बदरीनाथ, केदारनाथ व परत देवप्रयाग | ६०५ | १५१-०-० | ७६-०-० |
| हृषीकेशपासून यम्नोत्री, गंगोत्री, बदरीनाथ, केदारनाथ व परत हृषीकेश. | ६४९ | १६२-०-० | ८१-०-० |

* वीस शेरांपेक्षां कमी वजन असले तरी वीस शेराचे पैसे द्यावे लागतात.



तिबेट
हिमालय
मानाखिंड
जमनोत्री
गंगोत्री
गोमुख
केदारनाथ
बद्रीनाथ
टेहेरी गरहवाल
ब्रिटिश गरहवाल
टेहेरी
हरद्वार
हृषीकेश
उत्तरकाशी
देवप्रयाग
श्रीनगर
रुद्रप्रयाग
कर्णप्रयाग
नंदप्रयाग
पौरी
लॅन्डसडौन
तुंगनाथ
अलकापुरी
हनुमानचट्टी
भलडियाना
सीरीयन
आम्ही आक्रमिलेला मार्ग
टेहेरी व ब्रिटिश गरहवाल मधील हद्द दाखविणारी रेषा
चारधाम